# HISTORY OF ENGLAND

TRANSLATED INTO MARATHI

CORRECTED FOR THE PRESS

BY

KESHAVA SAKHÁRÁM SHÁSTRI

VOL II.

THIRD EDITION.

BOMBAY:

PRINTED BY THOMAS GRAHAM.

1857.

*Price, One Rupee and four Annas.*

# इंग्लंड देशाची बखर.

## भाग २.

आवृत्ति तिसरी.

---

केशव सखाराम शास्त्री यानीं तपासून शुद्ध केली
ती.

मुंबईमध्यें

टामस ग्रेहाम यानीं छापिली. सन् १८५७.

किंमत १। रुपया.

## सूचना.

मोठे अक्षरांनीं जे शब्द लिहिले आहेत ते इंग्रेजी असे समजावें.

इंग्रेजी शब्दाचा अर्थ बहुधा पृष्ठाचे खालचे बाजूस खुणा करून बारीक अक्षरांनीं लिहिला आहे. पहिल्या आवृत्तींत ग्रंथाच्या शेवटीं कोश घातला होता तो एथें गाळला.

# इंग्लंड देशाची बखर.

---

## प्रकरण २७.

## प्रथम जेम्स राजाची कथा.

संन् १६०२ पासून १६२५ पर्यंत.

**स्काट्लंड** याचा साहावा, आणि **इंग्लंड** याचा पहिला **जेम्स** या नांवाचा राजा सिंहासनारूढ झाला, त्या वेळेस राज्यांत सर्व लोकांस परम आल्हाद झाला; कारण, त्यास मुळचा राज्याचा अधिकार होता; **इलिझाबेथ** राणीनें, त्यानें राज्य करावें, असें आपले मृत्युपत्रांत लिहून ठेविलें होतें; आणि त्याविषयीं **पार्लमेंट** याचीही संमति होती. इतकी अनुकूळता असतांही प्रारंभींच त्याचा घात करावयाकरितां बंड उत्पन्न झालें; त्याचा उपक्रम करणारे मुख्य, **लार्ड ग्रे**, **लार्ड काभम**, आणि **सर वाल्टर राली**, या नांवांचे तिघे पुरुष होते. पुढें तें बंड फुटलें, आणि त्या सर्वांस धरून [illegible] मारावें असें ठरविलें; परंतु राजाच्या मनांत दया येऊन त्यानें तें शासन केलें नाहीं. **काभम** आणि **ग्रे**, या दोघांनीं आपलीं डोकीं देखील लांकडावर ठेविलीं होतीं, परंतु त्यांस सोडिलें. **राली** याचाही शिरच्छेद करूं नये असें केलें, परंतु त्यास कैदेंत ठेविलें. तो तसाच बहुत वर्षेंपर्यंत होता; आणि त्यावर अन्याय कधीं शाबूत झाला नाहीं तरी, शेवटीं तो त्यामुळेंच मारला गेला.

**जेम्स** राजा राज्यकारभारांत अतिसुशील, आणि सहिष्णु होता, ह्मणून **पोप** याचें मत पुनः स्थापायाची लो-

कांनीं एक युक्ति केली; ती वास्तविक असें खचित ठाऊक आहे ह्मणून बरें, नाहीं तर आतां खरी वाटायाची नाहीं. ती बंदुकेचे दारूनें काम करायाची युक्ति; जीपेक्षां अधिक वाईट कल्पना मनुष्याचे मनांत कधींही आली नसेल. **मेरी** राणीस **क्याथोलिक** धर्माचा फार अभिमान होता, तिचा मुलगा **जेम्स** हें एक कारण; आणि त्याचें लहानपणीं कांहीं त्या धर्माचें अगत्य दाखविलें होतें, त्यावरून सर्व **क्याथोलिक** यांस अशा होती कीं, हा कांहीं तरी आपले पक्षास साहित्य करील; परंतु तें तसें झालें नाहीं, आणि राजा उघड बोलूं लागला कीं, **रोमनक्याथोलिक** याविषयीं, जे **इलिझाबेथ** राणीनें कायदे केले आहेत त्यांप्रमाणें मी वर्तेन. अशी त्याची प्रतिज्ञा ऐकून त्यांस क्रोध आला; आणि त्यांनीं निश्चय केला कीं, **पार्लमेंट** यांच्या दोन्ही सभा एकदांच नाहींशा कराव्या. मग मोठ्या कुटुंबांतला असा एक शाहाणा **राबर्ट क्येटस्बी** ह्मणून होता, त्यानें युक्ति काढिली कीं, बंदुकीची दारू एखादे ठिकाणीं अशी भरून ठेवावी, कीं जीस आग लाविली असतां राजा आणि **पार्लमेंट** यांतले सर्व गृहस्थ हे सर्व एकदांच मरून जातील.

हा बेत फार भयंकर दिसतो, परंतु सर्वांनीं एक मसलत करून तो गुप्तपणीं सिद्धीस न्यावयाचा निश्चय केला होता. पुढें दोन महिन्यांवर **पार्लमेंट** याची सभा व्हावयाचा समय राहिला होता, तेव्हां त्यांनीं त्या सभेच्या घराजवळ एक घर होतें, तें **पर्सी** याचे नांवानें भाड्यानें घेतलें, प्रथम त्यांनीं **पार्लमेंट** याचे घरापासून आपले घरापर्यंत जमिनींतून वाट खणायाचें काम आरंभिलें; तें जेव्हां तीन **यार्ड** जाड

जी भिंत होती तीपर्यंत खणून दुसरे बाजूस पोंहोचले, तेव्हां तेथें आंत पोखरून कोळसे भरून ठेविले आहेत असें त्यांनीं पाहिलें, ह्मणून ते खिन्न झाले; परंतु त्यांस बातमी समजली कीं, ते कोळसे विकायाचे आहेत, आणि जो अधिक किंमत देईल त्यास ते देणार, ती संधि साधून त्यांनीं ती जागा भाड्यानें घेतली, आणि बाकीचे कोळसेही कांहीं कामास पाहिजेत असें निमित्त करून घेतले. पुढें त्यांनीं दारूचीं छत्तीस पिंपें **हालंड** यांत विकत घेऊन तेथें नेलीं, आणि तीं कोळसे व काटक्या यांनीं आच्छादिलीं. तें झाल्यावर त्या गुहेचे दरवाजे उघडे टाकले, आणि जो आंत जाईल त्यास जाऊं देऊं लागले; जसें कीं त्यांत कांहींच गुप्त नाहीं.

आपली खचित फत्ते होते, अशी खातर बाळगून त्यांनीं आपला बेत पुढें चालविला. त्या **पार्लमेंट** सभेस राजा, राणी, आणि राजाचा वडील मुलगा **हेनरी**, हीं सर्व यावयाचीं होतीं. राजाचा दुसरा मुलगा फार लहान ह्मणून येणार नव्हता; याकरितां असा बेत केला कीं, **पर्सी** यानें त्यास धरून ठार मारावें, आणि राजाची मुलगी **इलिझाबेथ** ती **वार्विक** प्रांतांत **लार्ड हारिंग्तन** याचे घरीं होती, तिला **सर एड्वर्ड डिग्वी** यानें धरून लागलाच राज्याभिषेक करावा.

नंतर **पार्लमेंट** याचे सभेचा दिवस जवळ आला. बंड इतकें गुप्त राहून कधीं असा विनाशाचा वेळ आला नसेल. बंडवाले केव्हां तो वेळ येतो अशी वाट पहात होते, आणि मनांत संतुष्ट होते कीं, आमचा बेत तडीस गेला. ती गुह्य गोष्ट सुमारें वीस आसामींस कळली असतांही दीड वर्षप-

र्यंत कोठें बाहेर फुटली नाहीं; या रीतीनें दया, धर्म, आणि सत्य हीं नाहींशीं झालीं असतां, स्नेहानें सारे राज्याचें संरक्षण झालें.

तें वर्तमान असें, **सर हेनरी पर्सी** म्हणून जो मुख्य बंडवाला सांगितला; त्याचा **लार्ड मौंटीग्ल** म्हणून एक मित्र होता, तो **लार्ड** सभेचा सभासद असे, याकरितां **पर्सी** याच्या मनांत आलें कीं, कसें तरी करून आपले मित्राचा प्राण वांचवावा. मग तो **लार्ड** शहरांत आल्यावर सभा व्हावयाचे पूर्वी दाहा दिवसांवर त्याचे नांवाचें कोणीएक पुरूषानें पत्र आणून दिलें, आणि तो लागलाच नाहींसा झाला. तें पत्र कोणाकडून आलें तें त्यास कळेना. त्याचा भाव असा होता, "**लार्ड** साहेब, या **पार्लमेंट** सभेस तुह्मी जाऊं नका; कारण, सांप्रत पातक फार होत आहे, याचें शासन करावें असा ईश्वरानें आणि मनुष्यांनीं संकल्प केला आहे. ही बातमी उगीच असें समजूं नका, आणि आपले घरीं लवकर निघून जा, तेथें तुह्मांस समजेल कीं, ही गोष्ट होते कीं नाहीं. आतां कोठें कांहींच जवळ दिसत नाहीं, परंतु राजा आणि **पार्लमेंट** यांचा एकदांच विध्वंस होईल, आणि तो कोण करील हें समजणार नाहीं. ही बुद्धि तुह्मी वाईट समजूं नये; कारण, ही ऐकिली तर तुमचें कल्याण होईल, आणि कांहीं जाणार नाहीं, हें कां ह्मणतों कीं, हें पत्र जाळून टाकिलें ह्मणजे सर्व संकटें गेलीं असेंही होईल."

**लार्ड मौंटीग्ल** तें विलक्षण पत्र पाहून विस्मित झाला, आणि घाबरला. प्रथम त्यास असें वाटलें कीं, हें कोणीं तरी मला घाबरवून उपहास करायाकरितां लिहिलें आहे;

परंतु मग त्यानें विचार केला कीं, हें आपण **लार्ड साल्सबरी** यास दाखवावें ह्मणजे चांगलें. तो **साल्सबरी** त्या वेळेस **सक्रेतारी** याचे कामावर होता. **लार्ड साल्सबरी** यानेंही प्रथम तिकडे विशेष चित्त दिलें नाहीं; परंतु पुढें थोडे दिवसांनीं राजा शहरांत आला; तेव्हां त्यानें तो अमात्य सभेंत बसला असतांना, तो कागद त्यास दिला.

तो पाहून सर्व अमात्यांची खातरी झाली कीं, कांहीं तरी दगा आहे खरा; परंतु काय आहे हें त्या पत्रावरून कोणास समजेना. अशी सर्व मंडळी संशयांत पडून स्तब्ध बसल्यावर प्रथम राजानें त्या संशयित पत्राचा अर्थ लाविला, आणि सांगितलें कीं, कांहीं तरी बंदुकीचे दारूचा खेळ दिसतो; याकरितां **पार्लमेंट** याचे दोन्ही सभागृहांचे खालचीं विवरें उकरून पाहावीं, हें मला चांगलें दिसतें. हें काम **सफोक** याचा **अर्ल, लार्ड चेंबर्लिन** याचे कामावर होता, त्यास सांगितलें, त्यानें तें मुद्दाम **पार्लमेंट** यांची सभा व्हावयाचे पूर्व दिवसापर्यंत तकूब ठेविलें. **लार्ड** यांचे घराखालीं ज्या लांकडाच्या मोळ्या होत्या त्यांवरून त्याचे मनांत संशय आला, आणि त्यानें एक पुरूष, लांब डगलें व **बूट** घातलेला, आणि हातांत फाणस घेऊन त्या भयंकर कर्माची तयारी करितो आहे, असा पाहून लागलाच धरला. त्याचें नांव **गेफाक्स** त्यानें, दुसरे दिवशीं चांगलें पेटावें ह्मणून, सर्व सामान नीट लावून ठेविलें होतें; हें कशावरून समजलें कीं, त्याचे खिशांत आग घेणारे असे पदार्थ सांपडले; तेव्हां सगळा थांग लागला; परंतु अपराध मोठा, आणि क्षमा होणार नाहीं ही त्या पुरूषाची खातरी होती; ह्मणून बेपर्वा होऊन तो चौक-

नोवेंबर ५
१६०५

शी करायास बसले होते त्यांस बोलिला कीं, जर तुह्मां स-र्वांस जाळून मीही जळालों असतों तर मला सुख झालें अ-सतें. अमात्यांपुढेंही तो असेंच स्वस्थपणीं बोलिला; त्यानें आपले साथी कोण हें सांगितलें नाहीं; त्यास इतकें मात्र वाईट वाटलें कीं, आपला बेत सिद्धीस गेला नाहीं. शेवटीं त्यास दोन तीन दिवस बंदींत ठेविलें, आणि शस्त्रें दाख-विलीं, तेव्हां त्यानें घाबरून सर्व वृत्तांत सांगितला.

**फाक्स** धरिला गेला असें समजतांच, **क्येटस्बी, पर्सी** आणि दुसरे बंडवाले लागलेच त्वरेनें **वार्विक** प्रांतांत नि-घून गेले. तेथें **सर एड्वर्ड डिग्बी** होता, त्यानें आपला बेत सिद्धीस जाईल अशा भरंवशावर युद्धाची सर्व सिद्धता करून ठेविली होती. परंतु तें वर्तमान समजतांच जिकडे तिकडे लोक सावध झाले होते, ह्मणून ते बंडवाले जेथें जेथें जात, तेथें तेथें त्यांपेक्षां अधिक फौज लढायास तयार असे. असें चोहोंकडून निरूपाय झाल्यावर ते सुमारें ऐशीं लोक होते, त्या सर्वांनीं निश्चय केला कीं, आतां पुढें जाऊं नये, आणि **वार्विक** प्रांतांत एके घराचा आश्रय करून राहून जितका हातानें नाश होईल तितका करून मग मरावें. तसें त्यांनीं केलें. पुढें त्यांचे घराभोंवता वेढा पड-ला, तितक्यांत दुसरा एक अनर्थ झाला. तो असा कीं, बंदुकीची दारू एके ठिकाणीं वाळत ठेविली होती, तीवर कोठून एक विस्तवाची ठिणगी पडली, तेणेंकरून ती दारू अकस्मात पेटून त्या बंडवाल्यांतून बहुतांचीं अंगें भाजलीं. तें पाहून बाकीचे होते ते निराश झाले, आणि दारें उघ-डून अकस्मात जाऊन शत्रूंवर पडले. त्यांतून बहुतांचे तत्क्षणींच तुकडे तुकडे झाले, **क्येटस्बी, पर्सी**, आणि

विंटर, हे तिघे एकापाठीमागें एक राहून बहुत वेळ लढाई करीत होते; शेवटीं पहिले दोघे बहुत जखमी होऊन पडले, आणि विंटर जिवंत सांपडला. त्या लढाईंतून जे बाकी राहिले होते त्यांची चौकशी होऊन यथायुक्त शासनें झालीं, कितीएकांचा शिरच्छेद झाला, व कितीएकांस राजानें क्षमा केली. गार्नेट आणि ओल्डकार्न त्या मसलतीस सहाय होते, त्यांचेंही इतरांबरोबर शासन झालें; असे ते दोघे सरकार गुन्हेगार उघड ठरले असतां, तत्पक्षी लोकांनीं गार्नेट यास मार्टिर याची पदवी दिली; आणि त्याचे रक्तापासून अनेक चमत्कार झाले अशा देखील गोष्टी ते सांगूं लागले.

राजानें अतिसूक्ष्म दृष्टीनें बंडाचा शोध लाविला, तेणेंकरून लोकांत त्याचें शहाणपण प्रख्यात झालें.

परंतु त्याचे कितीएक स्नेही होते, त्यांच्या इ०स०१६१२ इच्छेप्रमाणें तो वर्तत असे, हें मूर्खत्व पाहून लोकांनीं त्याचे वास्तविक गुणांची परीक्षा केली. त्याजवळ जे अशा रीतीचे पुरुष होते त्यांत मुख्य राबर्ट कार या नांवाचा स्काट्लंड देशांतले एके मोठे कुळांतला मुलगा होता. तो कितीएक वर्षेंपर्यंत देशाटन करून विसावे वर्षी लंडन यांत आला. त्याचा स्वाभाविक गुण काय तो इतकाच होता कीं, मुख सुंदर; आणि अभ्यासानें साध्य केलेला हा कीं, राजाचे मर्जीप्रमाणें दरबारी डौलानें वागणें. त्या मुलाची दरबारांत बढती होत चालली; तो प्रथम नैट झाला, मग वैकोंटराचेस्तर; पुढें ग्यार्टर याची पदवी त्यास मिळाली; मग प्रिविकौन्सिलर झाला, आणि शेवटीं अर्ल सामर्सेट याचें पदही त्यास प्राप्त झालें. पुढें कि-

ल्यांत **सर टामस ओव्हर्बरी** ह्मणून एक गृहस्थ होता, त्यास विष घालून मारिलें, असा त्यावर आरोप आल्यामुळें, राजाची त्यावर गैरमर्जी झाली ह्मणून त्याची दरबारांतून उठावणी होऊन जन्मभर पश्चात्ताप करितां करितां शेवटीं मरण पावला.

राजानें दुसरा एक पुरुष जेव्हां आपला इष्ट केला, तेव्हां तो पहिला मित्र सुटला. त्याचें नांव **जार्ज विलियर्स**, त्याचे वयास एकवीस वर्षें होतीं. त्याचे घरांत सर्वांमध्यें तो धाकटा होता. तो देशाटन करून आल्यावर **साम-सेट** याचे शत्रूंनीं युक्तीनें राजाजवळ त्याचा प्रवेश केला; मनांत कीं, त्याचें स्वरूप आणि गुण पाहून राजाची त्यावर प्रीति बसावी. अशा बेतानें एक नाटक करून राजाचे चांगला नजरेस येई असें त्यास बसविलें; राजा त्यास पाहून फार मोहित झाला; तो इतका कीं, पुढें थोडे वर्षांनंतर त्यानें अनुक्रमानें त्यास सर्व पदें देऊन शेवटीं मुख्य नौकाध्यक्ष केलें.

अशी वेडी प्रीति पाहून लोक मनांत कुरकुरूं लागले. ती कुरकुर विशेष वाढावयास कारण झालें, तें सांगतों. हें पुढील दुष्टकर्म या राजाचे राज्यांत घडलें हा त्यास मोठा कलंक लागला. शूर, तसाच विद्वान, **राली** ह्मणून एक गृहस्थ होता, त्याजवर कांहीं बंडाचा आरोप ठेविला होता. त्या संकटावस्थेंत असतांही त्यानें जे कितीएक ग्रंथ लिहिले ते आजचे दिवशींही प्रशंसा करावयाजोगे आहेत, त्यानें बहुत दिवस दुःख भोगिलें; आणि त्यामध्यें कविताशक्ति फार चांगली होती. तें पाहून लोकांचें मन त्याकडे विशेष लागलें. ज्यांनीं **एसेक्स** याचे शत्रूचा

द्वेष केला, त्यांचे मनांत त्या विद्वान् योद्धयाची दया आली; तो स्वतः मुक्तता व्हावयासाठीं प्रयत्न करीत होता. याकरितां त्यानें अशी बातमी उठविली कीं, **गायना** देशांत सोन्याची खाण आहे, ती मी दाखवितों; ती सांपडली असतां जे त्या कामास जातील, त्यांस आणि साऱ्या प्रजेस बहुत संपत्तीचा लाभ होईल.

राजास ती गोष्ट खरी वाटली असेल किंवा त्याचे मनांत त्याची विशेष फजीती करावी असें असेल; परंतु इतकें खरें कीं, त्यानें त्यास जाऊन सोन्याचा शोध करावा अशी आज्ञा केली. तथापि त्यानें प्रतिबंधांतच असावें, असें पूर्वीं जें त्यास शासन ठरविलें होतें, तें तसेंच काइम राखिलें. **राली** यास त्या कामाची सिद्धता करावयास फार दिवस लागले नाहींत. त्यानें लगबगीनें सर्व तयारी केली. यावरून बहुत लोक तर्क करितात कीं, त्यानें जी आवई उठविली होती, ती त्याच्या मनांत वास्तवीक वाटली होती; मग तो **गयाना** देशास गेला, आणि आपण मोठमोठीं पांच गलबतें घेऊन **ओरूनोको** नदी जेथें समुद्रास मिळाली आहे तेथें राहिला. बाकीचीं जहाजें, आपला मुलगा, आणि **क्यापटन् केनीस** या दोघांचे स्वाधीन करून त्यांस नदीचे प्रवाहांतून पाठविलें. तेथें जाऊन पहातात तों सोन्याचें नांव देखील नाहीं. इतका अनर्थ मात्र झाला कीं, **स्पानियर्ड** लोक तेथें होते, ते हे आल्याची बातमी समजल्यावरून, लढाईस सिद्ध झाले. पुढें त्यांस धीर यावयाकरितां **राली** याचा मुलगा ह्मणूं लागला कीं, आपण **सेंट टामस** शहराजवळ जात आहों, हाच कांहीं वास्तवीक निधी नव्हे! दुसऱ्याची आशा करणें हा

वेडेपणा. हें तो बोलत असतां, एक गोळी लागून तत्क्षणीं मृत्यु पावला. पुढें **इंग्लिश** यांनीं तें शहर घेतलें, त्यांत पाहूं लागले तों कांहीं नाहीं. यावरून ते अधिक निराश होऊन परत गेले.

अशा संकट दशेंत **राली** याचा निश्चय झाला कीं, आतां पुढें आशा करणें हें व्यर्थ; कारण जे त्यांच्या हाताखालीं होते तेच त्यास दुरुत्तरें बोलून तिरस्कारूं लागले. इतक्यांत त्यास जवळच्यानीं सांगितलें कीं, तूं अशी लबाडी केली, याचा जाब व्हावयाकरितां तुला आह्मी **इंग्लंड** देशास परत नेणार. ही गोष्ट ऐकतांच तो बहुतच भ्याला. असें सांगतात कीं, त्या वेळेस **स्पेन** आणि **इंग्लंड** यांच्या तह असतां **स्पानिश** मुलुखावर जाऊन हल्ला करावा, असा त्यानें बेत आरंभिला; तो फसल्यावर आपण तरी **फ्रान्स** देशांत पळून जावें. अशी मसलत केली. तीही तडीस गेली नाहीं. असे सर्व उद्योग निष्फळ झाल्यावर त्यास आणि त्याचे बराबर दिले होते त्यांस राजाचे दरबारांत आणून चौकशी केली. **स्पेन** देशाचा वकील **कौंट गांडिमर** ह्मणून त्या वेळेस **इंग्लंड** यांत होता, त्यानें बोलणें लाविलें कीं, तुह्मी **राली** यास जावयास ज्या अर्थीं आज्ञा दिली त्या अर्थीं तुमच्याच मनांत कांहीं लढाईचा बेत होता असें असेल. राजानें खचित सांगितलें कीं, **राली** यास हुकूम असा होता कीं, **स्पानियार्ड** यांशीं कज्या किंवा लढाई करूं नये. मग **स्पानिश** सरकारास आपलें हृद्गत पक्कें समजावें याकरितां राजानें **राली** याचे शिरच्छेद पत्रावर सही केली. तो शिरच्छेद त्या अन्यायाकरितां नव्हे; तर अगोदरचे आरोपाकरितां तो गृहस्थ शेवटीं

मोठ्या धैर्यानें मृत्यु पावला, आणि बोलिला कीं, कुऱ्हाडीचा घाय कठिण तर खरा, परंतु दुःखांतून एकदांच सोडवितो. त्यानें शेवटीं लोकांपाशीं स्वस्थ चित्तानें बोलून आपलें मस्तक खालीं केलें.

त्या प्रसंगीं राजानें **राली** यास मारावयास दुसरी सबब लाविली खरी, परंतु पुढें उघड दिसून आलें कीं, **जेम्स** राजा **स्पेन** देशचे सरकाराची तरफदारी करितो. याचें मूळ असें. राजास वाटत असे कीं, आपला मुलगा **चार्लस प्रिन्स आफवेल्स** याचें कोणते तरी राजाच्या मुलीशीं लग्न करावें. हें न केलें तर आपले प्रतिष्टेची हानी होईल. तेव्हां लग्न करायाजोगी मुलगी काय ती **फ्रान्स** देशचे राचाची किंवा **स्पेन** देशचे राजाची होती. कांहीं कारणामुळें त्यानें **स्पेन** देशचीच करायाचा बेत योजिला होता. पूर्वीं **स्पेन** देशचा **गाडिमर** ह्मणून वकील इंग्लंड देशांत होता असें सांगितलें; त्या गृहस्थानें **चार्लस** यास **स्पेन** देशचे राजाची दुसरी मुलगी द्यावयाचा करार केला; आणि आशा लाविली कीं, तिचा बाप पुष्कळ आंदण देईल; परंतु हें काम लवकर संपायाचें नव्हे ह्मणून पांच वर्षें झालीं तरी कांहीं लग्नाचा ठराव होईना. अशी हयगय पाहून राजाचा उत्साह भंग झाला; आणि राजपुत्र **चार्लस** यास हीं फार दुःख झालें; तो राजपुत्र असा कांहीं विलक्षण पुरुष होता कीं, त्यानें जिला कधीं पाहिली नाहीं, तिजविषयीं तो अतिशय सकाम झाला. **विलियर्स** ह्मणून राजाचा मित्र सांगितला, त्यानें कांहीं दिवसपर्यंत राजास आपले इच्छेप्रमाणें वागविला होता, त्याचे मनांत अशा समयीं

इ० स० १६१८

एक कल्पना आली. ती अशी कीं, वेष पालटून राजपुत्रानें स्वतः **स्पेन** देशांत जावें, आणि तेथील राजाचे मुलीस भेटावें.

**बकिंगम** याचे मनांत होतें कीं, कसें तरी करून राजपुत्राची मर्जी संपादावी, ह्मणून तो त्याचे बरोबर जावयास तयार झाला. वास्तवीक अर्थी राजानें हा बेत तडीस जाऊं देऊं नये, परंतु त्यानें त्यास उलटी मदत केली. मग ते निघाले; त्यांस मार्गीं जो वृत्तांत घडला, त्याचें वर्णन केलें तर अनेक काव्यें होतील; आणि झालींही आहेत. ते पुढें लग्न सिद्धीस गेलें नाहीं; त्याचें कारण काय; हें कोणी ग्रंथकार लिहीत नाहीं; ह्मणून कवीनीं जें वर्णिलें आहे कीं, तो **चार्लस, फ्रान्स** देशचा चतुर्थ **हेनरी** त्याच्या मुलीविषयीं सकाम झाला; हीच गोष्ट खरी मानिली पाहिजे. पुढें त्याचें आणि त्या **फ्रेंच** राजकन्येचें लग्न झालें.

अशी अव्यवस्था पाहून लोकांस वाईट वाटूं लागलें. त्या वेळेस **कामन्स** यांचे सभेंत अगदीं बंदोबस्त नाहींसा झाला होता; त्याचें कारण कीं, **जेम्स** राजा आपले मित्रांकरितां द्रव्य फार उधळीत असे, त्यामुळें त्यास पैक्याची गरज लागूं लागली, ह्मणून तो आपले अधिकाराचे विभाग करून अनुक्रमानें **कामन्स** यांस विकीत चालिला. जसी जसी राजाची गरीबी स्पष्ट दिसूं लागली, तसे तसे ते अधिक अधिक जुलूम करूं लागले; आणि कांहीं पैका दिला ह्मणजे समजावें कीं, त्याबरोबर कांहीं तरी मागण्याची अर्जी आहेच. प्रति सभेसमयीं **पार्लमेंट** आणि तो **जेम्स** यांमध्यें तंटा वाढत चालला; शेवटाचें **सेशन**

यांत इतका वाढला कीं, राजा त्या वेळेस घाबरला; परंतु त्या दुर्वृत्तामुळें अनर्थांचा उद्भव मात्र झाला; तें त्याचे मुलांस भोगावें लागले.

राजाच्या स्वदेशांत अशी धुंदाई चालत असतां **जर्मनी** देशांत जें वर्तमान घडलें, त्यापासून शेवटीं फार नाश झाला. राजाची वडील मुलगी **फ्रेडेरिक** नामें **जर्मनी** देशचा **इलेक्टर पालेटैन** होता त्यास दिली होती. त्या राजानें **एंपरर** दुसरा **फर्डिनंड** होता त्याशीं लढाई केली; त्यांत त्याचा पराजय झाल्यामुळें त्यास **हालंड** यांत चोरून जाऊन रहावें लागलें; त्याचें आणि **इंग्लिश** सरकारचें मुळचें नातें होतें; त्यांत तो संकटांत पडलेला, आणि त्यानें **प्राटेस्टंट** धर्माकरितां फार कष्ट भोगले, त्यामुळें **इंग्लंड** देशांतले लोक मनापासून इच्छित होतें कीं, त्याचें बरें व्हावें; ह्मणून **कामन्स** यांकडून राजाकडे नेहमीं अर्ज्या चालिल्या असत; त्यांत सारांश हा कीं, राजानें **फ्रेडेरिक** याचा पक्ष धरून त्यास पुनः आपले पदावर स्थापावें. **जेम्स** राजानें प्रथम अशी युक्ति केली कीं, तह करून आपले जांवयाची विपत्ति दूर करावी; परंतु तो वेत सिद्धीस जाईना असें पाहून प्रतिज्ञा केली कीं, मी आपले बाहुबळानें माझे जांवयास मुक्त करीन.

त्याप्रमाणें **स्पेन** देशाशीं युद्ध करावें, असा निश्चय ठरला; मग **हालंड** देशांत राजपुत्र **मारैस** उद्योग करीत होता, त्याचे मदतगारी करितां सहा हजार लोक तेथें पाठविले. तेव्हां राजाचें शौर्य पाहून **इंग्लिश** लोकांस परम आल्हाद झाला; कारण **पोप** याचे मतानुसाऱ्यांचें नुकसान करावयाकरितां कोणत्या तरी निमित्तानें लढाई

व्हावी, याविषयीं ते उत्सुक होते. या फौजेस दुसरें आणखीं **कौंट मानस्फेल्ट्** नामें एके सरदाराचें बारा हजार सैन्य येऊन मिळालें, आणि **फ्रेंच** दरबारानें मदतगारी कबूल केली; परंतु इतकें सर्व करून **इंग्लिश** यांचें मनोगत सिद्धीस गेलें नाहीं. तें असें. **इंग्लिश** लोक **डोवर** शहरीं गलबतावर बसून **क्यालेइस** शहरास जात होते, तेथें त्यांस आंत घ्यावें असा हुकूम नव्हता; ह्मणून ते **झीलंड** यांत गेले; तेथेंही त्यांची खालीं उतरायाची नीटशी सिद्धता नव्हती. तशांत दुसरा एक अनर्थ झाला. तो असा कीं, फौजेनें फार दिवस गलबतांत काढल्यामुळें कांहीं मोठा रोग उत्पन्न झाला; तेणेंकरून गलबतावरची अर्धी फौज नाश पावली; बाकी अर्धी राहिली ती घेऊन पुढें जातां येईना. या रीतीनें त्या उद्योगाची समाप्ति झाली.

**जेम्स** राजास शेवटीं यामुळें रोग झाला हें खचित नाहीं; परंतु पुढें त्यास दुखणें लागलें.

इ०स०१६२५ त्यास कितीएक मूर्छा येऊन तो पुढें अशक्त झाला. तेव्हां त्यानें आपले मुलास बोलावून उपदेश केला कीं, तूं **प्राटेस्टेंट** धर्मांत वाग. पुढें स्थिर चित्तानें मृत्यूची तयारी करून तो मेला. त्या वेळेस त्याचे वयास एकुणसाठावें वर्ष होतें. त्यानें बावीस वर्षेंपर्यंत **इंग्लंड** देशाचें राज्य केलें.

# प्रकरण २८.

## प्रथम चार्लस राजाची कथा.

सन् १६२५ पासून १६४८ पर्यंत.

राजा **चार्लस** जेव्हां राज्य करूं लागला, त्या वेळेस त्यास सर्व गोष्टी चांगल्या अनुकूळ होत्या. असें असतां त्यानें जीं पुढें दुःखें भोगिलीं तशीं कोणींच भोगिलीं नाहींत. प्रथम त्यांस असें वाटलें कीं, माझ्यावर लोकांची प्रीति आहे, त्या अर्थी मीं जें करीन तें निर्विघ्नपणें सिद्धीस जाईल. **चार्लस** याचा मेहुणा **प्रिन्स पालेटैन** त्यास राखावा; आणि त्याकरितां लढाई चालू झाली होती, ती या राज्यांत पुढें चालवावी, असें पूर्वीं ठरलेलें होतें; परंतु खर्चाचा विचार येऊन **कामन्स** युद्धाकरितां दोन वेळ द्रव्य द्यावयास कबूल झाले; परंतु तितकें द्रव्य त्या युद्धाच्या कामास पुरेना.

**पार्लमेंट** यापासून द्रव्य येण्याची कमती पडत चालली; त्याकरितां पूर्वींचे राजे संकट समयीं ज्या रितीनें द्रव्य उत्पन्न करीत, तसें राजा करूं लागला. याकरितां **बेनेवोलेन्स** ह्मणजे धर्मकर या नांवाचा एक नवा कर प्रजेवर बसविला, आणि त्याविषयीं शिक्के मोर्तबसुद्धां झालीं. हा नवा कर बसला त्यामुळें लोकांस फार असंतोष झाला; परंतु निरुपायामुळें त्यांस तो द्यावा लागला; कारण तो पूर्वीं बहुत वेळ दिलेला होता.

असें द्रव्य प्रजेपासून उत्पन्न करून एक वेळ राजानें **कांडिज** शहरीं जाऊन हल्ला केला, तो फुकट गेल्यावर पुनः पैका उत्पन्न करायाची पहिल्यापेक्षां कांहीं बरी अशी

एक युक्ति काढिली. मग दुसरें **पार्लमेंट** याची सभा केली; आणि पूर्वी **कामन्स** यांचे सभेंत जे प्रजेचा पक्ष घेऊन राजास प्रतिकूळ बोलत होते, त्यांस प्रांतोप्रांतींचे **शरीफ** करून सभेंतून काढिले; तथापि त्यांचे ठिकाणीं दुसरे जे नेव केले, ते त्यांपेक्षां अधिक आग्रह धरूं लागले. जेव्हां राजानें त्यांस कळविलें कीं, आपल्यास द्रव्याची गरज लागली आहे, तेव्हां त्यांनीं त्यास तीन वेळ द्रव्य दिलें, तें सर्व मिळून एक लक्ष साठ हजार **पौंड** झालें; इतकें द्रव्य त्याचे उद्योगास फार कमती होतें. मग पुष्कळ द्रव्य काढावयाकरितां नियय केला कीं, **रोमन क्याथोलिक** लोकांस प्रतिबंधकारक जे पूर्वीचे कायदे आहेत ते मोडावे. मग तो **चार्लस** राजा, राज्यांतील कुलीन सभासद लोकांकडून पैका कर्ज काढूं लागला; परंतु तशा रितीनें बहुत एकदांच हातास येईना. ह्मणून या सर्व गोष्टीं टाकून राजानें गांवांवर गलबतांचा कर बसविला. तो असा. राजानें हुकूम करावा कीं, अमुक बंदरांतून इतकीं गलबतें लढायास सिद्धकरून पाठवून द्यावीं; ह्मणजे त्या आज्ञेप्रमाणें जवळचे गांवाची मदत घेऊन त्या बंदरचे लोकांनीं तितकी पाठवून द्यावी. **लंडन** शहरावर वीस गलबतांचा कर बसला. या रितीनें हा जो कर बसविला, तो शेवटीं फार वाढून त्यापासून मोठा अनर्थ झाला.

कांहीं दिवसांनंतर **फ्रेंच** यांशीं युद्ध करावें, असा निश्चय ठरला; ह्मणून **ड्युक बकिंगम** यांजवळ बहुत गलबतें देऊन त्यास **रोशेल** शहर घ्यावयाकरितां पाठविलें. हें शहर **फ्रेंच** यांचे मुलुखांतलें खरें; परंतु कांहीं दिवसपर्यंत तेथून त्यांचा अंमल निघाला होता; आणि त्या शह-

रांतले लोकांनीं नूतन धर्म घेतला होता; ह्मणून त्या शहरावर जाऊन मोठी फौज पडली. अशी सोई असतांही तो **ड्युक** यानें फार मूर्खपणा केला; त्यामुळें लोकांनीं त्रासून शहरचे दरवाजे लाविले; आणि त्यास आंत घेतलें नाहीं; कारण **इंग्लिश** आपले मदतीस येतात, हें त्यांस अगोदर समजलें नाहीं. **ऑलीरान** बेटांतील जमीन चांगली होती, आणि तेथें कांहीं बंदोबस्त नव्हता. ह्मणून तो **ड्युक** यानें जाऊन तेथें हल्ला करावा, तो न करितां दुसरें **री** ह्मणून चांगलें बंदोबस्ताचें ठिकाण होतें, तेथें तो गेला; आणि मसलत केली कीं, **सेंट मार्टिन** याच्या किल्ल्यांतले लोकांस धान्यादिकांचा तोटा पाडून उपाशीं मारावें. परंतु त्यांस समुद्राचे वाटेनें पुष्कळ सामान पोंहोचत असे. त्या वेळेस **फ्रेंच** यांनीं बेटाचे दुसरे बाजूकडून लोक आंत शिरविले. ह्मणून शेवटीं **बाकिंगम** यास पळून जाणें प्राप्त झालें. तें इतके त्वरेनें कीं, त्याची फौज गलबतावर चढावयाचे अगोदर तींतून दोन तृतीयांश मारिले गेले. तो **ड्युक** असा धीराचा मनुष्य होता कीं, सगळ्यांचे मागून तो गलबतावर चढला. तो शूर होता खरा; परंतु त्याचे शौर्येंकरून राज्याची अपकीर्त्ति झाली.

पुढें उत्तरोत्तर राजा आणि **कामन्स** यांमध्यें तंटा फारच वाढला. जकातीचे अधिकाऱ्यांस बोलावून आणून **कामन्स** यांनीं चौकशी केली कीं, जे व्यापारी जकात देईनात त्यांची संपत्ति तुह्मी कोणाचे हुकुमानें जप्त केलीत? तो कर बसविण्यास सरकारचा हुकूम नसतां, त्याविषयीं तुह्मी कशावरून हुकूम केलात? असें कर घेणारे जे मुख्य अधिकारी होते, त्यांस विचारिलें आणि अरमारांचे

अधिकाऱ्यास सहाय झाला, याकरितां **लंडन शहरचा शेरिफ** यास किल्ल्यावर टाकिला. **कामन्स** यांनीं दुसरा

इ०स० १६२९ एक असा बेत केला कीं, धर्मसंबंधी जे कोणावर काय जुलूम असतील त्यांची चौकशी करावी, तेव्हां राजानें **पार्लमेंट** आपल्यास आवरत नाहीं ह्मणून त्यास निरोप दिला. त्या राजाचे सांगण्यावरून **कामन्स** यांचे सभेंत एक **सर जान फिंच** ह्मणून गृहस्थ होता, त्यानें जकातीविषयीं गोष्ट निघत होती, इतक्यांत राजाचा निरोप सांगितला कीं, सभेस उठून जाण्याचा निरोप झाला.

हा निरोप ऐकतांच अकस्मात् सर्व सभेंत गलबला झाला. सभेंतील मुख्यास **हालिस** आणि **वालेंटन** या नांवाच्या दोन पुरूषांनीं खुर्चीवर बसून गच्च दाबून धरिलें; शेवटीं सर्वांच्या संमतानें ती गडबड बंद झाली. तशा घाईंत **पोप** याचे मताचे लोक आणि **आर्मिनियन** हे सरकारचे शत्रु असें ठरले. नवे कर बसविले होते, ते न्यायविरुद्ध असा निश्चय केला; आणि ज्यांनीं ते कर घेतले, ते आणि ज्यांनीं दिले ते या दोघांसही अपराधी केलें. असे अविचारीपणा करितां **पार्लमेंट** याचे सभेंतले गृहस्थ **सर मैल्स हार्बर्ट, सर पीटर, हेमान सेल्डन, कारिटन्, लांग** आणि **स्त्रोड**, यांस राजानें धरून कैदेंत टाकिलें. **सर जान एलियट्, हालिस**, आणि **वालेंटन** या नांवाचे तिघांस **किंगसबेंचें कोर्ट** यांत येण्याकरितां बोलावूं पाठविलें; परंतु ते ह्मणाले कीं, आह्मी उंच दरबारांत जे अन्याय केले त्यांचा जाब हलके दरबारांत येऊन करणार नाहीं. ह्मणून असा हुकूम केला कीं, राजाचे मर्जीस

येईल तोंपर्यंत त्यांस बंदींत ठेवावें; आणि पहिल्या दोघांपासून हजार हजार **पौंड** दंड घ्यावा, शेवटच्याकडून **पांचशें** घ्यावा, आणि जामीन घेऊन सोडून द्यावे. सभासद, आपणास अशीं दुःखें होतात ह्मणून आनंद पावत; आणि लोक त्यांचे धैर्याची स्तुति करीत.

असा **कामन्स** यांचा आग्रह पाहून राजा संकटांत पडला. तशांत त्याचा परम स्नेही **ड्युक बकिंगम** होता तो मेला, तेणेंकरून त्याचे मनांत फारच दुःख झालें. तो **ड्युक** मरायाचें कारण असें झालें. **रोशेल** शहराचा वेढा उठवावा अशी राज्यांत मसलत झाली, ती सिद्धीस न्यावयास **अर्ल डेन्बी, ड्युक** याचा मेहुणा पाठविला. त्याचे हातून कांहीं न होतां तो परत आला. ही अप्रतिष्ठा झाली, ह्मणून **बकिंगम** यास चीड येऊन तो दुसऱ्यानें हल्ला करावयाकरितां **पोर्टस्मौथ** शहरास गेला, या गृहस्थाचा सर्वांशीं द्वेष होता, आणि लोक त्यास आपला वैरी समजत होते, ह्मणून कोणी तरी, त्यास अकस्मात् अपघात करील अशी शंका होती. शेवटीं तसेंच झालें. **फेल्टन** या नांवाचा कोणी एक संभावित **ऐरिश** कुळांतला गृहस्थ **ड्युक** याचे हाताखालीं **लेफ्टेनंट** याचे कामावर होता; त्यावर जो **क्याप्टन** होता, तो रे बेटांत मेला; ह्मणून ती जागा **फेल्टन** यास मिळावी, असें असतां **ड्युक** यानें तीवर त्याची नेमणूक केली नाहीं; यामुळें त्रासून त्यानें तो उद्योग सोडिला. हा गृहस्थ विचारी, शूर, आणि उतावीळ होता; त्यास असें वाटत असे कीं, सर्वदेश इतकें दुःख भोगितो आहे, हें मी प्रयत्न केला असतां दूर होईल, ह्मणून त्यानें निश्चय केला कीं, **ड्युक** यास ठार मारावें,

ह्मणजे आपण त्याचा सूड उगवला असें होईल, ईश्वराची सेवा घडेल, आणि लोकांवर उपकार होतील. असा निश्चय करून तो एकटा **पोर्टस्मौथ** शहरास चालत गेला, तेथें **ड्युक** या सभोंवती फौज होती, आणि तो गलबतावर चढावयास हुकूम देत होता. तो एके चाकराचे खांद्यावर टेंकून आपला **कर्नल** याशीं बोलत असतां **फेल्टन** यानें त्याचे पोटांत सुरी भोंसकली. **ड्युक** इतकें मात्र ह्मणाला, "अरे त्या लवाडानें मला ठार मारिलें." असें ह्मणून तो **कर्नल** याचे पायांजवळ पडला. आणि तत्क्षणीं मृत्यु पावला. **ड्युक** यावर वार केला, हें किंवा तो कोणी केला, हें कोणएकाचे नजरेस आलें नाहीं; आणि सगळे शोध करूं लागले; इतक्यांत एक टोपी सांपडली ती उचलून पहातात, तों आंत एक कागद शिवलेला आहे; त्या कागदांत प्रतिनिधी जो **ड्युक** यावर आरोप ठेवीत असत, त्या अन्वयें चार पांच ओळी लिहिलेल्या होत्या. त्यावरून असा तर्क केला कीं, ज्यानें **ड्युक** यास मारिलें, त्याची ती टोपी असावी. मग ती टोपी कोणाची असा शोध करिताहेत, इतक्यांत एक बोडका पुरुष दरवाजांतून निर्भयपणें जात होता, तो बोलिला, "मी अरे मी!" त्यास त्या कर्माचा मोठा संतोष झाला होता, ह्मणून त्यास ना कबूल जाण्याचें प्रयोजन राहिलें नाहीं; आणि स्वतः तो बोलिला कीं, **ड्युक** सर्व देशाचा शत्रु होता, ह्मणून त्याची जी अवस्था झाली ती त्याचे कर्मास योग्य होय. मग त्यास पुसलें कीं, तूं कोणाचे सांगण्यावरून **ड्युक** यास मारिलें? त्यानें उत्तर केलें कीं, तुह्मी ही चौकशी करून आपणांस उगीच कां श्रम देतां? माझ्या जें मनांत आलें तें मीं केलें, आणि या

पृथ्वीवर जितके पुरुष आहेत तितक्यांच्या सांगण्यानेंही, मी माझे मनांत आलेलें कधीं मोडणार नाहीं. पुढें शेव-टपर्यंत जें जें दुःख झालें, तें तें त्यानें असे रीतीचे धैर्यानें सोसलें. त्यामुळें बहुत लोकांनीं त्याचे धीराची तशीच त्याचे कर्माची स्तुति केली.

राजास मंत्री, आणि **पार्लमेंट** हीं दोन्ही नाहींशीं झाल्यावर, त्यानें प्रथम जी मसलत केली, ती चांगलीच केली. ती ही कीं, **फ्रान्स** आणि **स्पेन** या दोन

इ०स०१६२९

राज्यांशीं जी निरर्थक लढाई आरंभिली होती आणि जीपासून कांहीं फळ झालें नाहीं, ती बंद करून त्यांशीं तह केला. या रीतीनें त्या गडबडींतून सुटल्यावर, राजा राज्यांत बंदो-बस्त राखावयाविषयीं उद्योग करूं लागला. त्यानें आप-ल्यास मदत करणारे, परंतु आपले आज्ञेंतले असे दोघे पुरुष घेतले. त्यांचीं नांवें **सर टामस वेंत्वर्थ** (जो पुढें **स्त्राफर्ड** याचा **अर्ल** झाला होता) आणि **लाड** ज्यास पुढें **क्यांतबरी** एथील **आर्चबिशप** याचें स्थानावर नेमिला होता. **लाड** यानें धर्मसंबंधी कामकाजाचा बंदोबस्त राखिला होता; आणि राजा व अर्ल, **स्त्राफर्ड** हे राज्य-कारभार करीत असत. मग लवकरच एक अशी खबर जाहीर केली कीं, त्या राज्यांत पुढें **पार्लमेंट** यांच्या सभा होणार नाहींत.

**टानेज** आणि **पौंडेज** या नांवाचे कर राजाच्या हुकुमाव-रूनच लोकांवर बसविले; जकातीवरचे कामगारांस अमा-त्यांच्या सभेंतून हुकूम गेलें कीं, कोणाचे घरांत जकात न दिलेला माल आहे, असें समजलें म्हणजे त्याचे घरांत जाऊन शिरावें. **पोप** याचे मताचे लोकांशीं करार केले, आणि

त्याचे धर्मापासून बेतानें वसूल उत्पन्न करूं लागले. पुढें **स्तारचेंबर** या नावाचें राजानें स्थापिलेलें **कोर्ट** यांत कायद्यांचा संबंध न ठेवितां कितीएक निर्भय स्वतंत्र पुरूषांचीं शासनें झालीं. ते आपण दुःख पावून, सरकारची दुष्कीर्ति होते, ह्मणून आनंद पावत असत. **प्रिन्न** ह्मणून **बारिस्तर** होता तो, **बर्टन** नामें एक धर्मोपदेशक, आणि **वास्त्विक** या नांवाचा वैद्य होता तो, या तिघांची चौकशी होऊन असें ठरलें कीं, त्यांनीं **इंग्लंड** यांतील धर्मपक्षाचे आचाराचे विरूद्ध लिहून त्यांनीं प्रसिद्ध केलें. ह्मणून त्यांस हें शासन मिळालें कीं, **पिलरी** यांत मान घालावी, कान कापावे, आणि पांच हजार **पौंड** दंड घ्यावा.

गलबतांचा कर लोकांवर राजा वसवीत चालिला. **बकिंगम** प्रांतांत **जान हांप्डेन** ह्मणून संपत्तिवान् गृहस्थ होता तो हा कर देईना; आणि ह्मणूं लागला कीं, या गोष्टीची मी **कोर्ट** यांत चौकशी करणार. त्यास वीस **शिलिंग** कर द्यावयाचा लागणार होता, तो तितकेंही देईना. मग **इंग्लंड** यांतले सर्व न्यायाधीशापुढें त्या गोष्टीविषयीं बारा दिवस वाद चालिला होता. ती गोष्ट ठरविली, ह्मणजे राजाची सत्ता खचित व्हावी असें होतें; ह्मणून लोक वाट पहात होते कीं पुढें काय होतें. चार खेरीज करून बाकीचे सर्व न्यायाधीशांनीं सरकारचे पक्षाचा हुकूम दिला. इकडे **हांप्डेन** हरला, परंतु लोकांनीं स्तुति केली, हा त्यास मोठा लाभ झाला.

राजा **चार्लिस** इंग्लंड यांत धर्माध्यक्षांचें मुख्यत्व करूं लागला तें लोकांस आवडलें नाहीं, आणि त्यांनीं त्यास अटकाव केला, तरीं त्यानें तें **स्कादलंड** यांत चालू

करावयाचा उद्योग आरंभिला. तेथेंही लोकांस त्याचा बहुतकरून तिरस्कार होता. त्यानें असा हुकूम केला कीं, एडिंबर्ग शहरांतले मुख्य देवळांत लिटर्जी वाचावे. हा हुकूम पाहून लोकांच्या मनांस फार संताप झाला. पूर्वींपासूनच त्या मुलखांतले लोकांचा राजाशीं कपटभाव आंतून होताच; परंतु आतां तो बाहेर फुटला, सारे लोक बंडास सामील झाले, आणि स्काच लोकांनीं मोठ्या संतापानें युद्धाची तयारी केली.

इतकें झालें तरीं आपला बेत मोडावा असें राजाचे मनांत येईना, आणि त्यास वाटत असें कीं, राजा असें एक वेळ नांव घेतलें, ह्मणजे लोक आपल्या स्वाधीन होतील. ह्मणून त्यानें लढाई सोडून दिली; आणि त्यांशीं तह करूं लागला; उभयपक्षीं लढाई बंद करावी असें ठरविलें, आणि तह झाला; परंतु त्याप्रमाणें चालावें असें दोघांतून एकाच्याही मनांत नव्हतें. तथापि फौज दूर करावी, अशी दोघांनींही कबुलात केली. पुढें पुष्कळ तंटा झाला, बहुत तहनामे होऊन गेले; आणि पुनः लढाईची सिद्धता झाली. राजास ही लढाई करणें जरूर झालें; ह्मणून त्यानें पहिले सारिखा पैका काढावयाची मसलत आरंभिली. जहाजांचा कर, आणि दुसरे कितीएक कर लोकांवर बसविले; त्यानें लोक फार दुःख पावूं लागले; परंतु तितकेंही पुरेना असें होऊन पार्लमेंट यांचे द्वारें पैका काढावा अशी मसलत ठरली.

नवी कामन्स यांची सभा बोलाविली. परंतु त्याच्यानें स्काच लोक राजाचे शत्रु असें ह्मणवेना. कारण कीं, पार्लमेंट याचा विचार आणि त्यांचा विचार एकच होता.

ह्मणून त्यांपासून राजास दुसरें कांहीं प्राप्त झालें नाहीं. त्यांचा द्वेष मात्र वाढत चालला. तो पैका काढावयाची जी रीति योजी, तीस ते **कामन्स** जुलूम, आणि कायद्यास विरूद्ध असें ठरवीत. ह्मणून राजानें त्या **पार्लमेंट** सभेस निरोप दिला; आणि पैका काढावयाचा कांहीं दुसरा उपाय करण्याचा निश्चय केला.

तरी त्यास गरज होती ती संपेना; ह्मणून त्यानें फिरून **पार्लमेंट** याची नवी सभा नेमिली; जी राज्य रीतीचा नाश होईपर्यंत उठलीच नाहीं. त्या सभेनें त्याच वेळेस कामास लागून, जो पैका पाहिजे होता त्याचा विचार एकीकडे ठेवून राजाचा मुख्य प्रधान जो **अर्ल स्त्राफर्ड** यावर **लार्ड** सभेंत दोष आणिला; त्यानें शत्रूंस कुंठित केलें असतांही तो अपराधी ठरला, इतकें मात्र बाकी राहिलें होतें कीं, राजानें त्या गुन्हेगाराचे पत्रास संमती द्यावी. **चार्लस** राजाची **स्त्राफर्ड** यावर फार प्रीति होती; ह्मणून त्यानें त्याचे शिरच्छेद पत्रावर सही घालायास विलंब केला.

राजाचें मन फार व्यग्र झालें, आणि पुढें काय करावें तें त्यास सुचेना; अशा समयीं तो अपराधी **लार्ड** यानें एक मोठ्या धीराचें कर्म केलें, तेणेंकरून राजाची चिंता गेली. तें कर्म असें. त्यानें राजास एक पत्र पाठवून कळविलें कीं, तुमची आणि प्रजांची एकी होत असल्यास माझा जीव गेला असतां चिंता नाहीं; मी मृत्यूस सिद्ध आहें; आणि एखाद्याचे मर्जीप्रमाणें गोष्ट केली असतां त्यास कांहीं दोष नाहीं. ही त्यानें उदार मनाची प्रचीति दाखविली, परंतु राजानें त्याप्रमाणें वर्तणूक केली नाहीं,

आणि त्यानें लिहिलें होतें तसें केलें. त्यानें त्या शिरच्छेद पत्रावर सही केली. मग किल्ल्यावर अर्ल याचा शिरच्छेद झाला. त्या वेळेसही त्यानें स्वस्थ मनानें आचरण केलें. पुढें राजाच्या मर्जीनें ज्या दोन अदालती स्थापिल्या होत्या, त्या मोडावयाचा उद्योग आरंभिला. त्यांचीं नांवें हैकमिशन कोर्ट आणि स्तार्चेंबर कोर्ट हीं दोन्ही मोडावीं, आणि राजाची सत्ता बहुधा कमी करावी; असा हुकूम दोन्ही सभांच्या संमतानें ठरला.

इंग्लंड देशांत असा भयंकर समय आला असतां अयर्लंड एथील पोप मताचे लोकांस आशा उत्पन्न झाली कीं, या संधीस इंग्लिश लोक राज्यांतून नाहीं असें केलें तर होईल. ह्मणून त्यांनीं असा बेत केला कीं, एकदाच राज्यांतले सर्व प्राटेस्तंट मारून टाकावे. तसें त्यांनीं करून सुमारें चाळीस हजार लोक ठार मारिले. त्या वेळेस वय, जाति, आणि स्थिति, यांपासून लोकांचें रक्षण झालें नाहीं. त्या अविचारी सर्व वधांत पूर्वींचा संबंध, उपकारशक्ति, यांहींकरून बचाव झाला नाहीं. कितीएकांनीं आपले स्नेही, कितीएकांनीं सोयरे, आणि कितीएकांनीं आपले धनी मारिले. पळूनही लोक वांचले नाहींत; जे पळाले होते त्यांसही जिकडे तिकडे जाऊन धरिलें.

या घोर कर्माचा आपल्यास तिरस्कार आहे असें राजानें सर्व प्रकारें दाखविलें; परंतु तें मोडावयास आपल्यास सामर्थ्य नाहीं, असें पाहून त्यानें पार्लमेंट सभेस द्रव्याचे पुराव्याविषयीं प्रार्थना केली; परंतु त्याची फार निराशा झाली; कारण पार्लमेंट सभेंत असें ठरलें कीं, राजानें तें बंड वृद्धिंगत केलें, आणि राज्यांत मोठमोठीं बंडे असतां

बाहेरचीं मोडावयाकरितां पैका खरचण्याचें प्रयोजन नाहीं. **पार्लमेंट** त्या समयीं कांहीं ऐकेना असें झालें.

त्या समयीं **पार्लमेंट** सभेची बुद्धि प्रजासत्ताक राज्य करावें अशी झाली, हें उघड दिसून आलें; कारण ती सभा राजाचे अपराधांची चौकशी एकीकडे ठेवून राज्यसत्ताक राज्यच बुडवावें असें इच्छूं लागली.

इ०स०१६४१

या मसलतींत जे मुख्य होते त्यांनीं प्रथम धर्मपक्ष मोडण्याचा उद्योग आरंभिला; कारण धर्मपक्षाचें राज्यास मोठें बळ होतें. **पार्लमेंट** सभेच्या संमतीवांचून धर्मसंबंधी कायदे केले, हा अपराध ठेवून त्यांनीं तेरा धर्माध्यक्षांस सरकार गुन्हेगार ठरविलें; आणि **लार्ड** सभेस भीड घातली कीं, तुमच्या सभेंत जे धर्माध्यक्ष आहेत त्यांस काढून टाकावें. हा आपल्यास संकट समय येणार असें पाहून पूर्वींच धर्माध्यक्षांनीं निश्चय केला कीं, आतां आपलीं **लार्ड** सभेंतलीं स्थानें सोडून द्यावीं.

यापासून राजाचा फार नाश झाला; परंतु पुढें राजानें आपले अविचारानें यापेक्षां अधिक करून घेतला. राजा **चार्लस** फार दिवसपर्यंत आपला राग आवरून **कामन्स** ह्मणतील तसें ऐकून त्यांस संतुष्ट करावें अशा प्रयत्नांत होता, परंतु जितकें जितकें आपण होय ह्मणावें तितका ते अधिकच आग्रह धरितात असें पाहून त्यास राग आटोपेना असा झाला. त्यानें आपला **हर्बर्ट** नामें **आटर्नीजनरल** होता, त्यास आज्ञा केली कीं, **लार्ड** सभेंतील **लार्ड किंबोल्टन**, ज्यावर लोकांची फार प्रीति होती; आणि **कामन्स** सभेंतील **सर आर्थर हेस्लरींग, हालिस, हांप्डन, पिम**, आणि **स्त्रोड**; हे पांच गृहस्थ यांवर सरकार गुन्हे-

गारीचा आरोप सभेंत ठेवावा. हा आरोप ठेवावयास सबब ही कीं, त्यांनीं राज्याचे मूळ नियम, आणि रीति, यांचा नाश करावयाचा, राजाचा अख्त्यार बुडवायाचा आणि लोकांवर जुलूम करावयाचा उद्योग आरंभिला. ही अविचारी मसलत पाहून लोक नुकते विस्मय करीत होते; इतक्यांत यापेक्षां अधिक अविचाराची दुसरी एक झाली, ती त्यांचें दृष्टीस पडली. ती अशी कीं, दुसरे दिवशीं राजा स्वतः एकटा **कामन्स** यांचे सभेंत चालला; तें पाहून ते सर्व सभासद त्याचा आदर करावयाकरितां उठून उभे राहिले. त्या सभेंतील मुख्यानें आपलें स्थळ सोडिलें, त्या ठिकाणीं जाऊन राजा बसला. मग कांहीं वेळपर्यंत सभोंवतें पाहून त्यानें सभेस सांगितलें कीं, आज मला येथें येण्याचें अवश्यक कारण पडलें ह्मणून मला वाईट वाटलें; तें कारण हें कीं, मी ज्यांवर सरकार गुन्हेगारी ठरविली; त्यांस तुह्मी स्वाधीन करणार नाहीं; ह्मणून मी त्यांस धरावयास एथें आलों. ते पुरुष तेथें होते कीं नाहीं हें त्यानें पाहिलें; परंतु तो यावयाचे पूर्वीं कांहीं वेळ ते पळून गेले होते. अशी निराशा झाल्यामुळें तो घाबरून गेला, कोणावर विश्वास ठेवावा हें त्यास कळेना, असें होऊन तो **कामन्‌कौन्‌सिल** यांत चालला, तों वाटेनें लोकांनीं जुलूम जुलूम असा गोंगाट केला. तो **कौन्सिल** याजवळ आपली गोष्ट सांगूं लागला; परंतु त्यांनीं उगीच राहून त्याचा अपमान केला. मग तो निघून वाड्यांत जात असतां, एका दांडग्यानें ह्मटलें, "तुमच्या डेऱ्यांत चलावें, इस्राइल लोक हो." जेव्हां याहुदी लोक आपले राजास सोडीत तेव्हां असें ह्मणत.

विड्ड्स एथें परत आल्यावर राजाचे मनांत पश्चात्ताप झाला कीं, मी आजपर्यंत फार अविचारानें चाललों. तर पुढें कांहीं तरी नीट चालावें ह्मणून त्यानें **पार्लमेंट** सभेस लिहून पाठविलें कीं, आरोप ठेविलेले सभासदांचें शासन करावयाची मसलत मी सोडून दिली, आणि पुढें मी माझा प्राण आणि राज्य यांसारिखें तुमचे सत्तेचें संरक्षण करीन. मागें जुलूम केल्यामुळें **कामन्स** यांस तो दुष्ट वाटत होता; आणि जेव्हां अशी मान्यतेची गोष्ट निघाली तेव्हां त्यांस तो नीचही वाटूं लागला.

या काळापर्यंत सरदार नेमणें, आणि फौज जमा करणें इतकें राजाजवळ होतें. **पोप** मताचे भयानें **कामन्स** यांनीं राजास अर्जी केली कीं, शहरचा किल्ला आमचे स्वाधीन व्हावा; आणि **पोर्टस्मौथ**, आणि सरकारी अरमार हीं आह्मीं नेमूं त्या पुरुषांचे हस्तगत करावीं. हा अर्ज मान्य केला असतां जुने राज्य नीतींतलें कांहीं राहाणार नाहीं, असें वाटून राजानें प्रथम ऐकिला नाहीं; परंतु निरुपाय होऊन, त्यानें त्याप्रमाणें केलें.

पुढें **कामन्स** यांनीं असें आरंभिलें कीं, राजा जितकें अधिक ऐकेल तितकें अधिक अधिकच मागावें, ह्मणून वर सांगितली विनंती राजानें मान्य केल्यावर त्यांनीं बोलणें लाविलें कीं, सरकारी फौज आमचे जवळ असावी, आणि आह्मी सांगूं त्या सरदारानीं तिचा बंदोबस्त ठेवावा; कारण आह्मास **पोप** मताचे ऐरिश लोकांचें भय फार वाटतें, तें दूर करण्याचे उपाय आह्मी करणार.

हें ऐकतांच एथें **चार्लस** राजानें होयकार द्यावयाचा बंद केला; तेव्हां पुनः त्यांनीं त्यास विनंती केली कीं, असुक

वेळपर्यंत तरी सैन्याचा धनीपणा तुह्मी आमचे पाशीं द्यावा. तें ऐकून त्यानें अतिशय संतापून उत्तर दिलें कीं, "एक तासपर्यंतही देणार नाहीं." या नकारावरून पुढें राजा आणि प्रजा यांचा सल्ला होईल असें राहिलें नाहीं; आणि उभयपक्षीं लढाई करावयाचा निश्चय झाला.

या समयीं बहुत बुद्धिवान् लोक उत्पन्न झाले; आणि मुलुखांतील गडबडीमुळें हलके लोक थोर पदवीस चढूं लागले. उभयपक्षांकडून जाहीर खबरा प्रसिद्ध होऊं लागल्या; आणि लोकांचे उघड दोन पक्ष झाले, त्यांचीं नांवें **क्यावेलियर्स** आणि **रौंड हेडस्.**

इ० स० १६४२

राजाची फौज त्या समयीं फार थोडी होती; तीवांचून **सर जान डिग्बी ह्मणून शेरीफ** होता, त्यानेंही कांहीं जमविली होती, ती सर्व मिळून तीनशें पायदळही जमलें नाहीं. त्याचें मुख्य बळ काय तें घोडेस्वार होते, परंतु तेही आठशांवर नव्हते; आणि त्यांजवळ सामान चांगलें नव्हतें. पुढें त्यास चहूंकडून फौज येऊन मिळाली, परंतु तितक्यानें शत्रूंचें निवारण होणार नाहीं, असें पाहून तो लहान लहान मजला करून **डर्बी** शहरास गेला; आणि तेथून **श्रूस्बरी** शहरास गेला; कारण कीं तिकडे त्याचे स्नेही होते त्यांचें संरक्षण व्हावें.

त्या समयीं **पार्लमेंट** ही आपणाकडून तयारी करण्यांत कमती करीत नव्हतें; त्या सभेची हल्ल शहरांत सामानसुमानानें भरलेली एक वखार होती. त्या शहरचा अंमल **सर जान होथम** या नांवाच्या पुरुषास दिला होता. पूर्वी **ऐरिश** लोकांचे पराजयासाठीं जी जिकडे तिकडे फौज

जमविली होती, ती त्या वेळेस उघड कामास लाविली. त्या फौजेचा सरदार **अर्ल एसेक्स** यास केला होता; जो पुरुष शूर असून राजाची सत्ता कमी व्हावी अशी इच्छा करीत असे; परंतु राजसत्ताक राज्य केवळ बुडावें, हें त्याचे मनांत नव्हतें. तेव्हां एकेच दिवशीं **लंडन** शहरांत सुमारें चार हजार लोकांचीं नांवें लिहून त्यास चाकरीस ठेविलें.

**एज्‌हिल्** ह्मणून एक ठिकाण होतें, तेथें प्रथम दोन्ही फौजांची गांठ पडून आंतले आंत लढाईमुळें देश ओसाड पडावयाचा आरंभ झाला. आपले पराक्रमाचा उपयोग बाहेर करावा तें टाकून, सर्व पृथ्वींत ज्यासारिखे दुसरे शूर नाहींत, असे सुमारें तीस हजार लोक आंतले आंत भांडतात; तसेच अत्यंत स्नेही आणि जवळचे नात्याचे गृहस्थ विरुद्ध पक्षाचा अभिमान धरून आपली आंतली प्रीति विसरून एकमेकांचें वाईट इच्छितात; या गोष्टी किती भयंकर, तरी त्या ठिकाणीं कांहीं घटिकापर्यंत लढाई झाली, आणि उभयपक्षींचे लोक सारिखे पडले, मग दोघेही कंटाळले. या लढाईंत सर्व मिळून पांच हजार लोक मेले असें सांगतात.

पुढें हीं सैन्यें कोठून कोठें गेलीं याचा विस्तार सांगावयाचें एथें प्रयोजन नाहीं. नंतर राणी **हालंड** देशांतून फौज आणि सामानसुमान घेऊन राजपक्षास बळकटी आणावयाकरितां आली; आणि दुसरी आणावयाकरितां पुनः लागलीच गेली; परंतु **पार्लमेंट** सभेची आपले फौजेविषयीं आणि पराक्रमाविषयीं खातरी होती, ह्मणून त्यांची उमेद अगदीं गेली नाहीं. जितकी जितकी त्यांची नुक-

सानीं झाली तसें तसें त्यांचें बोलणें वाढत चाललें; आणि त्यांचा युद्धांत पराजय झाला ह्मणून ते दरबारांत फारच आग्रह धरूं लागले. ज्या अमलदारांनीं किल्ले राजाच्या स्वाधीन केले होते त्यांस सरकार गुन्हेगार ठरविलें. आपली कांहीं फत्ते झाली ह्मणजे राजा तहाचें बोलणें करावयास लागे, परंतु **पार्लमेंट** फारच आग्रह धरी. जरी राजास आपले प्रजांशीं तह करण्याची इच्छा असावी हें चांगलें; तरी सरदारानें तहाचे उद्योगास लागून युद्धाचा समय घालवणें हें योग्य नव्हे. ज्या वेळांत राजानें लढाई करावी तो वेळ **आक्सफर्ड** शहरांत सल्याचे उद्योगांत गमाविला.

असें असतांही पहिले लढाईवरून तर बरीच त्यास आशा आली. पुढें अधिक अधिक राजाचा विजय होत चालिला; **कार्न्वाल** प्रांत त्याचे स्वाधीन झाला; **स्त्रेटिन्‌हिल** ठिकाणाजवळ **पार्लमेंट** पक्षाचा पराजय झाला; दुसरा एक **डिवैझिस** शहरापासून सुमारें कोशावर **रौंडवेडौन** ह्मणून ठिकाण आहे तेथें झाला; आणि सर्वांत चमत्काराचा **शाल्‌ग्रेवफील्ड** एथें झाला. **ब्रिस्तल** शहर राजानें वेढा घालून घेतलें. **ग्लौसेस्तर** याचेंही तसेंच केलें; तशीच **न्युबेरी** याजवळ जी लढाई झाली तींतही राजा जिंकला; आणि **मार्कुइस न्यूक्यास्तिल** यानें उत्तरेकडच्या प्रांतांत फौज जमविली त्यावरून राजास मोठी आशा आली.

या पहिल्या मारामारींत उभयपक्षींचा एक एक पुरुष अति पराक्रमी असा पडला. त्यांचीं नांवें **जान हांप्‌डेन** आणि **लुसिस केरी** किंवा **लार्ड फाल्कलंड**. **चार्लस**

याचा भाचा **रूपर्ड** होता, त्याशीं एक लहानशी लढाई झाली तींत पहिला पडला; आणि **न्यूबेरी** एथील लढाईंत दुसरा **हांप्डेन** गलबतांचाकर देईना ह्मणून पूर्वीं सांगितलें त्याप्रमाणेंच त्याचें पुढेंही आचरण असे, ह्मणून शत्रूही प्रशंसा करीत. भाषणामध्यें प्रौढता; वादामध्यें शांतता, युक्ति, आणि वक्तृत्व;आणि राज्य कारणाविषयीं सूक्ष्म बुद्धि, हे गुण त्यामध्यें असत.

यापेक्षां **फाल्क्लंड** यामध्यें गुण फार सरस होते. **हांप्डेन** किंचित् आग्रही होता; परंतु **फाल्क्लंड** यामध्यें पूर्वीं सांगितले गुण असून नम्रता आणि दरबारी डौल हेही होते. राजा जेव्हां उगीच फार सत्ता करीत होता, तेव्हां त्याचा पक्ष मोडावयासाठीं त्यानें बहुत यत्न केला; परंतु जेव्हां **पार्लमेंट** देशचें राज्य आणि धर्म हीं दोन्हीं बुडविणार असें त्यास समजलें, तेव्हां त्यानें राजाचा पक्ष दृढ धरिला. आंतले आंत लढाई होऊं लागली तेव्हांपासून त्याची हुशारी आणि उमेद गेली. त्यास तें मोठें दुःख झालें, त्यामुळें शरीर सुकलें, तो त्याची आस्था करीना, आणि मृत्यु लवकर यावा अशी इच्छा करूं लागला. तो आपले स्नेही मंडळींत बसला ह्मणजे बहुधा अगोदर कांहीं बोलत नसे, आणि एखादे वेळेस श्वास टाकून ह्मणे, "तह! तह!"लढाईचे दिवशीं सकाळीं तो बोललाकीं, मला आतां जीवाचा कंटाळा आला, ह्मणून मी आज संध्याकाळचे आंत प्राण सोडीन. असें बोलून लढाईंत गेल्यावर त्याचे पोटास गोळी लागून तो मरण पावला. त्याचा लेख, त्याची सभ्यता, प्रमाणिकपणा, आणि पराक्रम, या गुणांस जो मृत्यु योग्य तोच त्यास आला.

हिंवाळ्यांत पुढचे लढाईची तयारी करावी, आणि **वेस्तमिनस्तर** एथील **पार्लमेंट** सभेची मसलत सिद्धीस जाऊं नये; ह्मणून राजानें **आक्सफर्ड** शहरांत दुसरी एक नवी **पार्लमेंट** सभा बोलाविली. दोन **पार्लमेंट** सभा एके समयींच अशा **इंग्लंड** देशांत पूर्वीं कधीं झाल्या नव्हत्या. नवे **लार्ड** सभेंत बरेच गृहस्थ होते; परंतु **कामन्स** सभेंत एकशें चाळीस मात्र होते. त्याच्या दुप्पट लोक **लंडन** एथील **कामन्स** सभेंत होते. या **पार्लमेंट** सभेपासून त्यास कांहीं थोडासा पुरावा झाला. पुढें त्यानें तीस निरोप दिला; आणि पुनः कधीं त्यांची सभा केली नाहीं.

त्या वेळेस प्रजापक्षी **पार्लमेंट** सभेनें हुकूम ठरविला कीं, **लंडन** एथील लोकांनीं एक अठवड्यांत एक जेवण कमी कमी करावें; आणि त्याचा पैका सरकारास द्यावा. **स्काच्च** लोकांस आपली आणि **इंग्लिश** यांची स्थिति सारिखीच. असें वाटून त्यानीं **पार्लमेंट** याचे मदतीस कांहीं फौज पाठविली, तीपासून मोठें कार्य झालें. पूर्वेस **अर्ल मांचेस्तर** याचे हाताखालीं त्याचे पक्षाची चवदा हजार फौज होती; **एसेक्स** याचे हाताखालीं दहा हजार होती, आणि तितकीच **सर विलियम वालर** याजवळ होती. इतकी बळकट फौज जमवायाचें राजाचें सामर्थ्य नव्हतें, आणि त्या फौजेजवळ सामानाचा आणि दारू गोळ्याचा पुरावा होता; तसाच त्यांस दरमहाही चांगला पोंहोंचत होता.

हिंवाळ्यांतही ज्या लढाया केवळ बंद झाल्या नव्हत्या त्या उन्हाळ्यांत अधिक आवेशानें चालू झाल्या. त्यांपासून कोणाचा जय पराजय तर झाला नाहीं; परंतु राज्यांत मनुष्यांचा संहार मात्र झाला.

इ॰स॰ १६४४

फार परगण्यांनीं दोहोंतून एक पक्ष धरिला. कितीएक परगणे तह व्हावा ह्मणून वारंवार अर्ज्या करीत. एकदा असा चमत्कार झाला कीं, **लंडन** एथील सुमारें दोन तीन हजार बायका **कामन्स** सभेस जाऊन तह करावा, अशी मनापासून प्रार्थना करूं लागल्या. त्या बोलल्या, " ज्यास तह नको त्यांस आमचे स्वाधीन करा, त्या दुष्टांचे आह्मी फाडून तुकडे करूं." ती गडबड बंद करावयास चौकी-वाल्यांस कांहींसें संकट पडलें, आणि त्या दंग्यांत एक दोन बायकांचे जीवही गेले.

**मार्स्तन्मोर** ह्मणून एक स्थळ आहे, तेथें लढाई झाली, तेव्हांपासून राजास विपत्ति येऊं लागली. **स्काच** लो-कांची फौज आणि **पार्लमेंट** सभेची फौज या दोन्ही एकत्र मिळून **यार्क** शहरास वेढा घालीत होत्या; तो वेढा राजपुत्र **रूपर्ट** आणि **मार्कुइस न्युक्यास्त्ल** या दोघांनीं उठवावयाचा निश्चय केला. उभयपक्षींची मिळून सुमारें पन्नास हजार फौज **मार्स्तन्मोर** ठिकाणीं एकत्र होऊन लढाई सुरू झाली, परंतु बहुत वेळपर्यंत जय कोणाचा होतो हा निश्चय होईना. राजपक्षी सैन्याचे उजवे बाजूचा सरदार **रूपर्ट** होता, त्यावर **आलिवर क्राम्वेल** ह्मणून एक पुरुष मोठ्या बंदोबस्ताची फौज घेऊन आला. तेव्हां **क्राम्वेल** याचा विजय झाला, त्यानें शत्रूंस पळविलें, त्यांचे पाठीस लागला, पुनः लढाई केली, आणि पुनः विजय संपादिला. राजपुत्राचा सारा तोफखाना घेतला. या पराजयाचा सूड पुढें राजपक्षाच्यानें कधींही उगविला नाहीं.

या राज्याच्या प्रारंभीं **क्यांतर्बरी** एथील **आर्चबिशप**

**विलियम लार्ड** यास बंदींत ठेविलें होतें, त्याची आतां चौकशी करून शासन ठरविलें; आणि त्याचा शिरच्छेद केला. तो मेला त्याच दिवशीं **लिटर्जी** सरकारी हुकुमावरून रद्द केलें, आणि **इंग्लंड** एथील धर्म **प्युरिटन** संस्थानासारिखा केला. अशी चांगली उलटापालट झाली ह्मणून **इंग्लिश** आणि **स्काच** यांनीं उघड आनंद दाखविला.

**चार्ल्स** राजाचे दैवाचा निश्चय ज्या लढाईनें झाला, ती **नर्थंप्टन** प्रांतांत **नेस्बी** ह्मणून गांव आहे तेथें झाली. प्रारंभीं राजाचे फौजेचा जय होईल असें दिसलें, परंतु शेवटीं **क्राम्वेल** यानें येऊन त्याचा अगदीं पराजय केला. या रीतीनें लढाई केवळ हातांतून गेली पाहून राजा पळून गेला. मग शत्रूंनीं त्याचें बुणगें, आणि तोफा घेतल्या. त्या वेळीं सुमारें पांच हजार बंदिवान धरिले गेले.

इ०स० १६४५ जुन

**नेस्बी** एथील लढाईपासून **ब्रिस्तल, ब्रिज्वाटर, चेस्तर, शार्बोन,** आणि **बाथ** इत्यादि मुख्यमुख्य शहरें **पार्लमेंट** सभेचे हातीं आलीं. **एक्सीटर** शहरास वेढा घातला; तेव्हां पश्चिम तालुक्यांतील राजाची फौज जिकडे तिकडे होती, ह्मणून **फेर्फाक्स्** यानें फार निकडीचा हल्ला केला, तेव्हां तें शहर आपाप स्वाधीन झालें. असा चहूंकडून कोंडल्यामुळें राजा निरुपाय होऊन **आक्स्फर्ड** शहरांत गेला, आणि पुनः तहाचे उद्योगास लागला.

त्या समयीं **फेर्फाक्स्** विजय पावून मोठी बळकट फौज बरोबर घेऊन **आक्स्फर्ड** शहरावर हल्ला करावयाच्या बेतांत होता; आणि तें शहरही त्यास साध्य व्हावयास उशीर न लागावा असें होतें. दुष्ट प्रजांनीं आपल्यास

धरून आनंदानें घेऊन जावें, या गोष्टीचा **चार्लस** राजास मोठा तिरस्कार होता, कारण, असें झाल्यावर शिपाईलोक काय करितील याचें प्रमाण नाहीं, ह्मणून त्याचे मनांत भय होतें. अशा विपत्तींत त्यानें निश्चय केला कीं, **स्काच** लोकांचा आपणाशीं विशेष द्वेष दृष्टीस आला नाहीं, ह्मणून त्यांचे स्वाधीन व्हावें. तो त्यांचे स्वाधीन झाल्यावर ते त्यास लवकरच बंदिवानासारिखा मोजूं लागले.

राजा सांपडला ही बातमी समजतांच **पार्लमेंट** सभेनें राजा आपणांकडे घेण्याविषयीं **स्काच** लोकांशीं बोलणें लाविलें. शेवटीं चार लाख **पौंड** देऊन राजास आपले जवळ आणिलें. असें निंद्य कर्म केल्यामुळें जे चांगले लोक होते, ते **पार्लमेंट** सभेची फार निंदा करूं लागले.

लढाई संपली; राजानें आपले पक्षाचे लोकांस प्रयत्नांतून सोडविलें, आणि **पार्लमेंट** सभेसही तिच्या फौजेशिवाय दुसरा कोणी शत्रु राहिला नाहीं. राजाचें भय जातांच **पार्लमेंट** सभेचे लोकांत उघड फूट पडली, तेव्हां त्या सभेंत बहुधा **प्रेस्बितेरियन** मताचे लोक होते. त्यांचें मत असें कीं, धर्मपक्षी लोक असावे; परंतु फौजेंत फार करून **इंडिपेंडंट** लोक असत, त्यांचें बोलणें पडलें कीं, धर्मपक्ष्यांचें कांहीं काम नाहीं. सर्वांस धर्मोपदेश करावयास अधिकार आहे. या जातीमध्यें मुख्य **क्राम्वेल** होता.

**क्राम्वेल** याचे गुण कसे होते हे आतां दृष्टीस पडूं लागले. तो **हांतिंग्तन** प्रांतांतले एके गृहस्थाचा मुलगा होय. त्याचा बाप आपले कुटुंबांत सर्वांपेक्षां धाकटा भाऊ होता. ह्मणून त्याचे वांट्यास दवलत फार थोडी आली

होती. त्यास **पार्लमेंट** सभेमध्यें **केंब्रिज** शहरचा सभासद नेमिला होता, त्यामध्यें वक्तृत्वाचीं साधनें नव्हतीं, कारण त्याचें शरीर कुरूप, नेसणें अव्यवस्थित, व बोलणें कर्कश, लांबट, संशयित, आणि घाबरें असे. स्वाभाविक जे गुण त्यामध्यें कमीं होते, ते त्यानें आस्था आणि उद्योग यांहींकरून पूर्ण केले. त्यामध्यें शौर्य उत्कृष्ट, आणि विचार, हे गुण होते. तशीच त्याची आपले पक्षाविषयीं खातरी होती ह्मणून तो हळू हळू चढत चढत शेवटीं **फेर्फाक्स** याचे हाताखालीं **लेफ्टेनंट जनरल** हें पद पावला, परंतु सर्व फौजेवर हुकूम त्याचाच होता.

पुढें फौजेच्या मनांत आलें कीं, आपणही एक स्वतंत्र समुदाय आहों. ते ह्मणूं लागले कीं, आह्मी सर्व लोकांस निर्भय केलें, असें असतांही आह्मास **इंग्लिश** लोकांची स्वतंत्रता नाहीं. याकरितां त्यांनीं एक लश्करी **पार्लमेंट** करावें, असें योजून त्याकरितां सर्व पलटणींतले मुख्य मुख्य सरदार आणि शिपाई हे नेमिले. त्यांत **क्राम्वेल** यानें आपलें नाव मुद्दाम घातलें, कारण कीं, फौजेस फितावून कांहीं तरी ढवाळी करावी.

इकडे असें वर्तमान असतां हतभाग्य राजा **चार्लस होंबीक्यास्तल** यावर कैदेंत तसाच होता. त्याचें अंग ज्या पक्षास असेल त्या पक्षास कांहीं वजन येईल; असें समजून **क्राम्वेल** यानें बेत केला कीं, त्यास धरावा. पुढें **जाय्स** नामें एका पुरुषानें पांचशें स्वार बरोबर घेऊन **होंबीक्यास्तल** याजवळ जाऊन राजास **केंब्रिज** शहराजवळ **त्रिप्लोहीथ** ठिकाणीं फौजेच्या स्वाधीन केलें. दुसरे दिवशीं

**क्राम्वेल** आला तेव्हां त्याचा मोठा सत्कार करून फौजेनें आपला मुख्य सरदारपणा त्यास दिला.

त्या समयीं **कामन्स** सभेंत दोन मतें पडलीं. एक फौजेस प्रतिबंध करूं नये असें, आणि दुसरें त्याचे विरुद्ध. प्रथमचे मताविषयीं बहुतांची संमति होती. आणि दोन मुख्यांसही तें मान्य होतें. असा मतांचा भेद पडतांच उभयपक्षीं अभिमान पडून दोन फळ्या झाल्या; आणि त्यांतील बासष्ट **कामन्स** व दोन मुख्य इतके निघून फौजे-जवळ गेले, फौजेस मोठा आनंद झाला, आणि ती सुमारें वीस हजार भयंकर फौज एकमत करून त्यांस पूर्वीचीं पदें द्यावयास निघाली.

इकडे जे **कामन्स** मागें राहिले होते, त्यांनीं निश्चय केला कीं, आतां काय होईल तें होऊं, फौजेचा दंगा चालूं द्यावयाचा नाहीं. त्यांनीं मुख्य नवे स्थापिले, शिपाई ठेव-ण्याचा हुकूम केला, आणि दंगा बंद करावयाचा निश्चय सारे शहरानें केला; परंतु जंवपर्यंत शत्रू दूर होते, तंवप-र्यंत हा निश्चय चालला, आणि **क्राम्वेल** याची भयंकर फौज येतांच सर्व जिकडे तिकडे भ्याले, आणि त्यांचे पक्षास मिळावयास कबूल झाले; तो सरदार येतांच गां-वचे दरवाजे उघडले; मग त्यानें त्या दोन मुख्यांस आणि सर्व सभासदांस निर्भयपणें आपापले घरीं ने-ऊन पोहोंचविलें, अकरा सभासदांनीं हा दंगा मूळ उत्पन्न केला, असें ठरवून त्यांस काढून टाकिलें. त्यांतून बहुधा परदेशास निघून गेले. **मेयर**, **शेरिफ**, आणि तीन **आल्डर्मन** यांस किल्ल्यावर पाठविलें, कितीएक शहरचे लोकांस आणि फौजेकडचे कामगारांस कैदेंत ठेविलें,

आणि गांवकुसूं मोडलें, किल्ला **फेर्फाक्स** याचे स्वाधीन केला. आणि **पार्लमेंट** सभेच्या आज्ञा त्यानें मोडल्या हें पसंत केलें.

फौजेनें राजास **हांप्तनकोर्ट** नांवाचे वाड्यामध्यें कैदेंत ठेविला होता, तेथून त्यानें पळून जावयाची युक्ति केली, ह्मणून त्यास **ऐल आफवैट** बेटांत **क्यारिसब्रूक क्यास्तल** यांत बंदीस ठेविला. इतकें झालें असतांही राज्याची विपत्ति बंद करावी ह्मणून तो आणि **पार्लमेंट** यांमध्यें करार होऊं लागले; ह्मणून **पार्लमेंट** सभेनें अशी मसलत केली कीं, राजाचे सत्तेनें फौजेचा दंगा बंद करावा. तो बंदिवान राजा आणि **कामन्स** या दोघांमध्यें पुनः पुनः तहाचें बोलणें झालें, परंतु त्यापासून कांहीं उपयोग झाला नाहीं; कारण त्या बंडानें आपलें बळ जाणून राजाचा सूड घ्यावा, अशी खचित् मसलत केली. अशा दृढ निश्चयानें ती फौज **विंड्सर** या ठिकाणीं गेली; आणि तिणें एक कामगाराचे हातून राजास धरवून **ऐल आफवैट** बेटाचे समोर **हर्स्तक्यास्तल** या ठिकाणीं नेऊन कैदेंत ठेविलें. **कामन्स** यामध्यें जरी आपला मतलब सिद्धीस न्यावयाची शक्ति राहिली नव्हती, तरी सर्व फौजेच्या देखत आपण राजाशीं तह ठरवावयाचा ते उद्योग करूं लागले, परंतु त्याचेच दुसरे दिवशीं **कर्नल प्रैड** ह्मणून सरदार होता, त्यानें दोन पलटणी घेऊन जाऊन त्या सभेस वेढा दिला, आणि **प्रेस्बितीरियन** पक्षाचे एकेचाळीस सभासदांस धरून त्याच घराची एक खोली होती, जिचें नांव नरक असें पडलें होतें, तींत पाठवून दिले. दुसरे सुमारें एकशें

साठ सभासद दूर केले; आणि सुमारें साठ **इंडिपेंडंट** लोकांशिवाय दुसऱ्यांस आंत जाऊं दिलें नाहीं.

या कृत्यास **प्रैड** याचें शोधन असें नांव पडलें; आणि बाकी जे बळत्कारानें राहिले होते, त्यांस **रंप** असें नांव झालें. यांनीं मग लवकरच निश्चय ठरविला कीं, कांहीं दिवसांपूर्वीं सभेंत जें कृत्य झालें तें गैरवाजवी, आणि फौजेच्या सरदारानें केलें तें योग्य. पुढें राजावर अपराध ठरवावयाकरितां एक **कामिटी** नेमिली, आणि निश्चय ठरविला कीं, राजानें **पार्लमेंट** सभेशीं लढाई केली; ह्मणून तो सरकार गुन्हेगार ठरला. या कल्पिलेले गुन्हेगारीची चौकशी करावयाकारितां एक न्यायाचें मोठें **कोर्ट** नेमिलें.

एक खाटक्याचा मुलगा **कर्नल हारिसन** ह्मणून होता, त्यास हुकूम केला कीं, राजास **हर्स्तक्यास्तल** यांतून विंडसर ठिकाणीं आणून तेथून **लंडन** शहरास घेऊन यावें. सर्व लोक प्रीतीनें राजाचे दर्शनास गेले, तेव्हां त्याचा चेहरा व शरीर उतरलें पाहून त्यांस फार क्लेश वाटले. त्यानें आपली दाढी वाढविली होती, त्याचे केंस चिंतेमुळें फार पांढरे झाले होते, आणि वस्त्रांवरून विपत्ति आणि कृशता यांचीं लक्षणें दिसत होतीं. असा तो **चार्लस** विपत्तीमध्येंही राजाचें स्वरूप धारण करून होता; जें पाहून त्याचे शत्रूंच्या मनांतही प्रीति आणि दया उत्पन्न व्हावी. त्याचे जवळ फार दिवसपर्यंत एक ह्मातारा सेवक असे, त्याचें नांव **सर फिलिप वार्विक**; तो मात्र आपले धन्याचा दैवयोग पाहून फार कष्टी होई; परंतु त्याचे हातीं कांहीं नव्हतें. पुढें बाहेरचीं जीं राजाचीं चिन्हें तींही त्याचीं नाहीं अशीं केलीं, आणि नवे चाकरांस हुकूम केला कीं, कांहीं त्याचा

मान न ठेवितां चाकरी करावी. **ड्यूक हामिल्टन** याचें पारिपत्य राजासारिखेंच करावयाचा बेत होता. त्यास **विंड्सर** स्थानाजवळ राजाची भेट घ्यावयाची आज्ञा मिळाली. मग तो जाऊन राजाच्या पायां पडला आणि बोलला, "हे माझे मित्रा स्वामी," हें ऐकून राजाच्या गालावरून अश्रुपात वाहूं लागले. आणि तो विचारा त्यास वर उठवून आणि प्रीतीनें आलिंगून बोलला, "तुह्मास मी मित्रस्वामी होतों खरा." शत्रूंपासून त्यानें बहुत दुःखें भोगिलीं, परंतु त्याची अशी खातरी होईना कीं, ते आपली उघड चौकशी करितील. त्यास असें वाटलें होतें कीं, ते चोरून कोणत्या तरी उपायानें आपला प्राण घेतील.

पुढें जी असाधारण चौकशी व्हावयाची तिची तयारी करण्यांत ज्यान्युआरी महिन्याचे सहावे तारिखेपासून विसावे तारिखेपर्यंत दिवस गेले. कामन्स यांनीं त्या चौकशी करितां एकशें तेहतीस न्यायाधीश नेमिले, परंतु कधींही यांतून सत्तरांवर एके ठिकाणीं जमले नाहींत. बहुतकरून त्यांत फौजेचे मुख्य सरदार, **कामन्स** यांतील कितीएक, आणि कितीएक **लंडन** शहरचे लोक इतके नेमिले. यांतून पुष्कळ हलके कुळांतले होते. **ब्राड्शा** ह्मणून एक वकील होता त्यास मुख्य नेमिलें, **कोक** ह्मणून एक गृहस्थ होता, त्यास **इंग्लिश** लोकांकडचा बोलणारा केला, **डारिस्लास**, **स्टील** आणि **आस्क** यांस मदतनीस केलें. तें **कोर्ट वेस्तमिन्स्तरहाल** वाड्यांत बसलें, आणि काम सुरू झालें.

मग **विंड्सर** या ठिकाणांतून राजास **सेंट जेम्स** एथें आणून दुसरे दिवशीं चौकशी करितां मोठें **कोर्ट** यांत नेला. तो पुढें आला तेव्हां एके चोपदारानें त्यास खुर्ची-

वर बसविला. **चार्ल्स** फार दिवस कैदेंत होता, आणि आतां अपराधी ह्मणून चौकशी करितां आणिला होता, तथापि त्यानें राजाचा मान सोडिला नाहीं. त्यानें एक वेळेस सर्व सभासदांकडे तिरस्कारानें पाहिलें, आणि टोपी न हालवितां तसाच बसला. बाकीच्या सर्वांनींही टोपी काढली नाहीं. मग वकिलानें त्याचें अपराध पत्र वाचलें. तें असें कीं, लढाईच्या प्रारंभापासून जें रक्त पडलें, त्याचें कारण राजा. ही गोष्ट आली तेव्हां राजास तिरस्कार येऊन हंसें आवरेना. तें वाचून झाल्यावर **ब्राड्शा** राजाशीं बोलूं लागला, आणि त्यानें सांगितलें कीं, आपण उत्तर काय करितां, याची **कोर्ट** वाट पहात आहे.

राजानें सौम्यपणानें उत्तर द्यावयास प्रारंभ केला. तो ह्मणाला कीं, **कोर्ट** यास माझी चौकशी करण्याचा अख्त्यार नाहीं; मी **पार्लमेंट** सभेशीं तह केला, त्याचे कलमाप्रमाणें यथास्थित चाललों असतां माझी ही दशा होऊं नये. वास्तविक न्यायाधीशींचीं सत्ता येण्यास **लार्ड** सभेचें अंग पाहिजे, तें एथें कांहीं मला दिसत नाहीं. मी राजा आहें आणि कायद्यांचा मूळ आहें, ह्मणून ज्या कायद्यांस माझी संमति नाहीं, त्यांवरून माझी चौकशी होऊं नये. लोकांची स्वतंत्रता राखण्याचें माझें काम आहे; ह्मणून मी अशे अपहारकांचे सत्तेस संमति दिली तर मला बट्टा लागेल. वास्तविक **कोर्टा**पुढें मी माझे वर्तणुकीचा जावसाल देईन; परंतु तुमच्या पुढें मी तें बोलणार नाहीं, याविषयीं मला क्षमा असावी. मी असें केलें तर लोक ह्मणतील कीं, मीं राजनीति मोडली. असें ह्मणतील, आणि तीसाठीं प्राण दिला असें ह्मणणार नाहींत. **कोर्ट** याची

सत्ता प्रतिपादन करावयाकरितां **ब्राड्शा** ह्मणूं लागला कीं, सर्व सत्तेचें मूळ प्रजा; त्यांपासून आह्मास मुखत्यारी प्राप्त झाली आहे. तो राजास बोले कीं, **इंग्लंड** याचे **कामन्स** यांनीं जें **कोर्ट** स्थापिलें आहे त्याचे सत्तेविषयीं तुह्मी शंका आणूं नये. यावर राजा उत्तर देत होता, परंतु तो त्यास बोलूं देईना, मध्यें मध्यें विघ्न करी. या रीतीनें **कोर्ट** या पुढें राजास तीन वेळ आणिलें, आणि तीन वेळ त्यानें त्यास अखत्यार नाहीं असेंच ह्मटलें. शेवटीं चवथे वेळेस तें स्वतःसिद्ध **कोर्ट** यापुढें त्यास नेत असतां वाटेनें लोक व शिपाई हे ओरडले, "इनसाफ! इनसाफ!" शिरच्छेद! शिरच्छेद!" इतकें झालें तरी राजा घाबरला नाहीं. मग न्यायाधीशांनीं कांहीं साक्षी घेऊन ठरविलें कीं, **पार्लमेंट** यानें ठेवलेले फौजेबरोबर युद्ध करावयास राजा तयार झाला ह्मणून तो अपराधी; याकरितां त्याचा शिरच्छेद करावा.

अशा संकट समयींही राजा मोठे थोर, उदार आणि चांगले रीतीनें वर्तला. तो **कोर्ट** यांतून परत जात असतां शिपाई आणि दुसरे लोक पुनः एकदां बोलले, "इनसाफ आणि शिरच्छेद." ते त्यास दुसऱ्या फारच वाईट गोष्टी बोलले, त्यांनीं त्याची फजीती आरंभिली, आणि त्यांतून एक राजाच्या तोंडावर थुंकला. राजानें स्वस्थपणें ती दांडगाई सोसून ह्मटलें, "गरीब बिचारे, ते दोन पैशां-साठीं आपले सरदारांसही असेंच करितील." लोकांमध्यें ज्यांनीं केवळ मनुष्यपणा सोडिला नव्हता, त्यांचा त्या वेळेस शोकानें गळा भरून आला; आणि नेत्रांतून अश्रु-पात येऊं लागले. एका शिपायास दया येऊन त्यानें रा-

जाविषयीं ईश्वरापाशीं आशीर्वाद मागितला. तें एके सरदारानें ऐकतांच त्या गरीब शिपायास एके सपाट्याबरोबर जमिनीवर ठार पाडिलें; तें पाहून राजानें ह्मटलें कीं, अपराधापेक्षां शासन फार मोठें झालें.

त्यानें **व्हाइटहाल** वाड्यांत आल्यावर विनंती केली कीं, माझे मुलांची माझी भेट व्हावी; आणि **लंडन** एथील पूर्वींचा **बिशप डाक्तर जक्सन** यानें माझे भजनाचे वेळेस जवळ असावें. ही प्रार्थना त्याची ऐकिली, आणि त्यास शिरच्छेदाची तयारी करावयास तीन दिवसांचा अवधि दिला. त्याचे कुटुंबांतून त्या वेळेस **इंग्लंड** यांत राजकुमारी **इलिझाबेथ** आणि **ड्युक ग्लास्तर** तो तीन वर्षांचा मुलगा, अशीं दोघें मात्र होतीं. तीं दोघें जवळ आल्यानंतर त्यानें आपले मुलीस हितावह आणि उपयोगी असा उपदेश केला, आणि आपले मुलास आलिंगून बोलला, "मुला, तुझ्या बापाचा शिरच्छेद होणार आहे, खरेंच माझें डोकें जाणार आहे; परंतु मी सांगतों, हें ध्यानांत धर कीं, तुझे भाऊ **चार्लस** आणि **जेम्स** जोंपर्यंत जीवंत आहेत तोंपर्यंत तूं राजपद स्वीकारूं नको, संधी आली ह्मणजे ते त्या दोघांचीं डोकीं कापतील." मूल डोळ्यांत आंसवें काढून बोलला, "पहिल्यानें मी मरेन." राजास शासन ठरलें तेव्हांपासून शिरच्छेद होईपर्यंत जरी शिरच्छेदकाष्ठ तयार करण्याविषयीं कामकऱ्यांची गडबड चालली होती, तरी त्यास नेहमी पहिले सारिखीच गाढ झोंप लागे.

शेवटीं शिरच्छेद व्हावयाचा त्या दिवशीं त्यानें मोठे सकाळीं उठून आपले एके सेवकास हाक मारिली, आणि सांगितलें कीं, आज मोठा उत्साहाचा दिवस आहे, या-

करितां तुह्मी माझा पोषाक चांगला करा. **व्हाइट्हाल** याचे पुढले गल्लींत त्यास मारावयाचें ठिकाण नेमलें होतें, याचें कारण कीं, शासन कठिण व्हावें. त्या ठिकाणीं एके भोजन शाळेजवळ मरणाची जागा नेमिली होती, तेथें राजाचा सेवक आणि मित्र जो **बिशप जक्सन** तो त्यास घेऊन गेला; जो **बिशप** आपले धन्यासारिखाच गुणी आणि पुण्यवान् होता. त्या मरणस्थळावर काळें वस्त्र घातलें होतें, आणि **कर्नल टाम्लिन्सन्** याजवळ एक पलटन देऊन तेथें रखवालीस ठेविला होता. त्या स्थळावर एक लांकूड, कुऱ्हाड, आणि तोंडावर पडदे घेऊन शिरच्छेद करणारे लोक होते. पुढें जें भयंकर वर्तमान होणार त्याची वाट पहात लोक दूर उभे राहिले होते. या सर्व सिद्धतेकडे राजानें परम स्थिर मनानें पाहिलें; आणि पुढें सर्व लोकांनीं ऐकावयाजोगें कांहीं बोलावें असें त्याचे मनांत आलें; परंतु ते दूर होते ह्मणून त्यानें जवळ जे थोडे लोक होते त्यांशीं बोलावयाचा प्रारंभ केला. तो बोलला कीं, लढाई झाली यांत मजकडे कांहीं अन्याय नव्हता; कारण **पार्लमेंट** यानें मार्ग दाखविल्यावर मी युद्धाची सिद्धता केली. बरें, ती जरी केली तरी माझे मनांत इतकेंच होतें कीं, पूर्वजांनीं जी आपल्यापाशीं सत्ता दिली, तिचें संरक्षण करावें. असो, आतां माझा शिरच्छेद होतो आहे, ईश्वरानें निःपक्षपात केलें, अशी मला खातरी आहे; मी कबूल करितों कीं, **अर्ल स्त्राफर्ड** याच्या निरर्थ शासनाविषयीं मी संमति दिली ह्मणून ईश्वरानें मला शिक्षा केली. मी सर्व माझे शत्रूंस क्षमा करितों; प्रजांनीं पुनः पूर्ववत् आज्ञेंत वागावें, आणि माझे मुलानें माझे मागें राज्य

करावें, अशी ईश्वराची प्रार्थना करितों, आणि **प्राटेस्तंट** धर्म ज्याप्रमाणें **इंग्लंड** एथील देवळांत चालतो, त्यावर माझी भक्ति आहे. याप्रमाणें अंतकाळीं तो जे कांहीं शब्द बोलला, ते श्रोत्यांच्या मनांत असे भरले कीं, त्याच्या रखवालीस जो **कर्नेल टाम्लिन्सन** ठेविला होता, त्यानें आपण तें मत घेतलें असें कबूल केलें.

तो राजा **चार्ल्स** मृत्यूची तयारी करित असतां **बिशप जक्सन** त्यास बोलला, "अहो तुमच्या जन्मांत एक दशा आझून बाकी राहिली आहे, ती दुःखदायक तर खरीच, परंतु स्वल्प आहे. ती तुह्मांस लांब पोहोंचवील. ती तुह्मास पृथ्वीवरून काढून स्वर्गांत नेईल; आणि तेथें तुह्मास सुशोभित मुगुट मिळेल." राजानें उत्तर केलें कीं, "मी या राज्यांतून अक्षय राज्यास जातों, जेथें दुःखास स्थळ मिळत नाहीं." **बिशप** बोलला, "तुह्मी नश्वर राज्य देऊन अनश्वर घेत अहां, आहाहा फार चांगला व्यापार!" मग **चार्ल्स** आपल्या अंगावरचें मोठें वस्त्र काढून आपलें भूषण **बिशप** यास देऊन बोलला "स्मरा." मग त्यानें आपलें डोकें लांकडावर धरिलें, आणि हात वर करून खूण केली. तेंव्हां एके शिरच्छेद करणारानें एक वार करून त्याचें डोकें पाडिलें, तें वर उचलून दुसरा बोलला, "हें राज्यापराध्याचें डोकें." हें पाहून लोक पहात होते, त्यांस फार दुःख झालें; गळे भरून आले, नेत्रांतून आश्रुपात होऊं लागले, आणि कितीएकांनीं मोठ्यानें आक्रोशही केला. पुढें त्यास धर्म, आणि दया माया यांचें स्मरण होत चाललें, आणि कितीएक राजास आपण दुःख दिलें ह्मणून, आणि

कितीएक त्याच्या शत्रूंस प्रतिबंध केला नाहीं ह्मणून आपली अतिशय निर्भर्त्सना करिते झाले.

**चार्ल्स** राजाचा शिरच्छेद झाला तेव्हां त्याचे वयास एकुणपन्नासावें वर्ष होतें; आणि त्यानें चोवीस वर्षें राज्य केलें. त्याचें शरीर बळकट, यथायुक्त, आणि उंचीनें मध्यम होतें, त्याचें मुख रमणीय होतें परंतु नेहमी चिंताग्रस्त आणि म्लान दिसे; याचें कारण असें कीं, नेहमी दुःखें अनुभविल्यामुळें तें तसें झालें होतें. त्याचे गुण सांगण्याचें प्रयोजन नाहीं, कारण त्याचे कर्मावरून ते चांगले कळतील.

इ०स० १६४८ ज्यानुआरी

---

# प्रकरण २९.

## सर्वसत्ताक राज्य.

संन् १६४८ पासून संन् १६६० पर्यंत.

**क्राम्वेल** यानें **चार्ल्स** राजाचे मरणाविषयीं गुप्तपणें उद्योग केला होता, त्याचे मनांत तो मेल्यानंतर मोठमोठ्या इच्छा उत्पन्न होऊं लागल्या. नंतर **अयर्लंड** एथील फौजेच्या सरदारपणा त्यास प्राप्त झाला; तेव्हां **ड्युक आर्मंड** याचे हाताखालचें राजपक्षी सैन्य, आणि **ओनियल** याचे हाताखालचें **ऐरिश** लोक यांशीं लढायाचा प्रसंग त्यास आला. परंतु त्या बेबंद सैन्याच्यानें **क्राम्वेल** यापुढें कांहीं करवलें नाहीं. ह्मणून त्यानें लागलाच सर्व मुलूख घेतला. पुढें सर्व शहरें स्वयें त्याचे स्वाधीन झालीं. त्यानें त्यांतील माणसें क्रूरपणानें ठार मारिलीं.

असा विजय मिळवून तो परत **इंग्लंड** देशांत आल्यानं-

तर **पार्लमेंट** सभेनें त्याचा सत्कार केला. त्या वेळेस **स्काच** लोकांनीं राजाचा पक्ष धरून **चार्लस** राजाच्या मुलग्यास राजपदावर बसविलें होतें; ह्मणून **पार्लमेंट** त्याशीं लढावयासाठीं एक सरदार योजीत होतें. **फेर्फाक्स** ह्मणून जो पूर्वीं सांगितला, तो तें काम पतकरीना; कारण मुळापासून तो **प्रेस्बिटीरियन** लोकांचे नाशास झटत नसे. ह्मणून तें काम **क्राम्वेल** यास सांगितलें. मग तो सोळा हजार फौज घेऊन मोठ्या धीरानें **स्काट्लंड** देशास गेला.

वास्तविक पहातां **स्काच** लोकांनीं **चार्लस** यास राज्यपदावर ठेविलें नव्हतें, तर कैदेंत जसें ठेवावें तसेंच त्यास राखिलें होतें. मग ते **क्राम्वेल** सरदाराशीं युद्ध करावयास सिद्ध झाले. त्या दोघांची लढाई झाली, तींत **इंग्लिश** लोकांचे दुप्पट **स्काच** लोक असतांही त्यांस पळवून **क्राम्वेल** नाश करीत त्यांचे पाठीस लागला. साऱ्या लढाईंत त्याचे चाळीसही लोक पडले नाहींत.

इ०स०१६५०

अशा संकट समयीं राज्यासाठीं सर्व खर्च करावें, असा विचार करून राजपुत्र **चार्लस** यानें योग्य मसलत केली. ती ही कीं, लागलेंच जवळ आहे तितकें सैन्य घेऊन **इंग्लंड** यांत जावें. कारण कीं, तेथें राजपक्षाचे सर्व लोक येऊन आपल्यास मिळतील असें त्याचे मनांत होतें; परंतु आपली फौज पुढें न जमेल, याविषयीं त्याची लवकरच निराशा झाली, कारण त्यानें जो उद्योग आरंभिला होता, तो भयंकर जाणून त्याजवळचे लोक दिवसानुदिवस कमी होत चालले, आणि **क्राम्वेल** याचे नांवानेंच भिऊन **इंग्लिश**ही कोणी त्याजवळ येईनात. असा तो **वोर्सेस्तर** यांत आल्यावर त्यास समजलें कीं, **क्राम्वेल** चाळीस हजार फौज घेऊन

**स्काट्लंड** देशांतून जलद आपल्यावर येत आहे. ही बातमी कळून राजपुत्राचे मनांत नुकतें भय उत्पन्न होत आहे, इतक्यांत तो पराक्रमी सरदार स्वतः येऊन शहरावर पडला; आणि त्यानें राजपक्ष्यांचा अतिशय नाश केला. रस्त्यावर प्रेतांचे ढीग पडले; सर्व **स्काच** लोक धरले गेले, आणि कितीएक मेले; राजपुत्र मात्र बहुत पराक्रम करून शेवटीं पळून गेला.

नंतर राजपुत्र फार संकट भोगून, आणि नानाप्रकारचे वेष धरून, एकेचाळीस दिवसांनीं **नार्मंडी** देशांत **फिस्शांप** शहरीं जाऊन पोहोंचला; तथापि त्याचें पळून जाणें चाळीस माणसांस कळलें.

पुढें विजयीं होऊन **क्राम्वेल** उत्साहानें **लंडन** शहरास आला. तेथें **पार्लमेंट** सभेंतला मुख्य, **लंडन** याचा **मेयर**, आणि **माजिस्त्रेट**, हे सर्व त्याचे भेटीस गेले. असें हिताचें चिन्ह पाहून त्यानें विचार केला कीं, **स्काच** लोकांनीं आपणास त्रास दिला आहे, तर त्यांचा प्रथम सूड उगवावा. ह्मणून मग **पार्लमेंट** सभेचे हातून हुकूम करविला कीं, **स्काटलंड** हें जिंकून घेतलेले एखादे परगण्यासारिखें **इंग्लिश** सरकारचे ताबेखालीं यावें; परंतु त्या **देशांतून** कांहीं सभासद **पार्लमेंट** सभेस यावे, इतकी सत्ता त्याजवळ ठेविली. पुढें त्या देशांत न्याय करावयाकरितां न्यायाधीश नेमिले, आणि **क्राम्वेल** यानें आपले पाठीमागें **स्काच** लोक केवळ स्वाधीन व्हावयाकरितां जो **जनरल मंक** ह्मणून सरदार ठेविला होता, त्यानें फार चातुर्यानें वर्तणूक केली, त्यामुळें ते शांत झाले.

या रीतीनें **इंग्लिश पार्लमेंट** आपली सत्ता **क्राम्वेल**

याचे मदतीनें राज्यांत सर्वत्र चालू करूं लागले. **अयर्टन**, आणि **लड्लौ**, या दोघांनीं सर्व **अयर्लंड** आपले ताबेखालीं आणिलें. **अमेरिका** खंडांत ज्या संस्थानांनीं राजाचा पक्ष धरिला होता, त्या सर्वांस आपले हाताखालीं आणिलें, आणि **जर्सी, सिली** आणि ऐल **आफमान** इत्यादि बेटेंही सहज आपले हाताखालीं आणिलीं. साठ सत्तर केवळ हलके आणि अविद्वान् सभासद मिळून **पार्लमेंट** एक मोठें राज्याचा कारभार चालवितात, असें पाहून सर्व लोकांस परम आश्चर्य वाटलें. त्यांनीं आपले हाताखालचे लोकांचा कांहींच बंदोबस्त राखिला नव्हता; एक राजमंत्री या नांवानें अठतीस गृहस्थ होते, त्यांस सर्व लोकांनीं कागदपत्रें लिहावीं असें होतें. पुढें त्यांनीं फौजा ठेविल्या; गलबतें जमविलीं, आणि **युरोप** खंडांतील जवळचे राज्यांस नियम करून दिले. राज्याचा वसूल मोठ्या बंदोबस्तानें खर्च करीत ह्मणून सरकारास लुटून लोक मातबर होईनात असें झालें. सरकारचा वसूल धर्माध्यक्षांच्या जमिनी आणि दरमहा एकशें वीस हजार **पौंड** कर, हा सर्व पैका मिळून त्यांनीं राज्य चालविलें.

या रीतीनें आपले घरचें राज्य ताबेखालीं आणून, पुढें ज्या **डच** लोकांनीं फारसा अपराध केला नव्हता, त्यांचें शासन करावयाचा निश्चय केला. **पार्लमेंट** सभेनें पूर्वींचे राजाचा एक न्यायाधीश होता, त्यास आपला वकील करून **हालंड** देशांत पाठविला; त्यास जेथें राजपक्षांचे कोणी लोक होते त्यांनीं ठार मारिलें. पुढें कांहीं दिवशीं **पार्लमेंट** सभेनें **सेंटजान** ह्मणून त्या दरबारांत वकील पाठविला, त्याचा **प्रिन्स आफआरेंज** याचे मित्रांनीं कांहीं अपमान

केला. या कारणामुळें **पार्लमेंट** सभेनें त्या राज्याशीं लढाई करावी अशी प्रतिज्ञा केली. **इंग्लिश** लोकांचा मुख्य नौकाध्यक्ष **ब्लेक** याच्या पराक्रमावर आणि शूरपणावर **पार्लमेंट** सभेचा भरंवसा होता; कारण त्या गृहस्थानें मोठेपणीं त्या कामाचा अभ्यास केला असतांही तो पूर्वींच्या सर्व सरदारांपेक्षां विशेष शूर आणि शहाणा असा दिसून आला होता. तिकडे **डच** लोकांनीं जो आपला **वानट्रंप** ह्मणून मोठा नौकाध्यक्ष तो युद्धास तयार केला होता. या दोघे प्रतापी नौकाध्यक्षांच्या अनेक लढाया झाल्या, आणि बहुत वेळ दोघेही विजय पावले. त्या भयंकर युद्धापासून त्या दोघेही नौकाध्यक्षांचा पराक्रम मात्र प्रगट होई, परंतु उत्कृष्ट कोण हें ठरेना. पुढें व्यापार बुडूं लागला, ही गोष्ट **डच** लोकांस वाईट वाटून त्यांनीं तहाचें बोलणें लाविलें; परंतु **पार्लमेंट** सभेस **क्राम्वेल** सरदाराचे जमिनीवरील फौजेपासून फार भय होतें, ह्मणून तें निर्बळ करावयाकरितां जंवपर्यंत आरमार ठेववेल तोंपर्यंत ठेवून, तिकडे राज्याचें सामर्थ्य खर्चून तह करूं नये, युद्धच करावें, असा त्यांनीं निश्चय केला होता.

हा त्यांचा बेत **क्राम्वेल** सरदारास लागलाच कळला, आणि समजलें कीं, हे सभासद लोक माझी सत्ता अधिक वाढत आहे, तिचें भय मानून ती कमी व्हावी असें इच्छितात. त्याचा स्वभाव मुळापासून धीट होता; आणि त्याच्या जें जें मनांत येई तें तो निर्धास्तपणें करीत असे. तशांत त्यानें निश्चय केला कीं, पुढें आपण परस्वाधीनपणांत राहूं नये. सैन्यास त्याचा पक्ष होता; ह्मणून निर्भयपणानें त्यानें दुसरी एक मोठी धीराची गोष्ट करावयाचा निश्चय

केला. ती ही कीं, सैन्यांतील सरदारांस समजावून त्यांचे हातून **कामन्स** यांस एक अर्जी द्यावी, ती दिली असतां **कामन्स** तिचा तिरस्कार करून मानणार नाहींत, आणि तसें झालें असतां आपलें काम होईल, असें तो पूर्वींच जाणून होता. पुढें त्या फौजेंतील सरदारांनीं ती अर्जी दिली; तींत मजकूर असा कीं, आमची बाकी सरकारावर आहे ती द्यावी, आह्मावर जुलूम चालले आहेत, त्यांची चौकशी करावी; आणि तुमच्या सभेची नेमणूक होऊन किती दिवस झाले, आणि पूर्वीं प्रजेच्या स्वतंत्रपणाची वृद्धि करण्याविषयीं, आणि **पार्लमेंट** सभेची रीति बदलण्याविषयीं तुह्मीं काय काय प्रतिज्ञा केल्या होत्या, या गोष्टीचा विचार करावा.

स० इ० १६५३

फौजेमुळें आपले हातीं सत्ता आहे, हें **पार्लमेंट** सभेनें त्या वेळेस ध्यानांत न आणितां फौजेचे धट्टाईमुळें आग्रहास पडून एक मंडळी नेमिली; आणि तींतील गृहस्थांस सांगितलें कीं, पुढें अशी अर्जी जो कोणी देईल तो सरकारचा गुन्हेगार, असा एक हुकूम तयार करावा. यावर फौजेनें कडक उत्तर दिलें. आणि **पार्लमेंट** यानेंही त्यासारिखेंच प्रत्युत्तर दिलें. पुढें प्रतिक्षणीं त्या दोघांमध्यें तंटा वाढत चालला. असें होईल हें **क्राम्वेल** यानें बहुत दिवस अगोदर जाणिलें होतें; आणि तो तसें व्हावें ह्मणून इच्छाही करीत होता. मग तो एके दिवशीं आपले लोकांशीं मसलत करीत होता; इतक्यांत त्या वेळेस **पार्लमेंट** सभेंत काय विचार होत आहे, ही त्यास बातमी समजतांच, तो मोठ्या आवेशानें उठला; आणि जवळ **मेजर वर्नन** ह्मणून होता त्यास ह्मणाला; "माझ्या डोक्याचे केंश उभे रहावे,

अशी गोष्ट करणें आज मला अवश्य प्राप्त झाली आहे." असें संतापानें बोलून तो तीनशें शिपाई बराबर घेऊन मोठ्या त्वरेनें **पार्लमेंट** सभेस गेला. आपण आंत गेल्यावर त्यानें पाय आपटून खूण केली; ती ऐकतांच त्या साऱ्या वाड्यांत येऊन त्याचे हत्यारबंद लोक शिरले. मग तो सभासदांकडे पाहून बोलतो, "तुह्मास धिक्कार असो, निघा येथून, तुमच्यापेक्षां भले माणूस या सभेंत बसूं द्या, जे आपलें काम तुमच्यापेक्षां फार चांगले रीतीनें करतील. तुह्मी आतां **पार्लमेंट** नव्हा. मी खरेंच तुह्मास सांगतों. तुह्मी आतां **पार्लमेंट** नव्हा. ईश्वरास तुमचें कारण नाहीं." तेथें **सर हारीवेन** ह्मणून गृहस्थ होता, तो **क्राम्वेल** याचे अशे उन्मत्त भाषणावर कांहीं बोलूं लागला, त्यास **क्राम्वेल** मोठ्यानें ह्मणाला, "**सर हारी**, अरे **सर हारीवेन**, ईश्वरानें मला हा **सर हारीवेन** याचे हातून सोडवावें." मग एकाचें वस्त्र धरून तो ह्मणतो, तूं रंडीबाज आहेस; दुसऱ्यास बोलला. तूं व्यभिचारी आहेस; तिसऱ्यास ह्मणाला, तूं दारूबाज; चवथ्यास ह्मणाला, तूं अधाशी." सर्वांस ह्मणतो; "तुह्मीच मला असें करणें अवश्य प्राप्त केलें, मला असें करण्यापेक्षां मृत्यु आला तरी बरा, ह्मणून मी रात्रंदिवस ईश्वराचा शोध करीत आहें." मग त्यानें मेजावरील सोटा काढावयास हुकूम केला. नंतर सर्व सभासदांस बाहेर घालवून, आणि तो वाडा साफ करवून, त्यानें दारांस कुलुपें घातलीं; आणि आपले खिशांत किल्ली टाकून निघून गेला.

पुढले **पार्लमेंट** सभेस जे त्यानें पुरुष योजिले, ते सर्व अतिनीच, हलके, मूर्ख आणि स्वच्छंदी असे होते.

तो जाणून होता कीं, राज्य कारभार चालविण्याची या लोकांमध्यें शक्ति नाहीं, ह्मणून हे सर्व कारभार आपलेवर टाकितील, किंवा अगदीं सोडून देतील. या त्याच्या भविष्याप्रमाणेंच ते वर्तले. त्या विलक्षण सभेमध्यें एक चामडें-विकया **प्रेझगाड बेबॉन** नांवाचा होता; त्यावरून त्याचें **बेबॉ-न पार्लमेंट** असें नांव पडलें होतें. केवळ जे हलके लोक होते, तेही या मूर्ख राज्य रीतीची निंदा करूं लागले. तें **पार्लमेंट** सभेंतील कितीएक सभासदांस समजलें; मग लागलीच त्यांनीं स्वतः एकीकडे सभा केली. आणि परस्परांस ह्मणूं लागले कीं, या सभेस फार दिवस झाले. मग सर्व संमतानें **रौझ** ह्मणून एक होता, त्यास आपला मुख्य करून त्वरेनें **क्राम्वेल** याजवळ गेले, आणि बोलले कीं, आपले सत्तेचा आपण स्वीकार करावा. त्यानें ती मोठ्या संतोषानें घेतली, परंतु कितीएक सभासदांनीं आग्रह धरिला आहे असें ऐकून, त्यानें **कर्नल** वैट ह्मणून होता, त्यास सांगितलें कीं, तुह्मी जाऊन त्या सभेंत जे असतील त्यांस काढून टाकावें. तो गेला त्या वेळेस त्यांनीं **मोयर** या नांवाच्या एके गृहस्थास मुख्य केला होता; त्या वेळेस **कर्नल** यानें जाऊन त्यांस विचारिलें; "तुह्मी एथें काय करितां." **मोयर** यानें स्वस्थ चित्तानें उत्तर दिलें कीं, "आह्मी ईश्वरास शोधितों." **कर्नल** ह्मणाला, "तर तुह्मी दुसरें कोठें जा, कारण ईश्वर येथें बहुत वर्षांपासून नाहींसा झाला आहे, असें माझे बुद्धीस येतें." **पार्लमेंट** सभेची उगीच छाया मात्र होती, ती या रीतीनें काढून टाकिल्यावर, फौजेचे सरदारांनीं ठरविलें कीं, **इंग्लंड** देशांतील सर्वसत्ताक राज्याचें प्रभुत्व **क्राम्वेल** यानें करावें. त्यानें

**हैनेस** (ह्मणजे हजरत) हा किताब धारण करावा. या रीतीनें त्याची सत्ता **लंडन शहरांत** आणि राज्यांतले दुसरे सर्व ठिकाणीं प्रसिद्ध झाली. ज्यास पूर्वीं कोणी पुसत नव्हता. असा हलका मनुष्य पहिल्यानें आपले उपयोगी लहान लहान उद्योग करून, पुढें मोठमोठे पराक्रम करून, त्रेपन्नावे वर्षीं अशी उत्कृष्ट सत्ता पावला.

**क्राम्वेल** याचे संपत्तिकाळीं आणि विपत्तिकाळीं ज्यानीं अंतर केलें नव्हतें, अशे फौजेचे सर्व अंमलदारांस त्यानें प्रतिवर्षीं एक हजार **पौंड** बैठा पगार देऊन आपले प्रधान नेमिले. फौजेमुळें आपणास इतका मोठेपणा प्राप्त झाला, आणि तीस राजी न राखिली असतां आपला नाश होईल, असें जाणून तो तिला एक महिन्याचा पगार अगाऊ देत असे. त्यानें कोठींत पुष्कळ पुरावा केला होता, आणि तो सरकारी पैसा मोठ्या बंदोबस्तानें खर्चीत असे. त्याचा उद्योग, सूक्ष्म दृष्टि, आणि दृढ निश्चय, असा होता कीं, कोणतें एखादें बंड झालें, किंवा त्याचे शरीराचा घात करण्याचा कोणी उद्योग आरंभिला. ह्मणजे तें त्यास पूर्वींच कळावें. बाहेरचे राजांशीं त्यानें आपले गुणाप्रमाणेंच व्यवहार ठेविला होता; आणि कांहीं दिवसपर्यंत तो चांगला चालत होता. **डच्च** लोकांचा बहुतवेळ पराजय झाला; आणि त्यांचे व्यापाराचाही संक्षेप होत आला; ह्मणून त्यांनीं शेवटीं तहाविषयीं प्रार्थना केली, ती **क्राम्वेल** यानें पुढें लिहिलेला करार करून घेऊन मान्य केली. तो करार हा कीं, **इंग्लिश** लोकांचें निशाण पाहिलें कीं त्यास मान द्यावा, राजाचा पक्ष सोडून द्यावा, पूर्वीं जो खर्च झाला त्या सर्वांबदल **इंग्लिश** लोकांस पंच्यायशीं हजार **पौंड** द्यावे, आणि

पूर्वींच्या राज्यांत **ईस्त इंडिया कंपनी** (पूर्व हिंदुस्थान मंडळी ह्मणजे **कंपनी** सरकार) ईचीं हिंदुस्थानांत जीं ठाणीं घेतलीं होतीं, तीं परत द्यावीं.

**फ्रान्स** देशाचे सरकाराशींही त्यानें तसाच तह केला. त्या वेळेस **फ्रेंच** यांचा मुख्य कारभारी **क्यार्डिनल माझेरीन** होता, त्यानें अशी युक्ति केली कीं, **क्राम्वेल** याचा फार सन्मान राखिला. **क्राम्वेल** याचा स्वभाव उतावीळ, असें जाणून त्यानें बळाचें बोलणें सोडून मृदु भाषण आरंभिलें, आणि या रीतीनें दोघांचींही कामें झालीं.

**स्पेन** देशचे दरबारानेंही त्याचा स्नेह संपादन करण्याविषयीं प्रयत्न केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं. त्या विशाळ राज्यानें कांहीं वर्षांपूर्वीं सर्व **युरोप** खंडांतलें स्वातंत्र्य घालवावयाचें भय घातलें होतें; परंतु या समयीं त्यास आपलेंही तें संरक्षण करावयाची शक्ति राहिली नव्हती. **क्राम्वेल** यास इतर राज्यांचे स्थितीचें विशेष ज्ञान नव्हतें; ह्मणून भिऊन तो त्या दरबारचा मोड करावयाकरितां, **फ्रेंच** सरकाराशीं साथी झाला. त्यानें **स्पेन** दरबारच्या **नेदर्लंड** देशांत मुलूख होता, तो घ्यावयाकरितां साहा हजार फौज **फ्रेंच** लोकांचे स्वाधीन केली, आणि त्यांनीं त्याच्या आश्रयानें विजय पावून **क्राम्वेल** यास **डंकर्क** शहर दिलें, जें तेव्हांच त्यांनीं **स्पानियार्ड** लोकांपासून घेतलें होतें.

**क्राम्वेल** यानें समुद्राचे वाटेनें **स्पेन** दरबाराचा अभिमान चांगल्या रितीनें घालविला. **ब्लेक** ह्मणून एके ग्रहस्थानें **डच** लोकांस फार दिवस बेजार केलें होतें, आणि त्याची सर्व **युरोप** खंडांत कीर्ति झाली होती, त्यानें **स्पेन** देशचे दरबारास फार भयभीत केलें. मग अरमार घेऊन

तो **मेदितरेनियन** समुद्रास गेला, तेथें पुण्ययुद्धाचे दिवसांपासून **इंग्लिश** लोकांचें एकही गलबत गेलें नव्हतें. तिकडे त्यास ज्यांनीं प्रतिबंध केला, त्या सर्वांचा गर्व त्यानें हरण केला. **लेगार्न** शहराजवळ त्यानें नांगर टाकिला, आणि तेथच्या **तस्कनी** प्रांताचा **ड्यूक** यापासून **इंग्लिश** लोकांचे व्यापाराची कांहीं खराबी झाली होती, तिचा जबाब पुसून घेतला. तेथून तो **आल्जियर्स** प्रांतांत गेला, आणि तेथील लोक चांचेपणा करून **इंग्लिश** यांस उपद्रव करीत असत, तो बंद केला; आणि तेथील सरदारांशीं तह केला. मग तो **त्युनिस** शहरास गेला, आणि तेथील सरदारानें त्याचा अपमान केला; ह्मणून **ब्लेक** बंदरांत जाऊन सगळीं गलबतें जाळून पुढें गेला. **कादिझ्** शहरांत त्यानें वीस लाख **रिवाल** या नांवाचें नाणें भरलेलीं अशीं दोन गलबतें घेतलीं. नंतर **क्यानारीझ्** बेटाजवळ **स्पानिश** लोकांचीं सोळा गलबतें जाळून, आपले पराक्रमाची कीर्ति भोगावयाकरितां स्वदेशीं येत असतां वाटेनें मृत्यु पावला. या शूर पुरूषानें अपहारकाकरितां युद्धें केलीं खरीं; परंतु त्याचे पक्षाचा त्यास अगदीं अभिमान नव्हता; त्याचें मन सर्वसत्ताक राज्याकडे होतें. त्याचा उद्योग दुष्ट राज्याचें प्राबल्य करण्याकरितां नव्हता, तर आपला देश संकटापासून मुक्त करावयाकरितां तो खलाशांस ह्मणत असे, "कोणाचे हातीं राज्य गेलें तरी आपण स्वदेशाकरितां युद्ध करावें, हा आपला धर्मच होय."

**ब्लेक** याचा उद्योग पूर्वी सांगितल्याप्रमाणें चालिला असतां, **हिस्पानिओला** ह्मणून **अमेरिका** देशांत बेट आहे, त्यावर हला करावयाकरितां दोघे नौकाध्यक्ष **पेन**

आणि **विनाब्ल्स** हे चार हजार पायदळ घेऊन गेले हो-
ते. तो त्यांचा उद्योग सिद्धीस गेला नाहीं, आणि **स्पा-
नियार्ड** लोकांनीं त्यांस तेथून काढून टाकिलें. मग ते
**जामइक** बेटास गेले, तें बेट कांहीं प्रयत्नावांचून त्यांस
साध्य झालें; परंतु त्या वेळेस हें कांहींच नव्हे. असें
वाटून मुख्य काम तडीस गेलें नाहीं, याकरितां **पेन** आणि
**विनाब्ल्स** हे येतांच यांस किल्ल्यावर टाकिलें.

इ०स० १६५८

**क्राम्वेल** यासही तो समय कठीण आला होता.
त्या वेळेस प्रजा त्यास सन्मानपत्रें आणि स्तुति यां-
हींकरून उत्साहित करीत होत्या, तथापि त्यास
मोठा पेंच येऊन पडला होता. तो असा,—तो सर्व प-
क्षाचे लोकांशीं वांकडा झाला, आणि त्यामध्यें परस्परें वैर-
भाव होता; ह्मणून तो निर्भयपणानें कांहीं दिवस राहिला
होता. पुढें त्याची ठकबाजीची विद्या सरली, त्यास को-
णी ठकला जाईना, आणि त्याच्या पक्षाचे होते, तेही त्यानें
एक ह्मणून भलतेंच केलें असें पाहून कंटाळले. त्याच्या
कारभाराचा सारे राज्यास कंटाळा आला होता. तथापि
घरांत जर त्यास सुख असतें, तर त्याची फारच फजीती
झाली नसती; परंतु त्याचा जांवई **फ्लीत्वुड** नामें होता.
तोही आपला सासरा धर्माच्या मिषेंकरून इहलोकसंबंधी
सुख साधितो, असें पाहून द्वेष करूं लागला. **फ्लीत्वुड**
याची बायको, त्याची वडील मुलगी, तिला सर्वसत्ताक रा-
ज्याचा असा पक्ष होता कीं, बापही राजा नसावा, असें
तिचें मनांत होतें. त्याच्या दुसऱ्या मुलींस राजाचा पक्ष
दृढ होता; आणि **मिस्त्रेस क्लेपोल** ह्मणून त्याचे प्रीतींत-
ली मुलगी होती, तिनें तो मरते वेळेस राजासनाचा अपहार

केला ह्मणून त्याची फार निंदा केली. प्रतिघटकेस त्यास कांहीं नवें दुःख प्राप्त होऊं लागलें. **लार्ड फेर्फाक्स, सर उइलियम वाल्लर**, आणि दुसरे **प्रेस्बिर्तारियन** मताचे कितीएक मुख्य, यांनीं त्याचा जीव घ्यावयाची आंतून मसलत आरंभिली. त्याच्या कारभारांत स्वदेशीं आणि बाहेर बहुतच खर्च झाला, ह्मणून त्यास कर्ज अतिशय झालें. एक बंड फुटून तें मोडलें ह्मणजे दुसरें उत्पन्न व्हावें, असें होत चाललें; तशांत त्याच्या बुद्धीस निश्चय झाला कीं, आपण मेलों असतां प्रजांस परम हर्ष होईल. **कर्नल तैतस** ह्मणून एक गृहस्त होता, त्यास पूर्वीं त्याचे पक्षाचा फार अभिमान होता; त्यानें एक पुस्तक करून प्रसिद्ध केलें, त्याचें नांव, "जीव घेण्यांत पाप नाहीं." तें पुस्तक फार चांगलें केलें होतें, तें पाहून मरणाचे भयानें **क्राम्वेल** यास कधींही हसें आलें नाहीं. या रीतीनें तो साशंक आणि भयभीत होऊन एकांतीं किंवा मंडळींत दुःखी असा दिसत असे.

शेवटीं त्यास फार ताप येऊन त्याची शुद्धी गेली. त्याचें इतकें मात्र राहिलें कीं, तुमचे मागें तुमचा पुत्र **रिचर्ड** यानें राज्य करावें कीं काय? असें पुसलें असतां, तो होय ह्मणे. **सप्तंबर** महिन्याचा तिसरा दिवस त्यास नेहमी मोठा शुभदायक असे, त्याच दिवशीं त्यास मृत्यु आला. त्या वेळेस त्याचें वय एकुणसाठ वर्षांचें होतें. त्यानें नऊ वर्षेंपर्यंत राज्याचा अपहार केला.

**क्राम्वेल** मेल्यानंतर पुढें त्याच्या स्थळीं कोण नेमावा, याविषयीं आंतले आंत बखेडा पडला; परंतु त्याच्या मागेंही धाक होता, त्यामुळें त्याचा मुलगा **रिचर्ड** यास त्या स्थळीं नेमून प्रसिद्ध केलें. अशा मुख्यास सैन्य कंटाळलें;

आणि त्यांत मोठमोठे होते, त्यांनीं **फ्लीत्वुड** याचे घरीं सभा केली. त्यांचे विचाराचा इत्यर्थ हा ठरला कीं, ज्यावर सर्वांचा विश्वास बसेल, त्यास सैन्याचा सरदारपणा द्यावा; आणि असा पुरुष **रिचर्ड** नव्हे हें स्पष्ट ध्यानांत आलें.

**रिचर्ड** यास जें पद मिळालें, तें राखावयाजोगा त्याच्यामध्यें धीर नव्हता; ह्मणून तो स्वेच्छेनें आपलें स्थळ सोडून कांहीं वर्षेंपर्यंत परदेशास गेला. नंतर परत स्वदेशीं येऊन आपले मुळचे वतनांवर राहिला.

या रीतीनें सैन्याचे सरदार पुनः एकवेळ स्वतंत्र झाल्यावर त्यांनीं निश्चय केला कीं, ज्या **पार्लमेंट** सभेनें **चार्लस** राजाचा शिरच्छेद केला, आणि जी **क्राम्वेल** यानें काढून टाकिली होती, तिला पुनः बोलावणें करावें. ती पुनः एकत्र जमल्यावर तिला ज्यांच्या योगानें स्वस्थान प्राप्त झालें होतें, त्यांचीच सत्ता कमी करावयाचे उद्योगास लागली. ह्मणून सरदारांनीं पुनः एक वेळ निश्चय केला कीं, ज्या **पार्लमेंट** सभेपासून आपणासच उपद्रव होतो, तीस निरोप द्यावा. असा बेत करून **जनरल लांबर्ट** ह्मणून सरदार होता, तो एक निवडक फौजेची टोळी घेऊन **वेस्तमिन्स्तर** वाड्याचे वाटेवर जाऊन राहिला. इतक्यांत **पार्लमेंट** सभेंतील मुख्य **लेंथाल** रथांत बसून सभेस चालिला होता; त्याचे घोडे उलटवून त्यास युक्तीचे वाटेनें घरीं नेऊन पोहोंचविलें. असेंच सर्व सभासदांस मागें फिरवून सैन्यानें आपले स्थानीं जाऊन त्या दिवशीं उपास केला. त्या वेळेस अशी चाल होती कीं, कांहीं तरी घोर कर्म करणें झालें ह्मणजे त्याचे पूर्वीं किंवा नंतर एक उपोषण करावें.

या समयीं **जनरल मांक** ह्मणून एक सरदार आठ हजार लोक घेऊन **स्काटलंड** देशांत होता. त्यास स्वदेश संकटांतून मुक्त करीन ही आशाही नव्हती. आपला बेत काय आहे, हें त्यानें अतिशयच गुप्त राखिलें होतें. राजधानींत बखेडा झाला होता, त्याची चौकशी करावयाकरितां त्यानें आपलें सैन्य किंचित् उद्योगास लावतांच, सर्व विरुद्ध पक्षाचे लोक त्याचें अंग आपलेकडे असावें, असें इच्छूं लागले. तथापि तो **लंडन** शहराजवळ जवळ येत चालिला. तो कशाकरितां येतो, हा तेथें सर्वांस संशय पडला; आणि कांहींच बातमी बाहेर फुटेना; ह्मणून आश्चर्य झालें; परंतु **मांक** तसेंच मौन धरून शेवटीं **लंडन** शहराजवळ कांहीं कोशांवर **सेंट आब्लान्स** गांव आहे तेथें आला.

त्या वेळेस **रंप पार्लमेंट** पुनः एकत्र जमलें होतें, त्यास त्यानें तेथून निरोप सांगून पाठविला कीं, **लंडन** शहरांत जी फौज आहे, ती खेडे गांवांस पाठवावी. नंतर राज्यास उपयोगी असा बंदोबस्त करून **कामन्स** यांनीं स्वेच्छेनें सभा बंद केली, आणि हुकूम केला कीं, लागलीच नवें **पार्लमेंट** याची सभा करावी.

इ० स० १६६० या वर्षापर्यंत नवी **पार्लमेंट** सभा बसली नाहीं. आणि **जनरल** याचे मनांतला बेत कोणासही कळला नाहीं. पुढेंही त्यानें तसेंच गौप्य राखिलें. जरी सर्वांस ठाऊक होतें कीं, नवें **पार्लमेंट** याची सभा करणें (ह्मणजे राजास पुनः पदावर बसविणें) असा अर्थ होतो, तथापि त्यानें ती गोष्ट तोंडांतून कधींही काढली नाहीं. शेवटीं विश्वासानें मात्र कायतें त्याचें हृद्गत प्रसिद्ध झालें. तें

वर्तमान असें,– **डेवन** प्रांतांत **मारैस** या नांवाचा एक विद्वान गृहस्थ होता, त्याशीं मात्र तो राजाचें पुनः स्थापन करावयाची मोठी मसलत करीत असे. **सर जान ग्रान्विल** ह्मणून एक राजापासून कांहीं कामगिरी करितां गृहस्थ आला होता, त्यास **मांक** यानें दोन वेळ सांगून पाठविलें कीं, तुह्मी **मारैस** यास आपला मजकूर समजवावा. तो ह्मणूं लागला कीं, मी **जनरल** यावांचून दुसरे कोणास निरोप सांगावयाचा नाहीं. याकरितां **मांक** यानें त्याचे मनुष्यपणावर लक्ष्य देऊन त्यास आपले मनांतलें सर्व सांगितलें; तथापि त्यानें त्याविषयीं कागदास टांक लाविला नाहीं. ही बातमी **ग्रान्विल** याचे द्वारें राजास **स्पानिश** मुलुखांत समजली; तेथें **ब्रीडा** शहरचे अमलदारानें त्यास सत्कार करावयाच्या निमित्तानें अडकवून ठेविलें होतें. त्यापासून तो मोठ्या युक्तीनें निघाला, आणि **हालंड** देशांत येऊन निरोपाची वाट पाहात राहिला.

फार दिवस स्वतंत्र **पार्लमेंट** सभा व्हावयाच्या दिवसाकरितां लोक वाट पाहात होते, तो शेवटीं आला. सर्वांची प्रीति राजावर बसली, तथापि स्पष्ट बोलावयास इतकें त्या वेळेस भय होतें कीं, राजाचें नांव घ्यावयास कांहीं दिवसपर्यंत कोणास हिंमत होईना. **मांक** मुळापासून स्वस्थपणें त्यांची परीक्षा पाहात होता; शेवटीं निश्चय करून **आनेस्ली** ह्मणून अमात्यांत मुख्य होता; त्यास अमात्यांला कळवावयाकरितां सांगितलें कीं, **सर जान ग्रान्विल** राजाकडचें बोलणें बोलावयाकरितां पत्र घेऊन दरवाजाचे बाहेर आला आहे. हा निरोप ऐकून सर्वांस फारच संतोष झाला. सभासद क्षणभर आपली मान्यता विसरून त्याचा

मोठ्या स्वरानें स्तव करण्यांत प्रवृत्त झाले. मग **ग्रान्विल** यास आंत बोलावून राजाचें पत्र मोठ्या हर्षानें वाचलें. तें संपल्यावर एक क्षणही मध्यें न जातां, सर्व सभासदांनीं एकदांच राजाची विनंती मान्य केली; आणि तो उत्साह सर्वत्र प्रसिद्ध व्हावयाकरितां असें ठरविलें कीं, तो कागद आणि माफीपत्र हीं लागलींच छापून प्रसिद्ध करावीं.

द्वितीय **चार्लस** राजा मे महिन्याचे एकुणतिसावे तारिखेस **लंडन** शहरांत आला, तो त्याचा जन्मदिवस होता, त्या वेळेस जेथें जेथें तो गेला तेथें तेथें असंख्य लोकांचा समूह त्याचे बरोबर जाऊन त्याचा जयजयकार करूं लागले. बहुत दिवसपर्यंत आंतले आंत तंटा लागून पक्ष झाले होते; आणि एकापुढें एक दुष्ट राजे होऊं लागले, त्यामुळें लोकांस या प्रसंगीं हर्ष झाला तो मावेना. त्यांनीं पाहिलें कीं, आपली पूर्वींची राज्यनीती लयास चालिली होती, ती पुनः उदयास आली.

---

## प्रकरण ३०.

### द्वितीय चार्लस राजाची कथा.

संन् १६६० पासून १६८५ पर्यंत.

**चार्लस** राजा राज्य करूं लागला तेव्हां त्याचें वय तीस वर्षांचें, स्वरूप सुंदर, भाषण सभ्य, आणि स्वभाव मनोरंजक, असे त्यांमध्यें गुण होते. प्रथमचे आचरणावरून त्यास लोक फार वश होतील, असा सुमार दिसत होता. तो परदेशांत होता त्या वेळेस आपले दरबारी लोकांत आ-

नंदानें राहावयाचा त्यास अभ्यास होता, त्याप्रमाणेंच तो स्वभाव त्यानें सिंहासनावरही राखिला. त्याचा स्वभाव ख्यालीखुशाली ह्मणून तो पूर्वींचा सूड उगवील, ही कोणाचे मनांत शंकाही नव्हती. याप्रमाणें सर्व बरेंच दिसलें खरें; परंतु त्याचा परिणाम विपरीत झाला. आळस आणि विषयेच्छा यांहींकरून तो कोणत्या राज्यकामाच्या उपयोगीं नाहींसा झाला; बरें आणि वाईट या दोन्ही लोकांशीं सारिखी मैत्री ठेवूं लागला; आपले पूर्वींच्या मित्रांचा समाचार घेईना; आणि शत्रूंच्या पारिपत्याविषयींही उद्योग करीना.

राजास मारण्याचे उद्योगांत जे होते, त्यांशिवाय सर्वांस माफी द्यावयाचा हुकूम **पार्लमेंट** सभेनें केला. **क्राम्वेल**, **अयर्टन**, आणि **ब्राड्शा** हे तिघे मेले होते, तरी शासन करावयास योग्य असा विचार करून त्यांचीं प्रेतें खणून काढिलीं, शिरच्छेदाचे ठिकाणीं नेलीं, आणि कांहीं वेळपर्यंत लोंबवून शेवटीं त्या लाकडा खालींच पुरून ठेविलीं.

बाकीचे जे **चार्लस** राजाचा न्याय करावयास बसले होते. त्यांतून कितीएक मेले; आणि कितीएकांस क्षमा मिळाली. ऐशींतून दाहांस मात्र लागलेंच ठार मारिलें. ते आग्रही होते; आणि आपण करितों हें चांगलें असें त्यांस वाटत असे. त्यांवर चहूंकडून प्रसंग आला, त्या वेळेस त्यांनीं मोठें धैर्य दाखविलें, ते एखादे चांगले कामांत असते, तर त्यांची कीर्ति होती.

या प्रसंगीं राजानें अगदीं **पार्लमेंट** सभेची गरज नाहीं असें केलें असतां सिद्धीस जाईल, असें पाहून, त्याचा एक मंत्री **सौथांप्टन** ह्मणून होता, त्यानें **कामन्स** यांपासून रा-

जास वीस लक्षांची नेमणूक करून घ्यावयाचा उद्योग आ-रंभिला; तो सिद्धीस गेला असता तर राजा स्वतंत्र झाला असता; परंतु **क्लारेंडन** ह्मणून मोठा प्रसिद्ध गृहस्थ होता, त्यानें तें चालूं दिलें नाहीं. तो राजाच्या पक्षाचा असे खरा; परंतु स्वतंत्रता, आणि नीति यांचा अभिमान फार बाळगीत असे. या दोन प्रकारच्या मसलतीविषयीं राजा कांहींच मनांत आणीत नसे; त्याला पैका मात्र पाहिजे होता.

तो नेहमी खर्चाचे पेचांत असे. ह्मणून त्याच्या मनांत कितीएक गोष्टी नव्हत्या, त्याही त्याचे हातानें घडल्या. त्यांतही एक झाली कीं, **पोर्तुगल** देशची राजकन्या **क्याथेरिन** होती तिशीं लग्न केलें. ती गुणी होती खरी, परंतु सुंदर नव्हती. तिचे बरोबरचे आंदणाची त्यास फार लालूच होती. तें आंदण तीन लाख **पौंड** होतें, आणि खेरीज **आफ्रिका** देशामध्यें **तांजियर** आणि हिंदुस्थानांत मुंबई हे दोन किल्ले होते. **चान्सेलर क्लारेंडन**, **सौथांप्टन** आणि **ड्यूक आर्मंड** यांनीं तिशीं लग्न करूं नये, ह्मणून राजास अनेक गोष्टी सांगितल्या; त्यांत हेंही कळविलें कीं, तिला मुलें कधीं व्हावयाचीं नाहींत; परंतु राजानें त्यांची मसलत न ऐकून तिशीं तें अशुभ लग्न केलें. दुसरा त्यानें असा विचार केला कीं, **डच** लोकांशीं आपण लढाईची प्रतिज्ञा करावी; आणि पैका हातीं येईल तेणेंकरून आनंद भोगावा. पुढें ती समुद्रांतली लढाई चालू झाली, तींत पुष्कळ रक्त पडलें, आणि पैका खर्च झाला. शेवटीं **ब्रीडा** शहरामध्यें तह ठरविला, त्याप्रमाणें **न्यूयार्क** प्रांत **डच** लोकांनीं **इंग्लंड** यांस दिला. तो मोठा लाभ

आपल्यास झाला, असें त्या वेळेस त्यांस वाटलें; परंतु ज्या अन्यायाकरितां युद्ध केलें होतें, त्याचें निवारण तहापासून झालें नाहीं. मुख्यत्वेंकरून **लार्ड क्लारेंडन** यानें प्रथम ती व्यर्थ लढाई करावी, अशी राजास मसलत सांगितली, आणि शेवटीं आपणच बेअबरूचा तह करून संपविली, ह्मणून त्यावर ठपका आला. त्यावर फार दिवसपर्यंत राजाची गैरमर्जी झाली होती, आणि लोकांस तरी त्याचें विशेष अगत्य होतें असें नाहीं; ही त्याचे शत्रूंस आंत प्रवेश करून त्याचा संपूर्ण नाश करावयास संधी सांपडली. मग **मिस्तर समोर** होता, त्यानें **कामन्स** सभेमध्यें त्याजवर सत्रा कलमांचा आरोप ठेविला. तीं कलमें खरीं नव्हतीं, तथापि सामर्थ्य आणि लोकांचें मत हीं एकत्र झालीं असें पाहून, **क्लारेंडन** आपले खुशीनें काम सोडून **फ्रान्स** देशास निघून गेला.

त्या गुणी अमात्यापासून या रीतीनें सुटका झाल्यावर राजानें कित्तीएक मनुष्यांवर सर्व विश्वास टाकिला. त्या लोकांस नांवाच्या पहिले वर्णावरून **केबाल** असें ह्मणत असत. त्यांत पहिला **सर टामस क्लिफर्ड**. तो मोठा शूर उतावीळ असून वक्ता, आणि काबेबाज असे, ह्मणून सर्वांस अतिशय भयंकर झाला होता. दुसरा **लार्ड आश्ली**, ज्यास पुढें **लार्ड शाफ्टस्बरी** असा किताब मिळाला होता. तो दुष्ट, लोभी, आणि साहसी असा होता. तिसरा **ड्यूक बकिंगम**, तो हास्यमुख, स्वच्छंदी, कांहींसा चतुर आणि मोठा चपळ होता. चवथा **आर्लिंग्टन**, त्याची बुद्धि मध्यम व निश्चय चांगला असे; परंतु तो सिद्धीस न्यावयाजोगी त्यामध्यें हिंमत नव्हती. पांचवा **ड्यूक लाडर्डेल**, यामध्यें

सिद्ध आणि साधित या दोन प्रकारच्या गुणाची कमती नव्हती; परंतु त्याचें भाषण मधूर नव्हतें, आणि समज वास्तवीक नव्हता; आणि तो लोभी, आग्रही व दांडगा असे. अशा पांच पुरूषांजवळ **चार्लस** राजानें आपला संपूर्ण कारभार स्वाधीन केला; त्यांनीं पुढें राज्याची अतिशय दुर्दशा करून फार नाश केला.

इ०स० १६७०

या अशुभ मंडळीमुळें लोक सरकारचा अतिशय द्वेष करूं लागले; व ते आपलीं भयें आणि असंतोष निर्भयपणें सांगूं लागले. पुढें **पोप** याचे मताचा राज्यासनावर बसेल, दरबारी लोक वाईट, आणि जें **पार्लमेंट** सतरा वर्षेंपर्यंत बसलें तें काम चालवील, हें पाहून लोकांचीं मनें व्यग्र आणि भयभीत झालीं. मग कांहींतरी विषय यावा, आणि त्यांचा क्रोधाग्नि प्रदीप्त व्हावा, इतकें बाकी राहिलें.

**आगस्ट** महिन्याचे १२ वे तारिखेस राजा उपवनांत फिरत असतां, **किर्बी** ह्मणून एक रसायणी होता, तो त्यास ह्मणाला, "साहेब, कोणीतरी आपले बरोबर असावा; आपले शत्रूंनीं जिवावरची मसलत केली आहे; आणि कदाचित् तुह्मी आतां फिरत आहां एथेंच तुह्मास गोळी लागेल." असी तो विचित्र गोष्ट बोलला, त्यास पुरशिस केली; तेव्हां तो ह्मणाला कीं, **डाक्तर टंग** ह्मणून एक धर्मपक्षी आहे, त्यानें मला सांगितलें कीं, **ग्रोव** आणि **पिकरिंग** या नांवाचे दोघे पुरूषांनीं राजास मारावयाचा उद्योग आरंभिला आहे; आणि राणीचा वैद्य **सर जार्ज वेक्मन** यानें विषप्रयोग करून तेंच काम पतकारिलें आहे. या रचलेले बंडासंबंधी कागदांचा एक पुडका घेऊन **टंग** यास राजाजवळ नेलें; तेथून त्यास चौकशीकरितां **डान्बी** ह्मणून प्रधान

होता, त्याजवळ पाठविलें; तेथें तो बोलला कीं, माझे दाराखालीं हे कागद येऊन पडले होते; आणि पुढें त्यानें सांगितलें कीं, त्यांचा कर्ता मला ठाऊक आहे; परंतु **जेस्विट** लोकांपासून आपणास उपद्रव होईल, हें भय मनांत आणून त्यानें आपलें नांव गुप्त राखावें, अशी माझी प्रार्थना केली आहे.

ही बातमी लागली; परंतु तीपासून कांहीं खचीत न समजतां उगीच शंका मात्र उत्पन्न झाली; ह्मणून राजानें ठरविलें कीं, ही सारी उगीच बडबड आहे. तथापि **टंग** यानें पुनः प्रधानाजवळ जाऊन सांगितलें कीं, त्या रात्रीस बंडसंबंधी **जेस्विट** लोकांपासून एक कागदांचा पुडका **विंड्सर** गांवास पाठवायाकरितां डांकखान्यांत येणार आहे. त्यावर **ड्युक यार्क** याचा धर्मोपदेशक **बेडिंग्फील्ड** याचें नांव लिहिलें आहे. तीं पत्रें पूर्वीं कांहीं घटिका **ड्युक यार्क** यास पोंचलीं होतीं; परंतु तीं खोटीं आणि त्यांचा आपल्यास कांहीं अर्थ समजत नाहीं, ह्मणून तीं त्यानें राजास दाखविलीं होतीं.

या सर्व भयंकर बातमीचें मूळ **टैटस ओट्स**, या नांवाचा पुरुष होता. त्यास पुढें लवकरच सरकारांत आणिलें. तेव्हां तो प्रथम अनमान दाखवून शायदीस उभा राहिला. हा **टैटस ओट्स** कोणीएक नीच दुष्ट, दांडगा, भिकारी असा पुरुष होता. एकदां त्यावर खोटे शपतेचा आरोप आला होता; पुढें तो एके लढाऊ गलबतांत धर्मोपदेशक होता, परंतु तेथून कांहीं व्यसनामुळें त्यास काढिलें. मग तो **रोमन क्याथोलिक** वेष धरून **सेंट ओमर्स्** शहरास गेला, तेथें **इंग्रेजी** शाळेंत कांहीं दिवस

तो आपला चरितार्थ चालवीत होता. राजाचे जिवावरची मसलत त्यास सांगितली असतांही त्याचे चरितार्थाची व्यवस्था अशी होती कीं, **किर्बी** त्यास राजचे रोज जेवण पुरवीत असे.

त्यास दोन युक्ति सुचल्या; एक ही कीं, ही बातमी सांगून अमात्यांची कृपा संपादावी. दुसरी, लोकांस भिववून त्यांपासून आपलें कार्य साधावें. या दोहोंतून त्यानें दुसरी युक्ति केली; आणि मग तो आपले दोघे सोबती घेऊन **सर एड्मन्स्बरी गाड्फ्रे** ह्मणून उद्योगी आणि प्रख्यात असा न्यायाधीश होता, त्याजवळ गेला; आणि त्यानें ज्या रीतीने भोळे लोकांचे मनांत भय वाटेल त्याप्रमाणें एक गोष्ट बनावून सांगितली. तो बोलिला कीं, राजा आणि प्रजा, पाखंडी झाल्या ह्मणून **पोप** याचे मनांत **इंग्लंड** आणि **अयर्लंड** एथील सर्व राज्य आपण घ्यावें असें आहे; आणि त्याप्रमाणें त्यानें तो उद्योगही सुरू केला आहे. ज्या **चार्लस** राजास **जेसुविट** लोक **ब्लाकबास्तर्ड** (काळा गुलाम) ह्मणतात, त्याची त्यांनीं उघड चौकशी करून तो पाखंडी असें ठरविलें आहे. तें काम खचित सिद्धीस जावें, ह्मणून **ग्रोव** आणि **पिकरिंग** यांनीं राजास रुप्याची गोळी घालून मारावयाचें काम पतकारिलें आहे. हे संकेत सिद्धीस गेल्यावर **प्रातेस्तंट** धर्म नाहींसा करावा, असा करार करून घेऊन **ड्युक यार्क** यास राज्यपद द्यावें; व त्यानें न घेतलें तर त्याचाही नाश करावा, असें ठरलें आहे.

जरी ही बातमी उघड खोटी होती. तरी **ओट्स** यावर लोकांची प्रीति बसली. त्यानें सांगितलेले **जेसविट** लोकांतून बहुतांस धरून लागलेंच बंदीस टाकिलें.

**ड्युक यार्क** याचा **सेक्रेतारी कोलमन**, ज्याचें त्या बंडांत मुख्यत्वें अंग होतें असें सांगतात, तो पहिल्यानें पळाला; परंतु दुसरे दिवशीं प्रधानांच्या स्वाधीन झाला; आणि **ओ-ट्स** याचे आज्ञेनें त्याचे कांहीं कागद जप्त केले.

अशा संशयित समयीं एक विलक्षग वर्तमान घडलें; त्यावरून लोकांच्या शंका खऱ्या, आणि **ओट्स** यानें सांगितलेली बातमी वास्तवीक, असें अनुभवास आलें. **पोप** याचे काव्याचा शोध लावण्याविषयीं त्यानें बहुत यत्न केला होता. असा **सर एड्मन्सबरी गाड्फ्रे** ह्मणून पूर्वीं गृहस्थ सांगितला तो, अकस्मात् कांहीं दिवसपर्यंत नाहींसा झाला; पुढें कांहीं दिवसांनीं **हांप्स्तेद** प्रांताचे वाटेवर **प्रिम्रोझ्हिल** गांवाजवळ एके खळग्यांत त्याचें प्रेत सांपडलें. तो कशानें मेला, हें आजपर्यंत कोणास समजलें नाहीं; आणि पुढेंही समजावयाचें नाहीं; परंतु सर्वांस **पोप** मताचे लोकांचा संशय होताच, ह्मणून तें कर्म त्यांचे आंगीं लाविलें. मग समारंभ करून सत्तर धर्मपक्षी बरोबर घेऊन तें प्रेत रस्त्यांतून नेलें; तें ज्यांनीं ज्यांनीं पाहिलें, त्या सर्वांचा निश्चय झाला कीं, तें **पोप** मताचे लोकांचेंच कृत्य. चांगले मोठे लोक होते, त्यांच्याही चित्तांत हें अज्ञान शिरलें; आणि त्या वेळेस **ओट्स** यानें सांगितलेले वर्तमानाविषयीं किंवा **गाड्फ्रे** याचे मृत्यूविषयीं कोणाचेही मनांत संशय राहिला नाहीं.

तें भय सर्वत्र पसरून प्रसिद्ध व्हावें, ह्मणून **पार्लमेंट** सभेनेंही तें खरें वाटलें असें दाखविलें, आणि सर्वांस उपाय करावयाचा हुकूम झाला. त्या बंडासंबंधी जे कागदपत्र होते, ते सभेंत आणावे. सर्व **पोप** मताचे लोकांनीं **लंडन** शहरां-

तून निघून जावें. दरबारांत कोणी परकी पुरुषानें येऊं नये, **वेस्तमिन्स्तर** आणि **लंडन** एथील फौज तयारींत असावी, आणि **ओट्स** याचें रक्षण करावें. अशी **पार्लमेंट** सभेनें राजास विनंती केली; त्यावरून **ओट्स** यास **वैट्-हाल** वाड्यांत राहावयास जागा दिली, आणि सालाबाद बाराशें **पौंड** नेमणूक करून देऊन नव्या अशा खोट्या बातम्या उठवावयाविषयीं इशारी आणिली.

या रीतीची **ओट्स** याची बढती झाली, ह्मणून दुसरे-ही कितीएक ठकबाजी करून द्रव्य मिळवूं लागले. **विलीयम बेड्लो** ह्मणून त्यापेक्षांही लुच्चा असा एक पुरुष होता, तो पुढें प्रसिद्धीस आला. **ओट्स** या सारिखाच तो नीच कुळांतला होता, आणि कितीएक लबाड्या व चोऱ्या यांत धरला गेला होता. त्याचे इच्छेनें त्यास **ब्रिस्तल** शहरांत धरून **लंडन** शहरांत आणिलें, तेथें त्यानें अमात्यांपुढें सांगितलें कीं, मी राणी जेथें राहते, त्या **सामर्सेट** वाड्यांत **सर एड्मन्स्बरी गाड्फ्रे** याचें प्रेत पाहिलें, आणि **लार्ड बेलासिस** याचे चाकरानें मला सांगितलें कीं, जर तूं हें येथून काढशील तर तुला चार हजार **पौंड** देऊं. ती बातमी लोकांनीं मोठे उत्साहानें श्रवण केली, हें पाहून **ओट्स** याची बातमी त्यानें खरी ह्मणून बनावून सांगितली. या रीतीनें सर्व लोक आपल्यास अनुकूळ बोलतात, असें पाहून जे शायदी अझूनपर्यंत बातम्या मात्र नुसत्या उठवीत होते, त्यांनीं थोडासा अधिक धीर करून राणीवर कांहीं अन्यायाचा आरोप ठेविला. **कामन्स** यांनीं राजास त्या वेळीं एक अर्जी देऊन तो आरोप खरा असा कांहीं आपला भर-

वसा दाखविला. तो **लार्ड** यांनीं तिरस्कार करून असत्य असा ठरविला.

**ड्युक यार्क** याचा **सेक्रेतारी कोल्मन** ह्मणून होता, त्यास पुढें प्रथम चौकशीकरितां उभें केलें. **बेड्लो** यानें शपथ केली कीं, यास **जेसुविट** यांचे सरदारानें सनद पाठविली; त्यांत मजकूर कीं, तुह्मास आह्मी **पोप** यांचा मुख्य **सेक्रेतारी** नेमतों; आणि दुसरी गोष्ट कीं, यानें राजाच्या वधाविषयीं संमती दिली होती. या लुच्चांनीं त्यावर आरोप घेतला, सबब शासन ठरविलें; पुढें दोनही सभांतील कितीएक सभासदांनीं त्यास सांगितलें कीं, काय मजकूर असेल, तो तूं कबूल हो, ह्मणजे तुजविषयीं आह्मी रजबदली करूं; परंतु त्यानें कांहीं तशी लबाडी केली नव्हती, ह्मणून शेवटीं लबाडी करून जीव वांचवावा हें, त्यास योग्य वाटेना. त्यानें शेवटपर्यंत मी निरपराधी ह्मणत ह्मणत सर्व दुःखें सोसलीं.

**कोल्मन** याचें शासन झाल्यानंतर **अयर्लंड, पिकरिंग** आणि **ग्रोव** या तिघांची चौकशी झाली. त्यावर अन्याय ठरला, परंतु त्यांचा शिरच्छेद झाला; तेथेंही ते आपण निरपराधी अशी गोष्ट बोलत होते. तथापि ते **जेसुविट** होते, ह्मणून कोणास दया आली नाहीं. **मैल्सप्रान्स** ह्मणून एक होता, त्याचे साक्षीवरून **हिल्ग्रीन** आणि **बेरी** या तिघांनीं **गाडफ्रे** यास मारिलें, असा आरोप ठेविला. यद्यपि **बेड्लो** यानें, आणि **प्रान्स** यानें जें सांगितलें, तें एकमेकाशीं कांहींच मिळालें नाहीं; आणि दुसऱ्यांचे सांगण्यावरून त्या दोघांचेंही सांगणें खोटें पडलें; तथापि तें सर्व व्यर्थ होऊन त्यांस शासन ठरवून शिरच्छेद केला. त्यांतून

**बेरी प्रातेस्तंत** होता, या गोष्टीपासून मोठें आश्चर्य झालें.

**जेसाविट** लोकांचा कोणीएक सरदार **वैट्ब्रेड**, तसेच **फेन्विक**, **ग्यावन**, **टर्नर**, **हार्कट** हे **जेसाविट**, व **लांगार्न** ह्मणून दुसरा कोणी पुरुष, या सर्वांची चौकशी झाली. त्यांवर **ओट्स**, **बेड्लो** आणि **डड्गेल** ह्मणून एक तिसरा यांनीं साक्षी दिली. या तिसऱ्या पुरुषानें विशेष गडबड व्हावयाकरितां बातमी उठविली कीं, **इंग्लंड** देशांतले दोन लक्ष **पोप** मताचे लोक युद्धाविषयीं तयारींत आहेत. **सेंट ओमर्स** या नांवाचे शाळेंतील सोळा शायद्यांवरून त्या बंदिवानांनीं पुरावा केला कीं, **ओट्स** आपण **लंडन** शहरांत होतों ह्मणतो, त्या वेळेस तो **ओमर्स** एथें होता; परंतु तेहि **पोप** मताचे होते, सबब त्यांचा कोणी विश्वास धरीना. या रीतीचे त्यांनीं बहुत जाबसाल केले; परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. मग ते **जेसाविट** आणि **लांगार्न** यांचाही प्राण घेतला, तथापि शेवटपर्यंत त्यांनीं अन्याय कबूल केला नाहीं.

पुढें राणीचा वैद्य **सर जार्ज देक्यान** याची चौकशी झाली, तेव्हांही त्यानें नेहमीं प्रमाणें साक्षी द्यावयास अंतर केलें नाहीं; परंतु त्यास सोडलें. जर त्यास शासन ठरविलें असतें, तर राणीवर गुन्हा सहज लागू झाला असता, ह्मणून असा तर्क होतो कीं, न्यायाधीश आणि **जुरी** यांस ही गोष्ट वाईट वाटली असेल.

नंतर सुमारें दोन वर्षांनीं **अर्ल स्त्राफर्ड** याचा या घातकी दुष्टांच्या योगानें प्राण गेला त्याची चौकशी या प्रकारानें झाली. **ओट्स**, **डडगेल** आणि **तुबार्वेल** या तिघांनीं त्यावर साक्षी दिल्या. **ओट्स** यानें शपथ घेतली कीं,

**जेसविट** लोकांचे सरदाराकडून **फेन्विक** ह्मणून होता, त्यानें येऊन **अर्ल** यास **पोप** पक्षाचे बक्षी तुह्मी, असा निरोप सांगितलेला मी पाहिला, हें ऐकून **अर्ल** याविषयीं लोकांमध्यें गडबड झाली; लागलाच त्याजवर गुन्हा लागू होऊन त्यास फांशीं द्यावें, आणि त्याचे शरीराचे तुकडे करावे असा हुकूम झाला; परंतु राजानें तें शासन शिरच्छेदावर आणिलें. ह्या वृद्ध गृहस्थाचा शिरच्छेद किल्यावर केला, तेथें त्याचें रूप, कर्में, आणि भाषण, यांची शांतता पाहून शत्रूंच्याही नेत्रांत आश्रुपात आले.

हें **पार्लमेंट** सत्रा वर्षेंपर्यंत एकसारिखें बसलें होतें. मग दुसरी **पार्लमेंट** याची सभा केली. **हेबियसकार्पस** या नांवाचा राज्य कायदा त्या सभेंत झाला. तेणेंकरून प्रजा अगदीं जुलुमांतून सुटल्या. त्या कायद्यांतलीं मुख्य कलमें हीं कीं, कोणास समुद्राचे पलीकडे बंदींत घालूं नये; न्यायाधीशांनीं सर्व बंदिवानांस **हेबियसकार्पस** हुकूम द्यावा, ह्मणजे **नाझर** यानें बंदिवानांस कोडतांत हजीर करून त्यांस बंदींत कोणी ठेविलें, आणि कशाकरितां ठेविलें, हें वास्तवीक सांगावें. असें न्यायाधीशानें न केल्यास त्यास मोठी शिक्षा होईल. जर तुरुंग न्यायाधीशापासून वीस **मैल** अंतरावर असला तर बंदिवानानें हुकुमाप्रमाणें तीन दिवसांत हजीर झालें पाहिजे; आणि जर अधिक दूर असला तर त्या हिशेबानें जितके दिवस होतील, त्याचे आंत आलें पाहिजे. ज्यावर फिर्याद असेल त्यावर प्रथमचें **सेशन** यांत आरोप ठेवावा, आणि दुसऱ्यांत त्याची चौकशी करावी, आणि ज्यास गुन्हा लागू न झाल्यामुळें कोडतानें एक

वेळ सोडिलें, त्यावर त्याचसंबंधी पुनः कधीं कोणी फि-र्याद करूं नये.

पुढें लवकरच एक बंड झालें, त्याचें नांव **मील्टबप्लाट** **डेंजर्फील्ड** या नांवाचा एक फार लुच्चा मनुष्य, आणि **पोप** मताची एक **सिलियर** ह्मणून दाई होती, या दोघांनीं मिळून तें बंड रचिलें. त्यानें प्रथम अशी साक्षी पुरविली कीं, राज्य रीतीची उलट पालट करून राजा आणि त्याचें कुटुंब यांस पदच्युत करून काढून द्यावीं, असा वेत चा-लला आहे. ही बातमी त्यानें प्रथम राजा आणि **ड्युक** **यार्क** या दोघांस विदित केली; त्या दोघांनीं त्यास अधिक शोध लावण्याविषयीं द्रव्याचें साहित्य केलें. पुढें त्यानें **कर्नल कान्सेल** ह्मणून होता, त्याचे घरांत कांहीं लबाडीचे कागदपत्र नेऊन टाकिले; आणि जकातीकडचे शिपाई आणवून त्याचें घर शोधिवलें, तेव्हां ते सांपडले.

मग सारे विषयांचा अमात्यांनीं विचार करून पाहातां नजरेस आलें कीं, ते सारे कागद **डेंजर्फील्ड** यानें वना-विले. याकरितां त्यांनीं हुकूम केला कीं, त्याचें जेथें जाणें येणें होतें, तीं सर्व ठिकाणें शोधून पाहावीं. तसें करूं ला-गले तों **सिलियर** इचे घरीं पिठाचे एके पिपांत चोरून ठेविलेले सारे कागद सांपडले. त्यावरून त्या बंडाचें नांव पडलें. या अपराधाकरितां **डेंजर्फील्ड** यास **न्युगेट** ह्म-णून बंदिशाळा आहे, तेथें पाठविलें; तेव्हां तो सारे कागद वनाविलेले असें कबूल झाला. असा तर्क होता कीं, तें सारें कृत्य त्याचेंच; परंतु त्यानें लाविलें कीं, **अर्ल क्यास्तिल्मेन**, **कौंटेस पोविस**, आणि किल्ल्यांतले पांच **लार्ड** हेही त्यांत सामील होते. त्यानें सांगितलें कीं, त्या बंडाचा मतलब हा

होता कीं, खोटी साक्षी दिली, हा गुन्हा **ओट्स** यावर लागू करावा; **अर्ल शाफ्ट्स्बरी** याचा प्राण घ्यावा; तसेंच **ड्युक मान्मौथ** आणि **बकिंगम** व **अर्ल एसेक्स** आणि **हालिफाक्स** यांवर असा आळ घ्यावा कीं, राजा आणि त्याचा भाऊ यांवर बंड झालें होतें, त्यांत ते सामील होते. या बातमीवरून **क्यास्तिल्मेन** आणि **कौंटेस पोविस** यांस धरून किल्ल्यावर टाकिलीं; आणि राजाही त्या बंडास अनुकूळ होता, असा कितीएकांचे मनांत संशय आला.

त्या समयींचे **कामन्स**, फार प्रयत्न करीत होते कीं, राजाचा भाऊ **ड्युक यार्क** यानें पुढें राज्य करूं नये; असा कायदा ठरवावा. याचा विचार पूर्वी झाला होता, परंतु केवळ नियम ठरला नव्हता. **शाफ्ट्स्बरी** व त्या पक्षांतील दुसरे मोठमोठे लोक, यांचें आणि **ड्युक यार्क** याचें असें वांकडें पडलें होतें कीं, याचा केवळ नाश होईल तरच त्यांचा बचाव असा प्रसंग आला होता. **मान्मौथ** याचे मित्रांस आशा होती कीं, **जेम्स** याचा अधिकार नाहींसा व्हावा, आणि आपले स्वामीस राजासन मिळावें. **यार्क** यास आपले मताचा अतिशयच अभिमान होता, यास्तव, आणि त्यानें **स्काटलंड** देशांत असतां लोकांस बहुतच पीडा दिली, ह्मणून हजारों लोक त्याचें वाईट चिंतीत असत. तें **सेशन** चालू झाल्यावर प्रथमचे आठवड्यांत **ड्युक यार्क** यास पुढील राज्याधिकारापासून बहिष्कृत होण्याचा हुकूम करावयाचा विचार ठरवायाकरितां एक **कमिटी** ह्मणजे मंडळी नेमिली. मग त्याविषयीं राजासमक्ष त्या मंडळींत वादविवाद बहुत झाले; शेवटीं तो हुकूम झाला नाहीं.

त्या समयीं कांहीं दिवसपर्यंत निंदेचे ग्रंथ प्रसिद्ध करून परस्परांचा उपहास करावा; असें उभयपक्षीं चाललें होतें; या चालीवरून एक सांगावयाजोगी गोष्ट झाली ती अशी. **डचेस पोर्टस्मौथ** या नांवाची राजाची एक राख होती, तिचेजवळ सेवेंतला **फित्सहारिस** ह्मणून **अयर्लंड** देशाचा एक **पोप** मताचा पुरुष होता. त्याचेजवळ पूर्वीं सांगितलेले ग्रंथ तिला आणून देण्याचें काम होतें. असें असतां आपणही कांहीं तसें करावें, अशी इच्छा उत्पन्न होऊन त्यानें **एवर्हार्ड** या नांवाचा एके **स्काटलंड देशचे** पुरुषास राजा आणि **ड्युक यार्क** यांची निंदा लिहावयाचें काम सांगितलें. तो **एवर्हार्ड** दुसरे पक्षाचा दूत होता, याकरितां त्यानेंही आपणास धरावयाची युक्ति, असें समजून तें सर्व वर्तमान **सर विलियम वालर** ह्मणून न्यायाधीश होता, त्यास सांगितलें, आणि तें खरें अशी त्याची खातर व्हावी; ह्मणून तो आणि दुसरे दोघे पुरुष यांस लपवून ठेवून, आपलें व तो **फित्सहारिस** यांचें भाषण सारें ऐकविलें.

त्या निंदापत्रांत बहुत द्वेषयुक्त अशीं कठोर वाक्यें लिहिलेलीं होतीं. **वालर** यानें ती वातमी राजाच्या कानावर घालून **फित्सहारिस** यास धरावयाचा हुकूम केला. त्या वेळेस त्याचे खिशांत त्या निंदापत्राची एक नक्कल होती. आपण ज्या लोकांचे हातीं सांपडलों त्यांपासून दया प्राप्त व्हावयाची नाहीं, असा निश्चय समजून त्यानें त्यांचाच पक्ष धरिला, आणि तें निंदापत्र बनाविल्याचा आरोप अमात्यांवर ठेविला. त्यानें अशी सबब लाविली कीं, अमात्य तें निंदापत्र प्रसिद्ध करून असें इच्छित होते कीं, ज्या लोकांनीं **ड्युक यार्क** राजा न होण्याविषयीं यत्न केला होता, त्यांनीं

तें लिहिलें, असें लोकांनीं समजून त्यांचा तिरस्कार करावा. **फित्सहारिस** यानें पुढें **पोप** याचे पक्षाचें दुसरें एक मोठें नवें बंड झालें आहे, अशी वातमी उठविली. तो बोलिला कीं, त्या बंडांत, आणि **सर एड्‌न्सबरी गाड्‌फ्रे** यास मारण्यांत **ड्युक यार्क** यानें मुख्यत्वें प्रयत्न केला.

पुढें राजानें **फित्सहारिस** यास बंदींत टाकिलें असतां **कामन्स** यांनीं त्याचा पक्ष घेतला. त्यांनीं ठरविलें कीं, साधारण न्यायरीतीनें त्याची चौकशी होऊं नये; परंतु आपण मात्र काय करावयाचें तें करावें. **लार्ड** यांनीं या गोष्टीस संमति दिली नाहीं. ह्मणून **कामन्स** यांनीं आपली सत्ता प्रतिपादावयाचा उद्योग केला, आणि दोघांमध्यें कलह लागावा असा समय आला. तो होऊं देऊं नये, असा निश्चय करून राजानें **पार्लमेंट** सभेस जाऊन तीस निरोप दिला; आणि निश्चय केला कीं, पुढें दुसरें **पार्लमेंट** सभेस बोलावणें करावयाचें नाहीं.

या रीतीनें राजा वर्तेल असें **पार्लमेंट** सभेचे ध्यानांतही नव्हतें; तेव्हांपासून पुढें **पार्लमेंट** सभेचे कलहाची समाप्ति झाली; आणि राजाही अतिशय स्वेच्छेनें वर्तूं लागला. तसेच आपले दोष आणि विपत्ति यांहींकरून दुर्दशा पावलेले राज्याचा अधिकार आपल्यामागें भावानें चालवावा, असा बेत त्यानें योजिला. त्याचें चित्त पूर्वीं सरळ, आणि दयाळू होतें, तें आतां स्वेच्छाविहारी आणि निष्ठुर होऊन गेलें; त्यानें पुढें आपल्याजवळ चाहाडखोर दूत बाळगिले. आणि जे किंचित् बंडांत किंवा लबाडींत आहेत, असें दृष्टीस आलें, त्यांस एकंदर बंदींत टाकिलें.

नंतर **प्रेस्बितीरियन** लोकांचा मान कमी करावा असा

निश्चय करून **चार्लस** राजानें त्यांस त्यांचे जाग्यावरून आणि रोजगारांतून काढिलें, आणि जे दरबाराशीं मिळून होते त्यांस मात्र ठेविलें. धर्मपक्षी लोकांनीं लेख व भाषणें यांहींकरून आपली आस्था दाखविली. त्यांमध्यें राजाचे पक्षाचे लोक बहुत होते; जे विरुद्ध, ते मोठे धीट होते. राजा प्रथमच्यांचा पक्ष धरून त्यांत आपण मुख्य झाला; आणि प्रजापक्षांत फार दिवसपर्यंत मुख्य होते; असे जे **लंडन** शहरचे लोक त्यांचा **चार्टर** ह्मणजे सनद जप्त केली. मग ते फारच शरण गेले तेव्हां ती त्यांस परत दिली; आणि त्या शहरचे **माजिस्त्रेट** ह्मणजे कोतवाल यांची नेमणूक आपले हुकुमाप्रमाणेंच व्हावी असें ठरविलें.

त्या नवे जातीचे राजनीतीची स्थिरता व्हावी, ह्मणून राजानें क्रूर कर्में करून भयप्रदर्शन करावयाचा प्रारंभ केला. **फित्सहारिस** याची जुरीकडून चौकशी करवून त्याचा शिरच्छेद केला. मग पूर्वींचे सारे दूत, शायदी, बातमीदार, आणि लबाडी करणारे, राजा मुखत्यारीनें वागतो असें पाहून आपले पूर्वींचे धन्यावर फिरून बालंटें घेऊं लागले. राज्याचे अमात्यांनीं संतुष्ट होऊन त्यास आश्रय दिला, त्यामुळें पूर्वीं **क्याथोलिक** लोकांचे गुन्हेगाऱ्यांकरितां जशीं शासनें होत होतीं, तशीं आतां **प्रेस्बितीरियन** लोकांचीं होऊं लागलीं.

पुढें पहिल्यानें **स्तीफनकालेज** या नांवाचे पुरुषावर आमात्यांची गैरमर्जी झाली. तो **लंडन** शहरांत राहाणारा एक सुतार होता, आणि **पोप** मताशीं विरुद्ध आचरण करीत असे, ह्मणून **प्राटेस्तंट** सुतार असें नांव पावला होता. तो हत्यारबंद होऊन **पार्लमेंट** सभेंतील **लंडन**

शहरचे लोकांबरोबर **आक्सफर्ड** शहरास गेला होता; आणि तो कधीं राजाची निंदा करीत असे. त्या काळीं फितुराईचा गुन्हा **लंडन** शहरांतील **ग्रांडजुरीनें** त्यावर ठरविला. नंतर **आक्सफर्ड** शहरांत **जुरीनें** एक अर्धतास विचार करून तो काईम केला; तेव्हां जे तमासगीर जवळ होते, ते परम संतुष्ट होऊन प्रशंसा करूं लागले. त्याचे दैवास आलें तें त्यानें मोठ्या धैर्यानें सोसलें; आणि शेवटपर्यंत आपण निरपराधी असें ह्मणून प्राण सोडिला.

इ०स० १३८३ या समयीं राजाचें सामर्थ्य फार वाढलें. त्यानें पूर्वी सांगितल्याप्रमाणें **लंडन** शहरचा **चार्टर** रद्द करून लोक जेव्हां केवळ शरण आले तेव्हां पुनः तो चालू केला; आणि **माजिस्त्रेट** यांची नेमणूक आपले स्वाधीन करून घेतली, हें पाहून **इंग्लंड** देशांतील सर्व **कार्परेशन** यांनीं पुढें आपलीही अवस्था तीच होईल, हें भय मनांत आणून आपले **चार्टर** राजाचे स्वाधीन केले. ते परत देते समयीं राजानें त्यांपासून बहुत द्रव्य घेतलें; आणि सर्व कारभाऱ्यांची नेमणूक आपले हातांत ठेविली. राजाची सत्ता फार झाली होती; ह्मणून चतुर पुरुषांनीं विचार करून ठरविलें कीं, आतां दुःख होत आहे, तें स्वस्थपणें सोसावें, यास दुसरी तोड नाहीं; परंतु **इंग्लंड** यांत कितीएक लोक असेही होते कीं, पूर्वीच्या स्वतंत्रपणाचें संरक्षण करण्यासाठीं जितका प्रयत्न होईल तितका करावा, असा त्यांचा निश्चय होता.

**ड्युक मान्मौथ**, जो राजाची **मिस्त्रेस वाटर्स** ह्मणून बायको होती, तीपासून झालेला मुलगा, त्यानें आपले पक्षास **अर्ल माक्स्फील्ड**, **लार्ड ब्रांडन**, **सर गिल्बर्ट जिरार्ड**,

आणि **चशौर** या प्रांतांतले दुसरे कितीएक ग्रहस्थ मिळविले. **सर विलियम कोर्नी, सर फ्रान्सिस रौल्स**, आणि **सर फ्रान्सिस डूक** यांचीं, आणि **लार्ड रसल** याचीं कागदपत्रें होऊन ठरलें होतें कीं, त्यांनीं अकस्मात् पश्चिम प्रांत फितुर करून उठवावा. **शाफ्त्बरी**, व **फर्गुसन** या नांवांचा धर्मपक्षी, या दोघांनीं शहरचा बंदोबस्त पतकारिला. त्यांवर बंडवाल्यांचा मोठा भरंवसा होता. पुढें **शाफत्सबरी** यास आशा आली कीं, आपले प्रयत्न आतां सिद्धीस जातील.

शेंकडो बेत त्याचे फुकट गेले, परंतु हा एक शेवटचा तरी सिद्धीस जाईल अशी त्याची खातर होती. **लार्ड रसल** यानें **मान्मौथ** यास सांगून तो उद्योग तहकूब ठेविला, ह्मणून राज्यांमध्यें आंतले आंत लढाई व्हावयाची राहिली; परंतु **शाफत्स्बरी** याचे मनांत पुढें संकट येईल याचें भय इतकें वाढलें कीं, तो आपले घरांतून निघून इकडे तिकडे फिरून **लंडन** शहरचे लोकांकडून उघड बंड करावयाचा उद्योग करूं लागला; पण तो व्यर्थ झाला. या रीतीनें त्यानें आपला बेत सिद्धीस जावयास अनेक विघ्नें होतात असें पाहून, क्रोधांध होऊन पण केला कीं, माझे स्नेही आहेत तेवढ्यांचेच मदतीनें मी हें काम तडीस पोंचवीन. मग फार दिवस पर्यंत काम सिद्धीस जाईना; ह्मणून क्रोध आणि भय यांहींकरून पीडित होऊन, शेवटीं तो **लंडन** शहरांतून निघून **आमस्तर्डाम** शहरास जाऊन, थोडकेच दिवशीं मरण पावला. त्याविषयीं मित्रांस दया आली नाहीं, किंवा कोणी शत्रूही भ्याले नाहींत. **शाफत्स्बरी** मेला, त्यामुळें बंडवाल्यांचे बेत घसरले खरे,

परंतु केवळ मोडले नाहींत. मग त्यांनीं त्या कामाचा वि-
चार करावयाकरितां साहा आसाम्यांची मंडळी नेमिली.
त्या ग्रहस्थांचीं नांवें, **मान्मौथ**, **रसल**, **एसेक्स**, **हवर्ड**,
**आल्जर्नन सिड्नी** आणि **जान हांप्डन**, पूर्वीं जो या
नांवाचा मोठा ग्रहस्थ सांगितला त्याचा नातू, इतके होते.

वर सांगितले हे ग्रहस्त आणि **आर्गैल** याचा **ड्युक**
इतके त्या बंडांत मुख्य होते. या रीतीचेच दुसरेही ल-
हान बंडवाले नेहमीं एके ठिकाणीं जमून मसलती करीत,
त्या **मान्मौथ** वगैरे मंडळीस ठाऊकही नव्हत्या. या दु-
सरे मंडळींत मुख्य ग्रहस्थ होते त्यांचीं नांवें; **कर्नल रम्सी**,
सर्वसत्ताक राज्याचे वेळचा सरदार, तसाच **लफ्टनंट
कर्नल वाल्ट**, व **गुडइनफ**, **लंडन** शहरचा **अंडरशेरी-
फ**, मोठा प्रसिद्ध आणि कज्जेबाज, व **फर्गुसन** ह्मणून एक
धर्मपक्षी, आणि तसेच कितएक **लंडन** शहरांतील वकील,
व्यापारी, आणि उद्यमी लोक होते. हे लोक एकीकडे
जमून मोठमोठे भयंकर असे विचार ठरवीत. एकदां
त्यांनीं निश्चय केला कीं, राजा जव्हां **न्युमार्केट** गावांस
जाईल तेव्हां त्यास ठार मारून टाकावें. त्या बंडवाल्यांत
एक **रंबाल** या नांवाचा होता, त्याचें **रैहौस** नांवाचें घर
रस्त्यावर होतें, ह्मणून त्या बंडाचें नांव **रैहौस** बंड असें
पडलें. त्यांनीं अशी युक्ति योजिली कीं, राजा त्या वाटेनें
जात असतां रस्त्याचे मध्यें एक गाडें घालून त्याचा रथ
थांबवावा, आणि त्या वेळेस कुंपणाचे आंतून दडून गोळी
मारावी; परंतु राजा ज्या घरांत राहात होता, त्यास सहज
अग्नि लागल्यामुळें त्यांनीं योजिलें होतें, त्याचे पूर्वीं आठ

दिवस तो निघून गेला; ह्मणूनच त्याचें प्राणसंरक्षण झालें.

बंडवाल्यांमध्यें **कैलिंग** या नांवाचे एकानें **लंडन** शहरचा **मेयर** यास पकडलें होतें, ह्मणून आपलें शासन होईल, या भयानें त्यानें मसलत केली कीं, अमात्यांस बंडाचें वर्त्तमान कळवून क्षमा पावावी. **कर्नल रम्सी**, आणि **वेस्त** नामें एक वकील होता तो, हे दोघे ती बातमी ऐकून लागलेंच राजाचे पक्षाची शायदी देण्याकरितां त्यांजवळ जाऊन तयार झाले. **मान्मौथ** लपून राहिला; **रसल** यास किल्ल्यावर पाठविलें; **ग्रे** पळाला; **हवर्ड** धुरांड्यांत लपला होता तो सांपडला. तसेच **एसेक्स, सिड्नी** व **हांप्डन** हे पुढें लौकर सांपडले, आणि तेथें **लार्ड हवर्ड** आपणास प्रतिकूळ साक्षी देतो पाहून फार कष्टी झाले.

**रम्सी, वेस्त** आणि **शेपर्ड** यांचे शायदी वरून **बाल्कोट** नांवाचे पुरुषाची चौकशी करून, तो बंडास सामील असें ठरवून त्याचा शिरच्छेद केला. त्याचें बरोबर **होन** आणि **रौस**, या दोघांसही मारिलें. त्यांनीं अतिशय खेदयुक्त होऊन आपणांस जें शासन झालें हें योग्य असें कबूल करून, प्राण सोडिला. पुढें लवकरच **अर्ल बेड्फर्ड** याचा मुलगा **लार्ड रसल** याचा वध सर्वांपेक्षां अति निंद्य असा उपस्थित झाला. त्या ग्रहस्थांत असंख्य सद्गुण होते; तो **ड्युक यार्क** याचा बेत पुनः **पोप** मताप्रमाणें धर्म करावयाचा; असें जाणून त्या खटल्यांत पडला होता. तो उदार, सभ्य, कृपाळू, आणि शूर असे, परंतु त्या दरबारांत हे सर्व गुण केवळ दोषरूप झाले. त्यास विरुद्ध शायदी देणारा मुख्य **लार्ड हवर्ड** ह्मणून हलके

अबरूचा मनुष्य होता; तो पूर्वी बंडांत होता, याकरितां असें दुष्कर्म करून आपला प्राण वांचवावा अशी युक्ति त्यानें योजिली. त्या शायदीनें शपथ घेतली कीं, **रसल** शहरांत अकस्मात् दंगा करावयाचे मसलतींत होता; परंतु राजवधाचे मसलतींत तो होता, हा आरोप त्यावरचा उड-विला; आणि **रम्सी** व **वेस्त** या दोघांनींही तसेंच केलें. **जुरीचे** सारे लोक राजाचे पक्षाचे होते, ह्मणून त्यावर गुन्हा लागू करावयास त्यांस फार विचार करावा लागला नाहीं. त्याचे शिरच्छेदाकरितां **लिंकन्स इन्फील्ड्स** या नांवाचें ठिकाण आहे, तेथें काष्ठ पुरलें होतें, तेथें जाऊन त्यानें किमपि विकार न पावतां आपलें डोकें टेकलें, मग दोन फटक्यांत तें तुटून खालीं पडलें.

**अर्ल लेसस्तर** याचा मुलगा **आल्जर्नन सिड्नी** होता, त्याची चौकशी होण्यास पुढें लवकरच प्रारंभ झाला. पूर्वीं राजाचा पराजय करावयाकरितां **पार्लमेंट** सभेनें जें सैन्य ठेविलें होतें, त्यांतील कांहीं अंमल त्याजवळ होता, आणि राजाची चौकशी करावयास जें **कोर्ट** नेमिलें, त्यांतही त्याचें नांव होतें; परंतु तो न्यायाधीशांत बसत नसे. त्यानें **क्राम्वेल** याचे अपहारास प्रतिबंध केला होता, आणि जेव्हां राजाची पुनःस्थापना झाली, तेव्हां तो स्वेच्छेनें देशत्याग करून गेला, पुढें त्यास येण्याचें कांहीं काम लागलें, ह्मणून तो राजास अर्जी करून क्षमा पावला. त्याच्या सर्व आशा आणि कल्पना सर्वसत्ताक राज्यावर होत्या. या सर्वसत्ताक राज्याकरितां त्यानें लिहिलें, युद्ध केलें, देश त्याग केला, आणि पुनः परतही आला. तसा पुरुष दरबारांत चांगला वाढला नाहीं; आणि त्याकरितां त्यास मारावयास

अन्यायानें उद्योग होऊं लागले. त्यावर साक्षी **लार्ड हवर्ड** मात्र होता; आणि कायद्याप्रमाणें दोन पाहिजेत, ह्मणून त्यांनीं पुढें विलक्षण युक्ति केली. त्याची खोली शोधिली तेव्हां त्याचे हातचे कांहीं कागद सांपडले; त्यांत मुख्यत्वें स्वतंत्रपणाचा विषय होता, परंतु राजसत्ताक रीतीस केवळ प्रतिकूळ होते असें नाहीं. तथापि त्यांत कांहीं अधिक करून त्यांतून कितीएक सरकार गुन्हेगारीचे ठरविले. त्यानें त्यावर जाब दिला कीं, कागदांवर कांहीं प्रमाण नाहीं; कारण तें मीच लिहिलें असा पुरावा झाला नाहीं; आणि जरी झाला तरी यांत कांहीं गुन्हेगारीचा संबंध नाहीं. हा त्याचा जबाब न ऐकतां **जेफ्रीस** ह्मणून त्या वेळेस परम क्रूर मुख्य न्यायाधीश होता, त्यानें पक्षपातानें **जुरी**कडून त्याला गुन्हेगार ठरविलें. पुढें लवकरच त्याचा शिरच्छेद झाला.

या राज्यांतील वृत्तांत मनांत आला ह्मणजे भय वाटतें. उभयपक्षांकडे अपराध दृष्टीस येतो. तो असा. लोक एकमेकांवर मोठ्या आवेशानें शस्त्र धरायास सिद्ध; दरबारांत विषयसुख आणि रक्तपात हीं सतत चाललींच आहेत; आणि गडबड व पक्षपात बंद करावयाविषयीं उद्योग करावा, अशी कोणामध्यें बुद्धि राहिली नाहीं.

पुढें थोडे दिवसीं **हांप्डन** याची चौकशी झाली, तेव्हां त्याचा प्राण घ्यावयास कांहींच निमित्त सांपडेना, ह्मणून ४०,००० **पौंड** दंड मात्र घेतला. **हालोवे** नामें **ब्रिस्तल** शहरचा एक व्यापारी, तो पळून **वेस्तइंडीस** देशास गेला होता, त्यास परत आणून चौकशी करून शिरच्छेद केला. **सर टामस आर्मस्त्रांग** ह्मणून दुसरा एक गृहस्थ

**हालंड** देशांत पळाला होता, त्यास धरून आणून तीच अवस्था केली. **लार्ड एसेक्स** यास किल्यावर टाकिलें होतें, त्याचा गळा कापलेला असा तो खोलींत सांपडला; परंतु त्यानें स्वेच्छेनें तें केलें, किंवा कोणी द्वेषानें त्याचा जीव घेतला, याचा आतां स्पष्ट शोध लागत नाहीं. या राज्यांत जीं बंडें झालीं त्यासंबंधी शेवटचा मारिलेला हा.

त्या काळीं **चार्लस** राजाचें राज्य अतिशय क्रूर रीतीनें चालत असे; तसें **युरोप** देशांतले कोणते राजाचें न्व्हतें; परंतु हें लोकांचें दैव ह्मणावें कीं, तो त्याचा क्रूरपणा फार दिवस राहिला नाहीं. त्याला अकस्मात् एक मूर्छा आली. रक्त काढल्यानें अणखी कांहीं दिवस तो जीवंत राहिला, आणि पुढें मृत्यु पावला. त्या वेळेस त्याचे वयास एकुणसाठ वर्षें होतीं, आणि त्यानें पंचवीस वर्षें राज्य केलें. तो दुखणेकरी असतां कित्येक धर्मपक्षी त्याजवळ गेले, त्यांविषयीं त्यानें फार अनास्था केली. पुढें **रोमनक्याथोलिक** मताचे त्याजवळ आणिले, तेव्हां त्यांचे हातानें त्याचा शेवटचा संस्कार झाला.

---

## प्रकरण ३१.

### द्वितीय जेम्स् राजाची कथा.

संन् १६८५ पासून १६८९ पर्यंत.

**चार्लस** मेल्यानंतर त्याचा भाऊ, द्वितीय **जेम्स** राजा हा किताब धारण करून सिंहासनारूढ झाला. त्याची आई **पोप** मतानुसारी होती, ह्मणून त्यास त्या मताचा अतिशय अभिमान होता. तो सर्व राजचिन्हासहवर्तमान **रो**-

**मनक्याथोलिक** देवळांत ईश्वर भजनास जाई. त्यानें **क्यारिल** ह्मणून कोणी होता, त्यास वकील करून **रूम** शहरास **पोप** याजवळ पाठवून दिलें; आणि **इंग्लिश** यांस पुनः त्या **रोमनक्याथोलिक** धर्मांत आणावें, ह्मणून त्यानें यत्न आरंभिला. पुढें **ड्युक मान्मौथ** यानें वंड उत्पन्न केलें, त्यापासून राज्यांत अनर्थ व्हावयाचा आरंभ झाला. त्यानें पूर्वीं वंड केलें तेव्हां त्यास क्षमा मिळाली, परंतु राज्यांतून बाहेर निघून हालंड देशांत जावें, अशी आज्ञा केली होती; ह्मणून कांहीं दिवस प्रथम तेथें होता; पुढें **जेम्स** राज्य करूं लागला, त्या वेळेस **प्रिन्स आरेंज** यानें त्यास बाहेर घालविलें. मग तो **ब्रसल्स** शहरांत गेला, परंतु तेथेंही शत्रु पाठ सोडीत नाहीं, असें पाहून, त्यानेंही त्याजविषयीं तसाच निश्चय करून पुनः एक वेळ राज्यावर प्रयत्न आरंभिला. पूर्वींपासून लोकांची त्यावर बहुत प्रीति असे; ह्मणून त्यांनीं बातमी उठविली कीं, **मान्मौथ** याचे आईशीं **चार्लस** राजानें लग्न केलें; ह्मणून तो **चार्लस** राजाचा औरस पुत्र **ड्युक आर्गैल** यानें त्याचा बेत **स्काट्लंड** देशांत सिद्धीस नेण्याचा उद्योग आरंभून दुहेरी वंडाचा बेत केला; तो असा कीं, **मान्मौथ** यानें पश्चिमेकडील लोकांस उठवावयाविषयीं यत्न करावा, आणि **आर्गैल** यानें उत्तरेकडेस उद्योग करावा.

**आर्गैल** यानें प्रथम **स्काट्लंड** देशांत येऊन जाहिराती प्रसिद्ध करायाचा प्रारंभ केला, आणि दोन हजार पांचशें लोक जमवून आपण सरदारपणा पतकारिला. त्यानें लोकांस आपले पक्षाविषयीं अभिमान पडावयाकरितां यत्न बहुत केला; परंतु राजाची

इ० स० १६८५

पुष्कळ फौज त्यावर आल्यामुळें त्याचें सैन्य नाश पावलें, आणि तो पळून जावयाच्या उद्योगांत होता, अशांत घाय लागून धरिला गेला. तो गळाभर पाण्यांत उभा असतां त्यास एके शेतकऱ्यानें धरिलें. तेथून त्यास **एडिन्बरो** शहरास नेलें, तेथें तो धैर्ययुक्त मनानें अनेक प्रकारचे अपमान सोसून शेवटीं शिरच्छेद पावला.

त्या वेळेस **मान्मौथही डार्सेत** प्रांतांत आला, त्याचे बरोबर सरासरीस शंभर लोक होते, परंतु **इंग्लंड** देशांतले लोकांची त्यावर अतिशय प्रीति, आणि **जेम्स** राजाचें शरीर, व धर्म यांचा सर्वांस परम द्वेष होता, ह्मगून चार दिवस झाले नाहींत इतक्यांत त्याजवळ दोन हजारांवर लोक जमले. तितके घेऊन तो **टांटन** शहरास गेला, तों साहा हजार झाले, आणि दुसरे बहुत त्याचे जरीपटक्याजवळ येत असत, त्यांस आयुधें नाहींत ह्मगून प्रतिदिवशीं निरोप द्यावा लागे, तो **ब्रिज्वाटर, वेल्स** आणि **कोम** या ठिकाणांस गेला होता, तेथील लोकांनीं त्यास मान्य केला, परंतु ही निरर्थक प्रतिष्ठा मिळवावयास लागून त्यानें युद्धाचा समय घालविला. त्याचा चढाव पाहून राजास फार भय वाटलें. पुढें त्या सैन्याचें निवारग करण्याकरितां **हालंड** देशांतून **इंग्लिश** लोकांच्या साहा पलटणी बोलाविल्या; आणि दुसरे तीन हजार लोक जमवून त्यांचा सरदारपणा **फीवर्शम** आणि **चर्चाहिल** या दोघांस दिला. मग त्यांनीं इतक्या फौजेनिशीं जाऊन **ब्रिज्वाटर** याजवळ **जज्मोर** या नांवाचें गांव आहे तेथें तळ दिला. तेथें त्यांस प्रांतांतील **मिलिशिया** याचे लोक येऊन मिळाले. या ठिकाणीं **मान्मौथ** यानें निश्चय केला कीं, आतां प्राग द्यावा किंवा

राज्य घ्यावें. **फीवर्शम** पूर्वी राजाचा सरदार सांगितला, त्याची गफलत पाहून **मान्मौथ** यानें त्यावर हल्ला केला. प्रथम ते राजाचे पायदळास जाग्यावरून हालवून पराजय करण्याचे युक्तींत होते. इतक्यांत **मान्मौथ** यानें कांहीं वेडेपणा केला, आणि घोंडेस्वारांचा सरदार **लार्ड ग्रे** होता, तो प्रथम पळाला, ह्मणून राजपक्षी सैन्यानें पुढून हल्ला करून सुमारें एके प्रहरांत त्याचा केवळ पराभव केला. लढाईंत सुमारें तीनशें पडले, आणि पळते वेळेस एक हजार मेले गेले. ज्या युद्धाचा आरंभ शुद्ध अविचारपूर्वक झाला, आणि ज्याचा उद्योगही आळसेंकरून झाला, तें युद्ध या रीतीनें समाप्तीस गेलें.

नंतर **मान्मौथ** घोड्यावर बसून रणभूमीपासून सुमारें वीस **मैल** पळाला, तेथें त्याचा घोडा बसला. तेव्हां तो वरून उतरला, आणि आपलीं वस्त्रें एके गुराख्यास देऊन त्याचीं कापडें आपण नेसला. त्याचे बरोबर **हालंड** देशांतून आलेला एक **जर्मनी** देशचा **कौंट** होता, आणि हे दोघे क्षुधा आणि श्रम फार सोसून एके शेतांत निजले, आणि त्यांनीं आपले अंगावर गवत घेतलें इतक्यांत **ड्युक** याचे शोधार्थ मागून येत होते, त्यांनीं त्याचीं वस्त्रें अंगावर धारण केलीं आहेत असा एक गुराख्या पाहिला; ह्मणून ते फार जपून शोधूं लागले. शेवटीं त्याचे बरोबर कुत्रीं होतीं त्यांनीं त्याचा शोध लाविला. त्यानें प्राणरक्षणार्थ ओला वाटाणा शेतांतून जमा केला होता, तो त्या वेळेस त्याचे खिशांत होता. जेव्हां तो शत्रूंचे हातीं सांपडला तेव्हां त्यास रडें आलें, आणि त्यानें प्राण वांचवावयाकरितां बहुत प्रार्थना केली. नंतर राजास त्यानें बहुत नम्रतेनें

पत्रें पाठविलीं; आणि त्या राजानेंही पराजित शत्रूच्या दुःखानें आपले नेत्र तृप्त करण्याकरितां त्याची भेट घेतली. त्या वेळेस तो **ड्युक** आपल्या गुडघ्यांवर उभा राहून मोठ्या दीनतेनें जीवदान मागूं लागला. पुढें राजानें तो पूर्व राजाचा असल पुत्र नव्हे असा कागद करून दिला त्यावर त्यानें सही केली. ती सही झाल्यावर राजानें त्यास सांगितलें कीं तुझा अपराध फार मोठा, याकरितां तुला क्षमा होणार नाहीं. आपले चुलत्याची दया होण्यास कांहीं कारण राहिलें नाहीं असें पाहून, तो आपलें चित्त आवरून तिरस्कारानें तेथून निघून गेला. बहुत लोकांचे मनांत दया येऊन ते त्याचे मागून गेले. त्यानें शिरच्छेद करणारास सांगितलें कीं, **रसल** याचे वेळेस तुला दुसऱ्यानें शस्त्र मारावें लागलें तसें आतां करूं नको. अशी त्यानें सावधगिरी केली ती फुकट गेली; कारण त्यास कंप झाल्यामुळें त्याचें शस्त्र जोरानें लागलें नाहीं. **ड्युक** यानें त्यास सूचना करावयास डोकें वर करून पुनः तें खालीं ठेविलें, आणि त्या माणसानें पुनः शस्त्रप्रहार केला, परंतु व्यर्थ गेला. मग त्यानें कुऱ्हाड हातांतली खालीं ठेविली, परंतु **शेरीफ** यानें ताकीद केल्यामुळें त्यानें आणखी दोन वेळ प्रहार करून डोकें तोडिलें. **इंग्लिश** यांस परम प्रिय जो **जेम्स, ड्युक मान्मौथ** त्याचा या रीतीनें अंतकाळ झाला. तो शूर, निष्कृत्रिमी, आणि भला होता; परंतु त्यास आत्मस्तुति फार आवडत असे, ह्मणूनच त्यानें आपले सामर्थ्याबाहेर उद्योग केला.

हा रक्तपात झाला, इतक्यानेंच जर पूर्वींचे अपराधाचें शासन झालें असतें, तर बंडवाल्यांचें आणि राजाचेंही

कल्याण होतें, परंतु तें तसें झालें नाहीं, आणि युद्धांत जे धरिले गेले होते, त्यांस त्या विजयी सैन्यानें बहुतच पीडा केली. **फिवर्शम** यानें जय पावल्यानंतर लागलेंच सुमारें वीस बंदिवानांस फांशीं दिलें. अपराधी लोकांची चौकशी करायाकरितां **जेफरीस** ह्मणून न्यायाधीश नेमिला होता, तो लश्करी सरदारांपेक्षां फार क्रूर होता. तो पुरुष मुळ-चाच क्रूर होता, तशांत नित्य मद्यपानानें विशेष उन्मत्त होत असे. त्यानें बंदिवानांस सांगितलें कीं, तुह्मी कबूल होऊन मला चौकशीचें श्रमांत न पाडाल, तर तुह्मास कांहीं क्षमा होईल, नाहीं तर कायद्याप्रमाणें मला निष्ठुर-तेनें वर्तावें लागेल. हें ऐकून बहुत हतभाग्य लोक कबूल झाले, तेणेंकरून त्वरीत मृत्यू पावले. **दार्चेस्तर** शहरांत सुमारें ऐशीं मेले; तसेच **एक्सेतर, तांतन्** आणि **वेल्स** या सर्व ठिकाणीं मिळून त्यापासून दोनशें एकावन्न मेले गेले.

धर्मप्रकरणीं **जेम्स** राजा यापेक्षां अधिक जुलूम करीत असे. त्या वेळेस **पोप** याचे मताशीं विरुद्ध जे लोक होते, त्यांत **लंडन** शहरांतला **डाक्तर शार्प** या नांवाचा एक धर्मपक्षी होता. **पोप** याचे **मिशनारी** लोकांचे सां-गण्यावरून ज्यांनीं धर्म बदलला होता, त्यांची तो फार निंदा करी. त्यावरून राजास फार राग आला. मग **लंडन** शहरांतील **बिशप** यास खचित आज्ञा केली कीं, राजा हुकूम करी तंवपर्यंत त्यास कामावरून दूर करावें. धर्माध्य-क्षानें ही आज्ञा मानिली नाहीं; ह्मणून राजानें त्याचेंच प्रथम शासन करावयाचा निश्चय केला. त्याविषयीं धर्म-पक्ष्यांची एक मंडळी नेमिली, तींतले साहा मनुष्यांस धर्म-प्रकरणीं संपूर्ण अधिकार दिला. नंतर या मंडळीपुढें **बि-**

**शप** यांस बोलावून आणून तो आणि **शार्प** या दोघांचा उद्योग बंद केला.

नंतर **जेम्स** राजानें सर्व मताचे लोकांस इच्छेस येईल त्याप्रमाणें धर्मांविषयीं विचार करावयाची मोकळीक दिली; कारण त्याचा समज असा होता कीं, अशानें **रोमनक्याथोलिक** मताचा श्रेष्ठपणा प्रसिद्ध होईल; आणि इतर मतें मोडून सर्वत्र त्याची प्रवृत्ति होईल. मग **पोप** यास आपली आधीनता कळविण्याकरितां, आणि त्याचे मतावर आपले राज्यांतील लोकांचा विश्वास बसावयाकरितां, **अर्ल क्यास्तिल्मेन** यास आपला वकील करून **रूम** शहरास पाठविलें. असा अविचारी उद्योग पाहून **रूम** शहरचे सरकारानें वकिलाचा फार मान केला नाहीं.

राज्यांत जागोजागीं विद्यालयें बांधावयास **जेम्स** राजानें **जेसविट** लोकांस परवानगी दिली, मग ते उघड **रोमनक्याथोलिक** रीतीनें देवभजन करूं लागले; आणि त्या मताचे चार धर्माध्यक्षांस राजाचे देवळांत नेमून मुलुखांत पाठविलें.

**फ्रान्सिस** ह्मणून एक **बेनिदिक्त** मंडळींतील महंत होता, त्यास राजानें **मास्तर आफ आर्टस** पद घ्यावयास **केंब्रिज** शहरांतील सर्व विद्यालयांत पाठविलें, परंतु त्याचे मतामुळें तेथील लोकांनीं राजास विनंतीपत्र पाठविलें कीं, आपला हुकूम कृपाकरून फिरवावा. ती विनंती राजानें मनास आणिली नाहीं, आणि त्यांचेकडचे बोलावयाकरितां वकील आले होते, त्यांची भेटही घेतली नाहीं. **वैसचान्सेलर** ह्मणजे शाळेंतील मुख्याचा **प्रतिनिधि** यास **हैकमिशन कोर्ट** यांत आणून पदावरून काढिलें; तथापि

त्या कामगारांनीं **फ्रान्सिस** यास मान्य केलें नाहीं. **मा-ग्डेलन** ह्मणून **आक्सफर्ड** शहरांत विद्यालय फार मातबर होतें, तेथील मुख्याची जागा रिकामी झाली. त्या स्थळावर **फार्मर** ह्मणून एक फार हलके आबरूचा पुरुष नुकताच **पोप** याचे मतांत आला होता, त्याची नेमणूक व्हावी ह्मणून राजानें हुकूम केला. तेव्हां तेथील **फेलो** यांनीं मोठ्या नम्रतेनें आज्ञा फिरवावयाविषयीं राजास विनंतीपत्र लिहिलें. असा त्यांचा आपले कायदे रक्षण करण्याविषयीं दृढ निश्चय पाहून **जेम्स्** राजानें दोन सोडून बाकीच्या सर्वांस काढून टाकिलें.

पुढें धर्माचे स्वतंत्रतेविषयीं दुसरी एक पूर्वींसारिखीच जाहिरात लाविली, आणि हुकूम झाला कीं, इ०स० सर्व धर्मपक्ष्यांनीं देवळांत ती वाचावी, परंतु १६८८ हा हुकूम मानूं नये, असा निश्चय त्या सर्वांनीं मिळून केला. **सान्क्रोफ्ट, लोयड,** व **आसाफ** एथील धर्माध्यक्ष; **केन, बाथ** आणि **वेल्स** या दोहोंचा; **टर्नर, एलीचा, लेक, चिचेस्तरचा; वेट, पीटर्बरोचा** आणि **त्रिलानी ब्रिस्तलचा;** इतक्यांनीं मिळून राजास अर्जी केली कीं, ही आज्ञा वाचणें हें आमच्या धर्मास योग्य नव्हे. यावरून राजास कोप येऊन त्यानें धर्माध्यक्षांस आपले अमात्य सभेस बोलावून आणिलें; आणि विचारिलें कीं, ही अर्जी तुह्मी केली कीं नाहीं ! कांहीं वेळपर्यंत उत्तर न देतां ते उगीच राहिले; परंतु मुख्य मंत्र्यानें त्यांस फार आग्रह केला, तेव्हां त्यांनीं ती अर्जी कबूल केली. ते जामीन द्यावयास राजी नव्हते; ह्मणून त्यांस लागलेंच किल्ल्यावर टाकावें असा हुकूम झाला; आणि त्यांवर अपमान पत्राचा आरोप

ठेवून चौकशी करावयाकरितां सरकारी वकिलांस राजानें आज्ञा केली.

जून महिन्याचे २९ तारिखेस त्यांची चौकशी व्हावयाचा बेत झाला होता. ते बंदिशाळेंत गेले, त्यापेक्षां आले तेव्हां लोक फार जमले. तो विचार ठरला, ह्मणजे राजाचें बरें, वाईट, स्वतंत्रता, किंवा सेवकभाव हें स्थिर व्हावें असें होतें. त्या प्रकरणीं उभयपक्षींच्या वकिलांत चांगला युक्तीनें वाद झाला. **हालोवे** आणि **पवेल** या दोघे न्यायाधीशांनीं कळविलें कीं, आह्मास धर्माध्यक्षांचा पक्ष खरा वाटतो. मग **जुरीनें** एके कोठडींत सारे रात्रभर विचार करून सकाळीं येऊन **कोर्ट** यांत स्वमत सांगितलें कीं, धर्माध्यक्ष आह्मास निरपराधी वाटतात, तें ऐकून **वेस्तमिन्स्तर** सभेंत मोठा जयजयकार झाला, तो सर्व शहरांत विदित होऊन लोकांत गडबड झाली. त्या वेळेस **हन्स्लो** ह्मणून ठिकाण आहे, तेथें **लार्ड फावर्शम** याचे तंबूंत राजा जेवीत होता, त्यानें ती गडबड ऐकून विचारिलें कीं, हें काय? तेव्हां त्यास कोणी सांगितलें कीं, तें कांहीं नाहीं, धर्माध्यक्षांची मुक्तता झाली ह्मणून शिपाई लोक आनंद करीत आहेत. हें ऐकून तो बोलिला, "तुह्मी तें कांहीं नाहीं असें ह्मणतां!"

राज्यांतील वर्तमान असें असतां, **जेम्स्** राजाची **मेरी** ह्मणून मुलगी होती, तिचा नवरा **प्रिन्स आरंज, विलियम**, याकडे सर्व लोकांचें लक्ष्य लागलें. त्यानें कामकारभारांत पडल्यापासून बहुत संकटें आणि विपत्ति भोगून, अनेक राजमसलती केल्या होत्या. **फ्रान्स** देशचे

राजाचा लोभीपणा आणि **हालंड** देशांतील सरकारचा मत्सर हीं दोन पाहून त्याची बुद्धि सूक्ष्म झाली होती, आणि त्यास कपट युक्ति समजली होती. या समयीं त्याचे लक्ष्यांत आलें कीं, **जेम्स** राजाचा लोक अतिशयच द्वेष करितात. त्याजवर जुलूम चालिले होते, त्यांची बारीक बातमी त्यास लागली; आणि पुढें राज्य आपणास मिळावें अशी तो आशा करूं लागला.

इ० स० १६८८

धर्माध्यक्षांचा अपमान झाल्यामुळें लोक परम संतप्त झाले आहेत, अशा समयीं **विलियम** यानें उद्योग आरंभिला. पूर्वींच त्यानें **डच्च** अरमारांत नवीं गलबतें ठेवून बंदरांत सर्व तयारी करून ठेविली होती. कांहीं अधिक शिपाईही ठेविले, आणि दुसरे कामाकरितां उत्पन्न केलेला पैका, त्या लढाईकडे लावावयाचा आरंभ केला. तो सर्व मसलती अशा चातुर्यानें करी कीं, तीन दिवसांत त्यानें च्यारशांवर जाहाजें भाड्यानें केलीं. **निमेग्युएन** शहरांतून निघून फौज व सामान नदी आणि ओढे यांतून जाऊन जाहाजांवर चढले; नंतर तो पांचशें गलबतें व चवदा हजार फौज घेऊन **हेल्वेट् स्लुइस** शहरांतून निघून गेला.

ती फौज व गलबतें **फ्रान्स** देशांत जाऊन उतरणार, अशी सर्वत्र बातमी उठविली; याकारितां तें आरमार जेव्हां **इंग्लिश** यांचे दृष्टीस पडलें तेव्हां ती आपले कांठावर उतरेल अशी त्यांचे मनांत किमपि शंकाही आली नाहीं, या रीतीनें दोन दिवसपर्यंत चालून नवेंबर महिन्याचे पांचवे तारखेस **तोर्बे** प्रांतांत **ब्राक्सहाम** खेड्यांत सैन्य उतरलें, तो दिवस पूर्वीं सांगितलेलें दारूचें बंड ज्या दिवशीं

झालें होतें तोच. या राजपुत्रास **इंग्लिश** लोकांनीं मोठ्या सन्मानानें बोलावून आणिलें होतें खरें, परंतु कांहीं दिवसपर्यंत त्याजवळ लोक बहुत येईनात; ह्मणून तो उदासीन झाला. तो प्रथम **एक्सीटर** शहरास गेला, तेथचे लोकांनीं नुकतेच **मान्मौथ** याचे बंडाकरितां शिरच्छेद झाले होते, ह्मणून त्याचा पक्ष धरिला नाहीं. या रीतीनें दहा दिवस पर्यंत राजविरुद्ध लोक येऊन आपणास मिळतील, अशी आशा करून तो तेथें होता; आणि उदास होऊन आपलें सैन्य परत न्यावयाचा विचार करूं लागला. इतक्यांत कित्येक थोर लोक येऊन त्याच्या पक्षास अनुसरले, तेव्हां देशचे सर्व लोक येऊन त्यास मिळाले. सरदार, धर्मपक्षी, कामगार, आणि राजाचे चाकर या सर्वांनीं **जेम्स** राजास सोडावयास आरंभ केला. **लार्ड चर्चीहिल्** ह्मणून होता, त्यास राजानें मोठ्या पदवीस चढवून फौजेचा सरदार केला होता, आणि त्यास सर्व संपत्ति राजापासून मिळाली होती; असें असतांही तो, पूर्वील राजाच्या राखेच्या पोटचा मुलगा **ड्यूक ग्राफतन, कर्नल बीर्क** आणि दुसरे कित्येक यांस घेऊन गेला.

राजाचे परम प्रीतींतली मुलगी **आन**, आणि तिचा नवरा **डेन्मार्क** देशचा राजपुत्र या दोघांनीं तो दुर्बल झाला पाहून, निश्चय केला कीं, त्यास सोडून शत्रूचा पक्ष धरावा. आपले इतर मित्रांनीं जें केलें त्याच रीतीनें तो राजपुत्र आणि राजकन्या यांनीं वागावयाचा आरंभ केला, असें त्यास समजलें तेव्हां तो अतिशय दुःखी होऊन बोलिला; "ईश्वर मला सहाय होवो, माझे प्रत्यक्ष मुलांनीं मला सोडिलें." शेवटीं सर्व मिळून आपला नाश करि

तील असें प्रतिदिवशीं विशेष स्पष्ट दिसूं लागलें, त्यामुळें तो **जेम्स** भयभीत होऊन मित्रांनीं सांगितलेली बाहेर निघून जावयाची मसलत ऐकण्याचा निश्चय करिता झाला. प्रथम त्यानें राणीस बाहेर घालविली, ती **क्यालेस** शहरास सुखरूप पोंचल्यावर कांहीं दिवशीं एके रात्रीस आपण नुकताच धर्मांत आलेला असा एक **सर एड्वर्ड हेल्स** ह्मणून गृहस्थ होता, त्यास बरोबर घेऊन नाहींसा झाला, परंतु पुढें त्याला धरून लोकांनीं परत आणिलें.

पुढें त्यास **राचेस्तर** शहरामध्यें कैदेंत ठेविलें. तेथें आपले लोकांनीं आपला केवळ त्याग केला पाहून **फ्रान्स** देशचा राजा आपला स्नेही आहे, त्यास तरी शरण जावें, असा त्यानें बेत केला. त्याप्रमाणें तो आपले राखेचा मुलगा **ड्युक बर्विक** यास बरोबर घेऊन निघून गेला. तो **पिकर्डी** प्रांतांत **आंब्लत्यूस** गांवांत सुखरूप पोंचला, आणि तेथून **फ्रान्स** देशचे दरबारांत जाऊन राहिला; तेथें राजा आणि महंत हे किताब त्याचे चालत असत, त्यांत शेवटचा किताब त्यास फार प्रिय असे.

या रीतीनें **जेम्स** राजानें राज्य सोडून दिल्यानंतर पुढें कोणास नेमावें हा विचार पडला. कित्येकांचें ह्मणणें पडलें कीं, राजाचा प्रतिनिधि स्थापून काम चालवावें, कित्येक बोलूं लागले कीं, **आरेंज** याचे राजकन्येस राज्याधिकार द्यावा, आणि राजाचा मुलगा त्याच्या पोटचा नव्हे असें जाणावें. मग दोनही **पार्लमेंट** सभांत याविषयीं बहुत विवाद होऊन एक पक्षापेक्षां दुसऱ्या पक्षांत दोघांची संमति अधिक पडल्यामुळें ठरलें कीं, प्रतिनिधि स्थापावा यापेक्षां राजाच नेमावा हें चांगलें. त्याप्रमाणें

इ० स० १६८९

आरॅंज याचा राजपुत्र आणि राजकन्या या दोघांनीं मि-ळून राज्य करावें; त्यांत काम कारभार राजपुत्राच्या हातानें व्हावा असा निश्चय झाला.

---

## प्रकरण ३२.

### तृतीय विलियम राजाची कथा.

संन् १६८९ पासून १७०२ पर्यंत.

या समयीं लोक असे झाले होते कीं, त्यांस राजानें आज्ञा केली असतां ती त्यांनीं न मानितां विचार करीत बसावें. ह्मणून राजा **विलियम** सिंहासनारूढ होताच तो त्यांवर अंमल कसा चालवावा या संकटांत पडला. पूर्वींचे राज्यांत बखेडा होण्यास, आणि राजा पदच्युत हो-ण्यास जें कारण झालें, तेंच याही राज्याचे प्रारंभीं घडून आलें. **विलियम, काल्विन** याच्या मताचा होता, ह्मणून धर्माविषयीं कोणास उपद्रव द्यावा, हें त्यास वाईट वाटत असे. हा सर्वांचा धर्म एक असावा, असे जे नियम होते ते मोड-ण्याचा त्यानें उद्योग केला; तो जरी सिद्धीस गेला नाहीं, तरी हुकूम झाला कीं, जो सेवेची शपथ घेईल, आणि गुह्य सभेंत न जाईल, त्यानें आपले मताप्रमाणें चालावें.

इतकें झालें तरी **जेम्स** यास अधिकार आहे, असें **अयर्लंड** बेटांत बोलणें होतेंच. त्यावर भरंवसा ठेवून तो राजा तेथें जाण्याकरितां **ब्रेस्त** बंदरांत गलबतावर बसून मे महि-न्याचे बाविसावे तारिखेस **किन्सेल** शहरास पोंचला. पुढें लवकरच त्याची स्वारी उघड **डब्लिन** शहरास गेली, आ-णि तेथें पाहातो तंव सर्व गोष्टी यथास्थित अनुकूळ

आहेत असें त्यास दिसलें. **तिकोनेल** ह्मणून त्या देशचा अध्यक्ष, यास त्याचा अभिमान होता; त्याची जुनी फौज त्याच्या पक्षास होती; आणि दुसरी नवीही ठेविली. ती सारी मिळून चाळीस हजार जमली.

हवा नीट झाल्यावर त्यानें **लंडनडरी** ह्मणून एक गांव आहे त्यास वेढा घातला. तो गांव लाहान आहे, परंतु या प्रसंगीं त्यानें टिकाव धरिला ह्मणून त्याची प्रसिद्धि झाली. मग तेथील लोकांनीं श्रम आणि दुष्काळ यांपासून बहुत क्लेश भोगिले; शेवटीं गलबत येण्याची बंदी केली होती, ती मोडून एक जिन्नस भरलेलें गलबत येऊन ते सुखी झाले. तेणेंकरून नगरचे लोकांस हर्ष झाला, परंतु राजपक्ष्यांस क्रोध आला; आणि ते निराश होऊन वेढा टाकून रात्रीं निघून गेले. त्या ठिकाणीं त्यांचे लोक नऊ हजारांवर पडले.

**बायन्** नदीचे दोहों कांठ्यांवर त्या दोन सैन्यांची परस्पर दृष्टादृष्ट झाली. त्या ठिकाणीं ती नदी फार खोल नव्हती, आणि तींतून त्या फौजा पायींही उतरून गेल्या असत्या, परंतु कांठावर जुनीं घरें मोडून पडलीं होतीं आणि खाडे होते ह्मणून शत्रूंचा बचाव झाला. नंतर **प्रातेस्तंत** मताचे फौजेचा सरदार **विलियम** युद्धाचा बेत पाहावयाकरितां उभयपक्षींचीं सैन्यें पाहावयाकरितां घोड्यावर बसून इकडे तिकडे नदीचे कांठावर फिरत होता; तें शत्रूंच्या लश्करांत कोणी पाहून हळूच एक तोफ त्यावर मारिली. त्या गोळ्यानें **विलियम** याचे कित्येक सेवक पडले; आणि त्याचे खांद्यास जखम झाली.

इ० स० १६९०

दुसरे दिवशीं मोठे सकाळीं सूर्योदयाबरोबर राजा **वि-लियम** यानें नदींतून मार्ग काढण्यास हुकूम दिला. फौज तीन ठिकाणीं पलीकडे गेली. मग निकरानें तोफांचा मार होऊन युद्ध मोठ्या आवेशानें चालू झालें. **ऐरिश** सैन्य कांहीं वेळपर्यंत पराक्रम करून आपले मदतीस **फ्रेंच** आणि **स्विस** पलटणी आल्या होत्या, त्यांस लवकरच सो-डून पळालें. **विलियम** आपले स्वार बरोबर घेऊन गेला, आणि आपला उद्योग व चपलता यांहींकरून विजय संपा-दिता झाला. **जेम्स** लढाईंत न येतां **डन्मोर** पर्वतावर जाऊन कांहीं घोडेस्वारांनिशीं एकीकडे बसला होता; आणि आपलें सैन्य शत्रूंचा पराभव करितें पाहून मध्यें मध्यें ह्मणत असे कीं, "माझे **इंग्लिश** लोकांवर दया करा." **ऐरिश** सुमारें पंधराशें मेले. आणि **प्रातेस्तंत** त्याचे एक तृतीयांशाइतके पडले. तो विजय मोठा प्रसिद्ध आ-णि निश्चित झाला, परंतु **विलियम** याचे पक्षाचा **ड्युक शांबर्ग** पाण्यांतून जात असतां गोळी लागून मेला, हा नाश शत्रूंचे नाशापेक्षां अधिक झाला.

इ०स० १६९१

**जेम्स** याचे पक्षाची अशी शेवटची लढाई **आघ्रिम** शहरांत झाली. त्या प्रसंगीं शत्रूंनीं मोठ्या निकरानें लढाई करून घोडेस्वारांस कित्येक वेळा मागें हटविलें; परंतु **इंग्लिश** लोक कमरेइतके चि-खलांतून मोठ्या संकटानें पलीकडे सुके भूमीवर जाऊन पुनः घोर युद्ध करूं लागले. नंतर **सेंटरूथ** ह्मणून **ऐरिश** लोकांचा सेनापति होता, तो गोळी लागून मेला; त्यामुळें त्याचें सैन्य चहूंकडून व्याकूळ होऊन **लिमरिक** ठिकाणीं हटलें. त्या वेळेस त्यांचे लोक पांच हजारांवर पडले होते;

अशा समयीं त्यांनीं निश्चय केला कीं, या ठिकाणीं राहून जें घडेल तें घडो. तें **ऐरिश** यांचें शेवटचें आश्रयस्थान बहुत वेळपर्यंत लढलें; परंतु पुलापासून दहा पावलांवर शत्रु आले. मग आपण चारही बाजूंनीं कोंडले गेलों, असें पाहून **ऐरिश** लोकांनीं शत्रूंचे स्वाधीन व्हावयाचा निश्चय केला. लागलाच उभयपक्षींचा युद्धोद्योग बंद होऊन सल्ला होण्याचा उपक्रम निघाला. त्या तहांत असें ठरलें कीं, द्वितीय **चार्लस** राजाचे अमलांत जसे **रोमनक्याथोलिक** लोक स्वतंत्रतेनें धर्माचरण करीत होते, तसें पुढें चालावें. सर्व लोकांस मोकळीक झाली कीं, कोणाची मर्जी असल्यास मुलें माणसें घेऊन **इंग्लंड** आणि **स्काट्लंड** या दोहों शिवाय पाहिजे त्या देशीं जाऊन राहावें. अशी मोकळीक मिळाल्यावर **जेम्स** याचे पक्षाचे ज्यांनीं पूर्वीं युद्ध केलें होतें, ते **फ्रान्स** देशास जाऊं लागले, त्यांस सरकारानें भाड्याचीं गलबतें करून त्या देशीं पोंचविलें.

इ० स० १६९२

त्या समयीं **जेम्स** राजा केवळ निराश झाला. **इंग्लंड** देश घेण्याचा त्याचा बेत सर्व फसला, आणि राजा **विलियम** यास चोरून मारावा, इतकी युक्ति मात्र त्याचे मित्रास आशा करावयास बाकी राहिली. सांगतात कीं, अशे उद्योगांस **जेम्स** राजा मदत करीत असे, परंतु शेवटीं या यत्नापासून त्यांचे करणारांचा नाश मात्र झाला. त्यानंतर पुढें सात वर्षांनीं **जेम्स** मृत्यु पावला; तंवपर्यंत **सेंटजर्मेन** ठिकाणीं **लुइस** याचे औदार्यावर आणि त्याची मुलगी व दुसरे **इंग्लंड** देशांतील स्नेही यांचे धर्मावर उपजीविका करून होता. तो फार दिवस दुखण्यानें पीडित होऊन संन् १७०० तील सप्तंबर महिन्याचे

सोळावे दिवशीं मेला. त्याचे कबरीजवळ बहुत चमत्कार झाले, असें त्या वेळचे लोक ह्मणत असत. वास्तवीकच्च त्याचे आयुष्याचे शेवटीं तो फार धर्मानें वागत असे. त्यानें शरीरास दुःख बहुत दिलें, आणि तो **लात्राप** या नांवाचे ठिकाणचे गरीब महंताचे दर्शनास नेहमी जाई; ह्मणून ते त्याचा नम्र आणि धार्मिक आकारानें संतोष पावत असत. त्याचा अभिमान आणि स्वच्छंद प्रकृति ही त्याचे संपत्ती बरोबर निघून जाऊन शेवटीं तो दयाळू, भला, आणि आपले सर्व लोकांजवळ सुशील झाला होता. त्यानें शेवटचे दुखण्यांत आपले मुलाला उपदेश केला कीं, सर्व ऐहिक सुखापेक्षां धर्म अधिक असा तूं निश्चय धर. त्या राजपुत्रानें तसें केलें. असा तो मोठ्या भक्तिलक्षणेंकरून मेला; त्याच्या सांगण्याप्रमाणें **पारिस** शहरांत **इंग्लिश बिनिदिक्त** महंत लोकांचे देवळांत कांहीं विशेष शोभा न करितां त्यास पुरलें.

राजाच्या स्वीकार करते वेळेस **विलियम** यानें निश्चय केला होता कीं, आपल्याजवळ जितकी सत्ता बाकी राहिली आहे तितकी संरक्षण करावी; परंतु पुढें **पार्लमेंट** सभेंत दिवसानुदिवस त्याचे सत्तेविषयीं नवे नवे नियम होऊं लागले, ह्मणून त्यानें कंटाळून त्याविषयींचा तंटा सोडिला. **फ्रान्स** देशचे सरकाराशीं लढाई चालवावयास जो पैका लागेल तो आपणास द्यावा, असा करार करून घेऊन, त्यास आपले मर्जीप्रमाणें चालावयास मोकळीक दिली. युद्ध आणि **युरोप** देशांतील सरकारचें सामर्थ्य सारिखें असावें इतकेंच त्याचे मनांत असे. या कामाकरितां **पार्लमेंट** सभेनें त्यास पैका दिला ह्मणजे, त्यांनीं कसा जरी राज्य कारभार चालविला तरी तो मनास आणीत नसे.

मग **फ्रान्स** देशाशीं युद्ध करण्याकरितां लोकांपासून प्रातवर्षीं उत्पन्न होणारे कर पुरेनात, ह्मणून ते गहाण घेऊन त्यांनीं सरकारास पैका दिला; ज्यास आतां सरकारी कर्ज ह्मणतात. हें सर्व करून **इंग्लंड** देशास नुसते कीर्तीवांचून दुसरें कांहीं मिळालें नाहीं, आणि त्याचे पक्षाचे **डच्च** लोक यांस नेहेमी शत्रुत्व करावयास अवकाश मात्र झाला.

या राजाच्या राज्यांत बहुतकरून **फ्रान्स** देशाशीं युद्ध चाललें होतें. शेवटीं **रिस्विक** शहरांत तह होऊन तो तंटा मिटला. त्यांत पडते वेळेस राजानें कांहीं विचार केला नाहीं. असें वाटतें कीं, तह करते वेळेस **इंग्लंड** देशचें हित कोणीं पाहिलें नाहीं; आणि इतका खर्च झाला, व इतके लोक मेले, यापासून इतकें मात्र झालें कीं, **फ्रान्स** देशाचे राजानें **विलियम** याचा राजपणा मान्य केला.

इ० स० १६९७

स्वाभाविक राजाची प्रकृति फार अशक्त असे, तशांत नेहेमी चिन्ता, युद्ध, यांहींकरून फारच क्षीण झाली होती. तो आरोग्य व्हावयाकरितां घोड्यावर बसे, आणि दुसरे कित्येक प्रकारचे श्रम करी. फेब्रुआरी महिन्याचे एकविसावे तारिखेस **केंसिंग्तन** शहरांतून **हांप्डेन** ह्मणून वाडा आहे, तेथें घोड्यावर बसून जात असतां घोडा पडल्यामुळें तो खालीं पडला. ते वेळीं गळ्याचें हाड मोडलें. सेवकांनीं त्यास **हांप्डेन कोर्ट** वाड्यांत नेलें; तेथें तें हाड ठिकाणीं बसवून संध्याकाळीं आपले रथांत बसून **केंसिंग्तन** गांवास तो गेला. वाटेनें रथांतील चालीमुळें तें हाड एकीकडे सरलें, आणि राजाचा वैद्य **बिल्ड** होता त्यानें तें पुनः ठिकाणचे ठिकाणीं बसविलें. एकादे निरोगी

शरीरास यापासून कांहीं झालें नसतें; परंतु त्याच्या प्रकृतीस त्यापासून मृत्यूचीं चिन्हें होऊं लागलीं. प्रथम कांहीं दिवसपर्यंत तो बरा होईल अशी चांगली आशा वाटत होती; पुढें त्यास कंप सुटला, आणि त्यापासून ताप उत्पन्न झाला. आपला अंतकाळ जवळ आला, असें समजलें तरीं त्याच्या हृदयांत पूर्वींच्या चिंता होत्याच, आणि **युरोप** देशाचें पुढें कसें होईल, या चिंतेखालीं त्याची आपले शरीराविषयींची चिंता गेली होती. पुढें **हालंड** देशांतून **अर्ल आल्बिमार्ल** त्याजवळ आला तेव्हां तो परदेशचे स्थितीविषयीं एकांतीं मसलत करून दोन दिवसांनीं मृत्यु पावला. त्या वेळेस त्याचे वयास बावन्नावें वर्ष होतें. त्यानें तेरा वर्षें राज्य केलें.

---

# प्रकरण ३३.

## आन राणीची कथा.

संन् १७०२ पासून १७१४ पर्यंत.

**डेन्मार्क** देशाचा राजपुत्र **जार्ज** याशीं जिचें लग्न झालें होतें, अशी राजकन्या **आन** नामें होती, ती अडतिसावे वर्षीं राज्य करूं लागली; तेणेंकरून सर्व पक्षांचे लोकांस संतोष झाला. ती राणी, **हैड** ह्मणून **चान्सेलर** जो पुढें **अर्ल क्लारेंडन** या पदास चढला होता, त्याचे मुलीस **जेम्स** राजापासून झालेली दुसरी मुलगी तिनें राज्यासनारूढ होतांच **फ्रान्स** देशाशीं लढाई करण्याची आपली प्रतिज्ञा **कामन्स** यांस कळविली, त्यांनीं तीविषयीं मान्यता दिली. त्याच दिवशीं **डच** आणि **जर्मन** लोकांनीं

तशाच प्रतिज्ञा करून **इंग्लिश** दरबारचे वेतास पुष्टिक-रण केलें. असे सर्व आपले नाशाविषयीं एकत्र झाले असें पाहून **फ्रेंच** राजास राग आला; आणि तो आपला राग मुख्यत्वें **डच** लोकांवर काढून अभिमानानें बोलिला कीं, या हलके व्यापारी **डच** लोकांनीं माझा पराक्रम अनुभविला असतां, हे मजशीं युद्ध करावयाची प्रतिज्ञा करितात, तर ते कधीं तरी या दांडगाईचा पश्चात्ताप पावतील. असें भय घातल्याचें त्या राजांनीं कांहीं मनांत आणिलें नाहीं. **इंग्लिश** सैन्याचा सरदार **ड्युक मार्ल्बरो** यास नेमिलें; आणि जरी **अर्ल आथ्लोन** याचा त्या अधिकाराचे विभागाविषयीं दावा होता, तरी **डच** लोकांनींही **मार्लबरो** यासच फौजेचा मुख्य **जनरल** नेमिलें. ही गोष्ट वास्तवीक कीं, राजसभेंत वादविवाद करण्यांत, किंवा युद्धांत त्यापेक्षां अधिक असे त्या समयीं थोडे होते. तो संकट समयीं धैर्यवान असे, आणि त्यास राज्यकामांत बहुत आस्था होती ह्मणून **क्रेसी** आणि **आजिन्कोर्ट** यांचे वेळेपासून जितके **इंग्लिश** सरदार झाले, त्या सर्वांत हा **फ्रान्स** देशास परम भयंकर झाला.

या राजाचे बखरेंत बहुतकरून महाद्वीपांतील युद्धांदिकांच्या गोष्टी फार आहेत. त्या युद्धापासून प्रजांचा स्वार्थ तर विशेष झाला नाहीं खरा; परंतु कीर्ति फार वाढली ही गोष्ट खरी कीं, त्या युद्धांतील आतां कांहीं राहिलें नाहीं; ज्यां शहरांत त्या मोठे सैन्यानें जय मिळविला, त्यांचीं नामें **ब्लेन्हिम्**, **रामिलीस**, **औद्नार्द**, आणि **माल्प्ला-केट**, हीं मात्र राहिलीं आहेत; परंतु **स्पेन** देशांत थोडा पैका खर्चून आणि थोडे लोक मरून मोठ्या उपयोगाचा

असा जय संपादिला. तो असा. **ब्रेस्त** शहरांत **फ्रेंच** लोक बहुत लढाऊ गलबतें सिद्ध करीत आहेत, असें वर्तमान ऐकून **इंग्लिश** अमात्यांनीं **सर क्लौड्स्ली शवेल** आणि **सर जार्ज रूक** या नावांचे दोघे गृहस्थांस **फ्रेंच** यांचा बेत लक्ष्यांत आणावयाकरितां पाठवून दिलें. **बार्सिलोना** ह्मणून **स्पेन** देशांत एक स्थळ आहे, तेथें **हेसी** याचे राजपुत्रानें जाऊन निरर्थक हल्ला केला होता; त्या ठिकाणीं भाड्याचे गलबतांतून कांहीं फौज पाठवून द्यावी. अशी दुसरीही एक आज्ञा **सर जार्ज** यास होती. त्या उद्योगापासून कार्य सिद्ध होण्याचा निश्चय नाहीं पाहून दोन दिवसांनीं लोक परत आले. नंतर **सर जार्ज रूक** व **सर क्लौड्स्ली** या दोघांनीं **आफ्रिका** खंडाचे कांठीं असतां गलबतावर लश्करी सरदारांचीं सभा मिळवून ठरविलें कीं, **जिब्राल्टर** शहरावर हल्ला करावा. तें शहर त्या वेळेस **स्पानियार्ड** याचे हातीं होतें. असा अकस्मात् हल्ला येईल, हें न कळून तेथें शिपाई लोकांची चांगली तरतूद नव्हती. तें **जिब्राल्टर** शहर तीन बाजूंकडून मोठ्या खडपांनीं वेष्टित अशा जमिनीच्या उंच प्रदेशावर आहे. त्या शहराजवळ **हेसी** याचा राजपुत्र सुमारें अठराशें लोक घेऊन आला; आणि त्यानें तें शहर आपले स्वाधीन करावें, असा निरोप पाठविला; परंतु तो ऐकिला नाहीं, असें पाहून त्यानें शहरास तोफा लावण्याविषयीं दुसरे दिवशीं हुकूम केला. मग **सौथ मोल्हेड** या नांवाचे ठिकाणीं शत्रूचीं ठाणीं होतीं, तीं सोडून ते पळूं लागल्यावर, **आड्मराल** यानें **क्यापटन विटेकर** ह्मणून सरदार होता, त्यास सांगितलें कीं, सर्व होड्या तयार करून त्या ठिकाणीं हल्ला करावा.

जे सरदार त्या **मोल्हेड** ठिकाणाजवळ होते, ते आज्ञेवांचून होड्यांवर माणसें चढवून तरवारी घेऊन आंत शिरले. परंतु त्यांनीं मसलत पुरी केली नाहीं, कारण कीं, **स्पानियार्ड** यांनीं एक सुरुंग उडविला, तेणेंकरून दोन **लेफटेनंट** आणि सुमारें शंभर लोक इतके मेले व जखमी झाले. तथापि **हिक्स** आणि **जंपर** या नांवांचे दोघे **क्यापटन** यांनीं जवळची सपाट भूमि होती, ती हस्तगत करून ते **क्याप्टन विटेकर** आणि दुसरे नावाडी यांचे मदतीस आले. आणि त्यांनीं अकस्मात हल्ला करून **मोल** आणि शहर या दोहोंमधील जागा घेतली. पुढें त्या स्थानाचा अमलदार किल्ला स्वाधीन करावयास कबूल झाला; आणि **हेसी** याचा राजपुत्र तेथील किल्ल्यामध्यें इतका बंदोबस्त असतां आपला यत्न सिद्धीस गेला ह्मणून आश्चर्ययुक्त झाला. त्या विजयाचें वर्तमान **इंग्लंड** देशांत पोंचलें तेव्हां, तें शहर हस्तगत झालें ह्मणून सरदारांची प्रशंसा करावी किंवा नाहीं याविषयीं बहुत बोलणें होऊन शेवटीं ठरलें कीं, करूं नये. निरूपयोगी कामाकरितां **ड्युक मार्ल्बरो** याची बहुत प्रशंसा झाली; आणि **सर जार्ज रूक** यानें आपले देशावर इतका मोठा उपकार केला तरी त्याची अनास्था झाली, आणि त्याला सरदारपणापासूनही दूर केलें. तेव्हांपासून **जिब्राल्टर**, **इंग्लिश** यांचे स्वाधीन आहे, आणि तें, **मेदितरेनियन** समुद्रांतले व्यापाराकरितां किंवा युद्धाकरितां गलवतांस फार उपयोगी पडतें.

या रीतीनें जमीन आणि समुद्र या दोहोंतून **इंग्लिश** लोक विजय मिळवीत असतां, **स्पेन** देशांत दुसरें एक विरोधास कारण उत्पन्न झालें, ज्यापासून **युरोप** देशचे

राजांस महाद्वीपांतले अन्य ठिकाणीं जसा लोभ होता, तसाच त्या देशावर झाला. चवदावे **लुइस** राजाचा नातू चवथा **फिलिप** त्या वेळेस बहुतकरून सर्व प्रजांचे अनुमतानें त्या देशचें राज्य करीत होता. **स्पेन** देशचे पूर्वील राजाचे मृत्युपत्रांतही त्यानेंच राज्य करावें असें होतें, परंतु **युरोप** देशचे राजांत पूर्वीं एक तह झाला होता, त्यांत असें ठरलें होतें कीं, **जर्मनी** देशाचा एंपरर याचा मुलगा **चार्ल्स** यानें तें राज्य करावें. या तहावर **फ्रान्स** देशाचीही प्रथम जामीनगत होती; परंतु त्यांनीं पुढें **बुर्बो** वंशाचा कोणी पुरुष राजपदावर बसावयाकरितां तो करार मोडावयाचा योजिला होता. **स्पेन** देशांतील **क्याटलोनियन** लोकांनीं **चार्ल्स** यास बोलावणें पाठविलें; आणि **इंग्लिश** व **पोर्टुगीस** लोक आपलें पक्षाचें युद्ध करितील, अशा भरंवशावर **चार्ल्स** यास त्या राज्याविषयीं यत्न करावयाची अधिकच उमेद आली. त्याजवळ **स्पेन** देशचें राज्य घ्यावयाकरितां भाड्याचीं तारवें दोनशें, लढाऊ गलबतें तीस, आणि नऊ हजार लोक इतके जमले; परंतु त्यांचा सरदारपणा **अर्ल पीटर्बरो** यानें कबूल केला; तो **अर्ल** मोठा शूर होता. आणि तो एकला मोठे सैन्याइतका पराक्रम करील असें लोकांस वाटलें होतें.

**अर्ल पीटर्बरो** त्या काळचे मनुष्यांत परम विचित्र आणि असाधारण पुरुष होता. पंधरा वर्षांचा असतांच त्यानें **आफ्रिका** देशचे मुसलमान लोकांशीं बहुत लढाया केल्या; वीस वर्षांचे सुमारें **जेम्स** राजास काढून टाकण्याविषयीं मदतगारी केली; आणि आतां त्यानें **स्पेन** देशांत स्वतः आपले खर्चांत लढाई चालविली. त्याचें कारण,

तो **ड्युक, चार्ल्स** याचा परम स्नेही होता. त्याचें शरीर कुरूप होतें; परंतु मन बहुत उदार, सभ्य, आणि उद्योगी असे. त्याजवळ नऊ हजारांपेक्षां किंचित् अधिक इतकी फौज असतां, त्यानें **स्पेन** देशास जाऊन **बार्सिलोना** ह्मणून बळकट शहर आहे, त्यांत पांच हजार लोक होते, तें घेतलें.

या रीतीची फत्ते फार दिवस चालिली नाहीं; कारण **अर्ल** यास कामावरून परत बोलावून **चार्ल्स** याचे फौजेचा सरदारपणा **लार्ड गाल्वे** ह्मणून ग्रहस्थ होता, त्याचे हातीं राहिला. **आल्मांझा** गांवांजवळ शत्रूंचा सरदार **ड्युक बर्विक** यानें फौज घेऊन तळ दिला, असें ऐकून **लार्ड गाल्वे** युद्धाकरितां तेथें गेला. लढाईचा प्रारंभ सुमारें अडीच प्रहर दिवसास झाला, दोनही सैन्यांची चांगली लढाई चालू झाली. फौजेचे मध्यभागीं फार करून **ग्रेटब्रिटन** आणि **हालंड** देशच्या पलटणी होत्या, त्या जय मिळवितात, असा प्रथम सुमार दिसला; परंतु त्यांस आश्रय **पोर्टुगीस** घोडेस्वरांचा होता; ते स्वार युद्धाचे प्रारंभीं पळून गेल्यामुळें **इंग्लिश** लोकांवर चहूंकडून घेरा पडला. त्या विपत्तिकाळीं ते चौरस उभे राहून एके उंचस्थळीं गेले; आणि देशची माहीतगारी नाहीं, जवळ साहित्य नाहीं असें झालें, ह्मणून सगळे सुमारें दाहा हजार लोक कैद केले गेले. हा शत्रूंचा विजय पूर्ण झाला; आणि पुढें **क्याटालोनिया** प्रांतावांचून सर्व **स्पेन** देश आपला स्वामी **फिलिप** याचे आज्ञेंत वर्तूं लागला.

हा काळपर्यंत राणीचे प्रधान **विग** लोकांचे मंडळींतले होते, त्या आमात्यांमधील **ड्युक मार्ल्बरो** प्रथम **टोरी** लो-

कांत होता; परंतु शेवटीं **विग** लोकांचे पक्षांत आला. कारण कीं, **फ्रान्स** देशचा अंमल कमी करावयाचें **टोरी** यांनीं योजिलें, असें त्यानें पाहिलें. याकरितां **विग** लोक पूर्वींचे राजाचे बेत सिद्धीस न्यावयाविषयीं आग्रह धरून **युरोप** देशांत सर्वत्र राजाची सत्ता कमी करण्याविषयीं उद्योग करीत होते. असें आहे कीं, ज्या राज्यांत लोकांचे मसलतीप्रमाणें कामगार चालतात, तेथें लोक जसे जसे बदलतात, तसतसे प्रधानही बदलले पाहिजेत. त्या काळीं प्रजांचें मत बदलूं लागलें होतें, परंतु त्या **विग** प्रधानाचा नाश जवळ आला होता; तो व्हावयाचे पूर्वीं **पार्लमेंट** सभेंत एक मोठें कृत्य सिद्धीस गेलें. तें हें कीं, **इंग्लंड** आणि **स्काट्लंड** या दोन राज्यांचा मिलाफ झाला. प्रथम **जेम्स** याचे राज्यापासून या दोन देशांचें प्रभुत्व एकाच राजाकडे असे खरें; परंतु वेगवेगळे **पार्लमेंट** सभांचा अंमल असे, आणि समयीं त्या सभा परस्पर विरुद्ध बेत आणि युक्ति योजीत असत.

त्या राज्यसंयोगाविषयींचा विचार या राज्याच्या प्रारंभींच निघाला होता, परंतु पूर्वदेशचे व्यापाराविषयीं कांहीं तंटा पडल्यामुळें तो मोडला, आणि ठरलें कीं, तो संयोग होणें परम असाध्य. पुढें तो संयोगसंबंधी विचार दोनही **पार्लमेंट** सभांनीं काढिला, आणि ठरविलें कीं, दोनही देशचे मुखत्यार नेमून त्यांनीं संयोगाचीं मुख्य मुख्य मूळ कलमें योजावीं, आणि मग दोघांचा **पार्लमेंट** सभांनीं त्यांचा विस्तारेंकरून चांगला विचार करावा. ते मुखत्यार नेमावयाचें काम राणीकडे दिलें. तेव्हां तिनें अशी सावधगिरी राखिली कीं, तो संयोग व्हावा, असें ज्यांचे

मनापासून वास्तवीक होतें, त्यांचा मात्र त्यांत समावेश केला. त्यांस बसून विचार करावयासाठीं राणीनें **वैट्-हाल** वाड्याजवळ **काक्पिट** या नांवाचा वाडा योजिला होता, तेथें ते.मिळाले. राणीनें त्यांना त्वरा करावी ह्मणून बहुत वेळ सांगितलें होतें, त्याप्रमाणें त्यांनीं तीं कलमें लागलींच ठरवून सही केलीं, आणि तीं दोनही देशचे **पार्लमेंट** सभांपुढें ठेवावयाचें मात्र बाकी राहिलें.

या प्रसिद्ध तहनाम्यांत असें ठरलें कीं, संयुक्त राज्यांतील प्रभुत्व **हानोवर** वंशांतील कोणी तरी पुरुषाजवळ असावें; संयुक्त राज्याचें नियुक्त **पार्लमेंट** एकच असावें. **ग्रेटब्रिटन** देशांतील प्रजांची सत्ता आणि संपत्ति यांचा उपभोग एकेच रीतीनें व्हावा; व्यापार व वसूल यांविषयीं नेमणुकी व सत्ता सर्वांची सारखीच असावी; प्रजांचा अधिकार, राज्यकारभार, आणि नीति, हीं, दोनही राज्यांत एकच असावीं, **स्काट्लंड** देशांतील प्रजांचे उघड हितावांचून आंतले व्यवहाराविषयींचे नियम फिरवूं नये; राज्य संयोगाचे पूर्वीं जसा अख्त्यार आणि सत्ता होती, तशीच पुढेंही **सेशनकोर्ट** यांस आणि दुसरे अदालतींस असून तीं त्या काळीं होतीं तशींच पुढेंही राहावीं; **स्काट्लंड** देशचे **लार्ड** सभेंत सोळा सभासद आणि **कामन्स** सभेंत ४५ असावे; आणि तेव्हांची **स्काट्लंड** देशची **पार्लमेंट** सभा ज्या रीतीनें ठरवील, त्या रीतीनें सभासदांची नेमणूक व्हावी. **स्काट्लंड** एथील **लार्ड** यांस **ग्रेटब्रिटन** एथील **लार्ड** याप्रमाणें समजावें, आणि त्यांची योग्यता संयोगाचे पूर्वींचे त्या त्या पदावर **इंग्लंड** देशांत जे **लार्ड** असतील त्यांपेक्षां कमी, आणि पुढें नवे होतील त्यापेक्षां अधिक

असावी; ते **लार्ड** यांस **पार्लमेंट** सभेंत बसून संमति देणें, किंवा **लार्ड** यांचे चौकशीस बसणें, या खेरीज **इंग्लिश लार्ड** यांसारिखा अख्त्यार असावा; राजचिन्ह आणि कामकारभाराची रीति हीं पूर्ववत राहावीं; दोनही राज्यांतील जे राज्य नियम, किंवा कायदे या कलमांशीं विरुद्ध असतील ते त्या त्या देशचे **पार्लमेंट** सभेनें रद्द करावे. त्या संयोगाविषयींचे तहनाम्यांत मोठीं इतकीं कलमें होतीं; तीं दोनही राज्यांतील **पार्लमेंट** सभांनीं कबूल करावीं, इतकें मात्र शेष राहिलें.

त्या दोन सभांत या रीतीनें बोलत असत. **स्काट्लंड** देशचे **पार्लमेंट** सभेंत ह्मणत असत कीं, दोन राज्यांचा पूर्ण संयोग झाला असतां स्थिर स्वस्थतेचा पाया होईल; त्यांचा धर्म, स्वातंत्र्य, आणि मालमत्ता हीं निर्भय राहातील; त्यांचें सामर्थ्य, आणि व्यापार वृद्धि पावतील; सर्व बेट प्रीतीनें एकत्र होईल, आणि भिन्न भिन्न मसलतींचे भयापासून सुटेल. शत्रूंचा पराजय करण्यास शक्ति येईल; नूतन धर्माचें संरक्षण होईल, आणि **युरोप** देशचें स्वातंत्र्य राहील. अशी गोष्ट बोलून दाखविली कीं, सरकारी कारभार चालवावयाकरितां जर एकच सभा असली, तर सरकारचें सामर्थ्य अधिक होईल. त्यांस दर्शविलें कीं, राज्यकारभारांत जितका तुमचा योग्य भाग आहे, तितके कर तुह्मास हा संयोग झाल्यावर द्यावे लागणार नाहींत. **इंग्लिश** लोक कर देतात त्याचे सत्तरावा हिसाही तुह्मास द्यावा लागणार नाहीं; आणि असें असतां राज्यकारभारांत एक दशांशापेक्षांही तुमची सत्ता कमी नाहीं. त्या राज्यसंयोगास अनुकूळ अशीं या रीतींचीं भाषणें **स्काट्लंड** दे-

शचे **पार्लमेंट** सभेंत होत असत; आणि **इंग्लिश पार्लमेंट** सभेंत असा विचार केला होता कीं,या रीतीनें तो सामर्थ्यवान् आणि भयंकर देश कधीं **इंग्लंड** देशास उपद्रव करणार नाहीं; आणि जर पुढें दोहों राज्यांत कांहीं वैर उपस्थित झालें, तर **इंग्लंड** देशाचा सर्वप्रकारें तोटा मात्र होईल; त्या साहसिक आणि गरीब **स्काट्** लोकांपासून दुसरें कांहीं प्राप्त होणार नाहीं.

इकडे, आपली जुनी आणि स्वतंत्र राज्यनीति नाश पावेल, ह्मणून **स्काट्** लोकांसही राग आला. **लार्ड** यांस वाटलें कीं, आह्मास **पार्लमेंट** सभेंत बसावयास अधिकार नाहीं, ही आपले प्रतिष्ठेची व अधिकाराची हानि. सावकार लोकांनीं व्यापारावर मोठे मोठे कर बसविले असें पाहिलें, आणि विचार केला कीं, **वेस्तइंडीस** देशांतील **इंग्लिश** संस्थानांत आह्मास व्यापार करावयाची सत्ता दिली, तीपासून आह्मास लाभ होणार,हें कशावरून समजावें. **इंग्लिश** सभांत असा विचार झाला कीं, मातबर आणि गरीब अशा दोन प्रजा एकत्र झाल्या असतां गरीबांचा स्वार्थ होतो, आणि धनवान् लोकांस त्यांचे विपत्तीचा मात्र कायतो विभाग. लोक ह्मणूं लागले कीं,**स्काट्** लोक कर देतात तो फार थोडा, तो राज्यकारभारांत त्यांचा विभाग आहे त्यांस योग्य नाहीं. त्या करारांत **टोरी** लोकांनीं बहुत विघ्नें आणिलीं; परंतु शेवटीं तीं सर्व जाऊन दोनही **पार्लमेंट** सभांत अधिक संमतानें तो ठरला. या रीतीनें त्या संयोगापासून कोणतें हित होईल, हें ज्यांचे बुद्धीस प्रथम आलें नव्हतें, त्या सर्वांस शेवटीं त्याविषयीं संमति देणें प्राप्त झालें.

त्या समयीं उत्तरोत्तर **विग** प्रधानाचा अधिकार कमी होत चालिला. **डचेस मार्लबरो** ईनें राणीजवळ कित्येक स्त्रिया ठेवून दिल्या होत्या; त्यांत एक तिचे नात्याची **मिस्त्रेस मार्शम** ह्मणून असे, जीस तिनें हलके पदवीपासून आणि गरीबीपासून उंच पदवीस चढविली होती, राणीवर आपला किंचित् अंमल बसला, असें पाहून ती **डचेस** गर्वानें उन्मत्त झाली; आणि ती ज्या गुणेंकरून श्रेष्ठ पद पावली होती, तें सोडून देऊं लागली. **मिस्त्रेस मार्शम** इला पुढें अर्थ संपादन करावयाचा होता. ह्मणून ती विशेष नम्रतेनें व लक्ष्य देऊन राणीशीं व्यवहार करीत असे, राणीची खुशामत करी, आणि तिचे गैर समजुतीसही मान देई. **टोरी** लोकांचें मत राणीस मान्य होतें, असें पाहून तिनेंही तसेंच मत दाखविलें. **हार्ली** साहेब ह्मणून त्या वेळेस सरकारचा **सेक्रेतारी** होता, त्याचें ती कार्य साधावयाचें द्वार होतें. तोही पूर्वीं कांहीं दिवसपर्यंत राणीची कृपा पावला होता; त्यानें निश्चय केला कीं, **विग** अमात्यांचा विश्वास बुडवावा. त्याच्या मनांत होतें कीं, **टोरी** पक्ष आपले हाताखालीं घ्यावा, आणि **विग** पक्ष कारभारांतून काढावा. असें ठरवून त्यानें **हेनरी सिंजिन** ह्मणून एके पुरुषास सोबती केला, ज्यास पुढें कांहीं दिवसांनीं **लार्ड बालिंग्ब्रोक** असा किताब मिळाला. तो पुरुष मोठा वक्ता, लोभी, साहसी, चपल, उद्योगी, आणि आग्रही होता. त्यामध्यें कांहीं चातुर्य असे, पण विश्वासुपणा नव्हता. या मंडळींत तिसरा **सर सैमन हार्कोर्ट** ह्मणून मोठा बुद्धिमान असा एक वकीलही होता.

पूर्वीं लोकांस **विग** पक्षपाती प्रधानाचा अभिमान होता,

तो अगदीं गेला, असें आतां कळूं आलें. त्या काळापर्यंत लोकांस विजयेंकरून जीं दुःखें कळलीं नव्हतीं, याचें कारण प्रधान. असा त्यांवर आरोप ठेवूं लागले. जो पुढें **लार्ड आक्सफर्ड** झाला, तो **हार्ली** सर्व बखेड्याचें मूळ, असें लोकांचें मनांत आलें. ते बखेडे उत्तरोत्तर वाढून अधिक प्रबळ होत चालिले, तेणेंकरून **टोरी** प्रधानाच्या मसलती **विग** लोकांचे लक्षांत आल्या; परंतु राणीचा त्यांवरचा विश्वास केवळ गेला होता; ह्मणून कांहीं उपयोग झाला नाहीं. पुढें लवकरच **हार्ली** यानें स्नेहभाव सोडून, आपली युक्ति सिद्ध व्हावयाविषयीं आवेशानें त्वरित उद्योग आरंभिला. राज्यकारभारांत त्यावर राणीचा सर्व भरंवसा होता. राणीस **टोरी** अमात्यांचे कार्यसिद्धीचा अभिमान आहे, असें प्रथम उघड बाहेर कळून येण्यास एक लाहानसें कारण झालें. तें असें—

**हेनरी साशेवरल** ह्मणून **आक्सफर्ड** शहरचा हलके आणि उतावीळ बुद्धीचा एक धर्मपक्षी होता. त्यानें **हैचर्चमेन** यांमध्यें कांहीं कीर्त्ति मिळविली होती; आणि तो सर्वत्र **डिसेंटर** यांशीं बहुतच द्वेष करीत असे. त्या द्वेषानें पुढें तो **डर्बी** शहरांत एके उष्णकाळांत **जड्ज** यांचे **सेशन** समयीं बहुत गोष्टी बोलला. नवंबर महिन्याचे पांचवे तारिखेस त्यानें **सेंटपाल** याचे देवळांत मोठ्या आवेशानें सांगितलें कीं, राजाचा हुकूम कांहीं जरी असला तरी मानावा. तो बोलला कीं, **डिसेंटर** यांस आपले मताप्रमाणें चालूं देणें हें वाईट; आणि ह्मणाला कीं, सांप्रतकाळीं स्थापित मतावर शत्रूंनीं सबळ हल्ला केला आहे. त्यापासून त्या मताचें संरक्षण करण्याविषयीं तत्पक्षी किमपि

प्रयत्न करीत नाहींत. हें हलकें भाषण **सर साम्युएल जेरार्ड, लार्ड मेयर** होता, त्यानें मान्य करून प्रसिद्ध करण्याविषयीं साहित्य केलें; आणि **टोरी** लोकांनीं याची फार स्तुति केली.

**यार्क** एथील **आर्चबिशप** याचा मुलगा **डोल्बीन** साहेब होता, त्यानें या वेडे गोष्टीकरितां **कामन्स** सभेंत फिर्याद केली; आणि जी गोष्ट सहज लक्ष्यांतून गेली असती, ती या रितीनें बळकट केली; तींतील अतिशय आग्रहाचे भाग होते ते वाचले; आणि ते फार निंदक आणि खोटे असें ठरविलें. **साशेवरल** यास बोलावून आणिलें, तेव्हां त्यानें तें आपण लिहिलें याविषयीं नाकबूल न होतां त्या कर्माचें भूषण मानिलें; आणि तें प्रसिद्ध करावयास **लार्ड मेयर** यानें जें साहित्य केलें होतें तें सांगितलें, तोही तेव्हां तेथेंच होता. नंतर त्यास एकीकडे घालवून देऊन ठरविलें कीं, **लार्ड** यांचे सभेंत त्यास नेऊन त्यावर मोठे गुन्हे व लबाड्या यांचा आरोप ठेवावा; आणि **इंग्लंड** देशांतील **कामन्स** यांचे तर्फेचें बोलणें **डोल्बीन** साहेबानें बोलावें. त्या अपराधाचे कलमांची याद करावयाकरितां आपणांतून कांहीं गृहस्थांची मंडळी योजिली; **साशेवरल** यास धरून कैद केलें; आणि **वेस्तमिन्स्तर हौस** यांत **लार्ड** यांचे समक्ष त्याची चौकशी करावयाकरितां दिवस नेमिला.

सारे राज्याचे डोळे या चौकशीवर लागले होते. ती चौकशी एकवीस दिवसपर्यंत चालली होती, आणि तंवपावेतों सर्व सरकारी काम बंद पडलें होतें. प्रतिदिवशीं उगीच पाहाण्याकरितां राणी स्वतः तेथें जात असे; आणि तो वाड्यांतून जाई त्या वेळेस बहुत लोक त्याचे बरोबर अ-

सत. त्यांतून कित्येक त्याचा उघड जयजयकार करीत, आणि कित्येक त्याची इच्छा पूर्ण व्हावी, असें मनांत चिंतन करीत. **कामन्स** यांचे तर्फेचे कामगार **सर जोझेफ जेकील**, अयर साहेब, **सालिसिटर** जनरल, **सर पीटर किंग**, **रिकार्डर**, जनरल **स्तान्होप**, **सर टामस पार्कर** आणि **वाल्पोल** इतके साहेब होते. त्या धर्मपक्ष्याचे तर्फेनें बोलणारे **सर सैमन** हा **कोर्ट** आणि **फिप्स** साहेब हे दोघे; आणि त्यांस **डाक्तर आटर्बरी**, **डाक्तर स्माल्रिज**, आणि **डाक्तर फ्रेंड** यांचीही मदत होती. ती चौकशी चालत असे, त्या वेळेस लोक बहुत दांडगाई आणि गडबड करीत. ते राणीचे पालखीभोंवते जाऊन ह्मणाले, "ईश्वर, राणी आणि धर्मपक्ष यांचें कल्याण करो; आह्मी इच्छितों कीं, राणीनें **डाक्तर साशेवरल** याचा पक्ष धरावा," त्यांनीं **डिसेंटर** यांचीं कितीएक देवळें मोडलीं, आणि कितीएक घरें लुटलीं, आणि मोठे पेढीवर जाऊन हल्ला करावा असा बेत केला. याकरितां **कामन्स** याचे सांगण्यावरून राणीनें तो तंटा बंद करावयाकरितां जाहिरात लाविली. मग कित्येक सांपडले त्यांस सरकार गुन्हेगार ठरवून चौकशी केली. दोघांवर अपराध काईम करून त्यांस मारण्याचें शासन ठरविलें, परंतु तें दोघांतून एकासही घडलें नाहीं.

**कामन्स** यांनीं अपराधपत्र वाचल्यावर **साशेवरल** याचे पक्षाचे लोकांनीं मोठ्या युक्तीनें त्यास अनुकूळ उत्तर देण्याचा प्रारंभ केला. नंतर त्यानें स्वतः भाषण केलें; त्यामध्यें व त्याचे धर्मविषयक वादांमध्यें फार अंतर दृष्टीस येतें, यावरून अनुमान होतें कीं, तें भाषण त्यास दुसरे कोणी

लिहून दिलें असेल. तो बोलिला कीं, राणीविषयीं किंवा राज्याविषयीं माझे मनांत कांहीं वांकडें नव्हतें; राज्यामध्यें मोठी गडबड होऊन पुनः नूतन धर्माच्या पक्षाचा राजा राज्य करूं लागला, हें फार चांगलें झालें, असें त्यानें ह्मटलें. मी ज्या धर्मांत वागलों त्यांत आहे कीं, राजाचा हुकूम कसा असला तरी तो मानावा, असें तो बोलिला; आणि श्रोत्यांस ऐकून दया यावी, या रीतीनें त्या भाषणाची त्यानें समाप्ति केली. शेवटीं सत्रा संमति अधिक पडून त्यावर गुन्हेगारी ठरली; परंतु या ठरावावर चवतीस **लार्ड** यांनीं दप्तरामध्यें लिहून ठेविलें कीं, आह्मी यास मान्य नाहीं. त्यानें तीन वर्षेंपर्यंत देवळांत उपदेश करूं नये, आणि त्याचे दोन ग्रंथ **लार्ड मेयर** व दोघे **शेरीफ** यांचे देखत फांशीं देणारानें जाळावे, असा हुकूम केला. हें शासन फार लाहान केलें, याचें कारण कीं, लोक अकस्मात् आवेशानें अविचार करितील असें भय होतें. पुढें राणीनें जुन्या सभेस निरोप देऊन नव्या सभेस बोलावणें केलें, आणि तिला स्वतः **टोरी** लोकांचा अभिमान होता; ह्मणून तिनें लोकांस आपले प्रतिनिधि विचारपूर्वक नेमावयास अवकाश दिला. ह्मणून जे **विग** लोकांचा द्वेष करीत होते, त्यांवांचून दुसरे कोणी नेमिले नाहींत.

त्या काळीं **फ्लांडर्स्** देशांत चांगले प्रकारें युद्ध चालिलें होतें. **ड्युक मार्ल्बरो** तेथील सरदार, यास युद्धाचें मोठें अगत्य होतें; कारण कीं, त्या लढाईपासून त्यास प्रतिष्ठा, व द्रव्यलाभ हीं दोन मिळावयाचीं होतीं. लोभाखालीं त्याचे सारे गुण झांकले गेले होते. **फ्रान्स** देशचे राजास तहाचें अगत्य होतें, ह्मणून तो ठराव होण्याचा प्रयत्न करीत असे.

**हेग** शहरांत **ड्युक होल्स्तैन**, याचा वकील **पेट्कम** ह्मणून होता, त्यास राजानें हें काम सांगितलें, आणि एकांतीं **ड्युक** याशीं आपण बोलिला. शेवटीं **गेर्त्रुडिन्बर्ग** गावांत ठराव होण्याचा आरंभ झाला. त्यामध्यें मुख्य **मार्लबरो**, **युजीन**, आणि **झिंझेदर्फ**, या तिघांस तहाची इच्छा नव्हती, ह्मणून **फ्रेंच** अमात्य लोकांचे मतलब सिद्धीस जाईनात. त्यांचे वर्तमानाची चौकशी करण्याकरितां गुप्त पुरुष ठेविले, त्यांचे धन्याचा अपमान केला, पत्रें कोंडिलीं, ह्मणून दुसरी लढाई करण्याचा **लुइस** राजानें निश्चय केला.

कांहीं दिवसांपासून प्रधानमंडळी राणीस अमान्य झाली होती; परंतु एकाएकीं त्यांस निरोप द्यावयाचा धीर होईना. **हार्ली** ह्मणून होता, त्यावर तिचा विश्वास होता; तो तिला सांगे कीं, आपण योजिलें आहे, असें केलें तर लोक बरें ह्मणतील, ती गोष्टही खरीच आहे, आणि केली असतां चिंता नाहीं. मग त्याचे मसलतीवरून तिनें अदलाबदल करावयास आरंभ केला. **लार्ड चेंबर्लिन** याचा अधिकार **ड्युक केंट** याजवळ होता, तो काढून **ड्युक श्रूस्बरी** यास दिला; कारण कीं, तो **टोरी** यांचा पक्ष धरून **हार्ली** याशीं व्यवहार ठेवीत होता. पुढें लवकरच सरकारचा **सेक्रेतारी अर्ल संडर्लंड**, **ड्युक मार्ल्बरो** याचा जांवई, याचें काम काढून **अर्ल डार्ट्मौथ** यास दिलें. **अर्ल गोडोल्फिन** यासही कामावरून दूर केलें, आणि जामदारखान्याचे कामावर दुसरे कितीएक गृहस्थ नेमिले. त्यांत मुख्य **हार्ली** साहेब केला. त्यास मुख्य प्रधानाचेंही काम सांगितलें, आणि जामदाराचा मदतनीस केला. **लार्ड सोमर्स** याचे जागेवर **अर्ल राचेस्तर** यास

नेमिलें. **लार्ड स्त्युअर्ड** याचें काम **ड्युक डेवनशैर** याजवळून घेऊन **ड्युक बकिंगम** यास दिलें; आणि **हेनरी सिंजिन** साहेबास जागा देण्याकरितां **बोय्ल** साहेबास **सेक्रेतारी** याचे कामावरून निरोप दिला. **लार्ड चान्सेलर** यानें राज्याचा शिक्का स्वेच्छेनें सोडून दिला; तो प्रथम कितीएक गृहस्थांचे स्वाधीन ठेवून मग **सर सैमन हार्कर्ट** याजवळ दिला. **अर्ल वार्टन** यानें **अयर्लंड** एथील **लार्ड लेफ्टेनंट** याचें काम सोडिलें, तें **ड्युक आर्मंड** यास दिलें. **राबर्ट वाल्पोल** साहेबाचे, लढाई खात्याचे दप्तरांतील **सेक्रेतारी** याचे जागेवर, **जार्ज ग्रान्विल** साहेबास ठेविलें. सारांश, **ड्युक मार्ल्बरो** यावांचून कोणी एकही **विग** कामावर राहिला नाहीं.

या रीतीचीं राणीचीं कृत्यें **पार्लमेंट** सभेस मान्य होईत तंवपर्यंत तिचा विजय पूर्ण झाला नाहीं. मग राणीनें आपले भाषणांत जाणवलें कीं, युद्ध पुढें चालवावें हें बरें. **पार्लमेंट** सभेनें मोठ्या उत्साहानें आणि सर्व संमतानें त्या गोष्टीस रुकार दिला. त्यांनीं मसलत सांगितली कीं, आलीकडे तुझ्या राजसत्तेस व प्रतिष्ठेस विघ्नकारक जे व्यवहार झाले आहेत, ते बंद करावे. पुढें **ड्युक मार्ल्बरो** याची कांहीं महिन्याचे पूर्वीं बहुत स्तुति व प्रतिष्ठा करीत होते, तो आतां द्वेष आणि निंदा यांस पात्र झाला. तो लोभी फार ह्मणून त्यानें लढाई पुढें चालविली, असें बोलूं लागले. त्याचें कृत्रिम आणि द्वेष यांच्या जेथें तेथें प्रचीति येऊं लागल्या, हीं वर्तमानें खरीं असतील; परंतु पक्षपाती बोलण्यावर भरंवसा नाहीं; कारण कीं, त्याचें शौर्य व योग्यता यांविषयींही संशय निघूं लागले. **ड्युक**

याचा यापेक्षां अधिक मान भंग करावयाकरितां **कामन्स** सभेनें विचार ठरविला कीं, **अर्ल पीटर्बरो** यानें **स्पेन** देशांत सरकार काम चांगलें केलें, ह्मणून त्याचा सन्मान करावा. **ड्युक मार्लबरो** यानें **फ्लांडर्स** देशांत पराक्रम केला, परंतु त्यास हा सन्मान प्राप्त झाला नाहीं; आणि **लार्ड कीपर** यानें **अर्ले** यास तो सन्मान समजाविते वेळेस **मार्लबरो** याचे लोभी स्वभावाचा अपमान मात्र जाणविला.

या राज्याच्या प्रारंभ **विग** रीतीनें झाला होता, परंतु तिचें आतां कांहींच राहिलें नाहीं. एक युद्ध मात्र राहिलें; त्यास पुढें विशेष खर्च लागूं लागला, ह्मणून अमात्यांनीं निश्चय केला कीं, कसें तरी करून तें बंद करावें; परंतु या बेतास **ड्युक मार्लबरो** कांहीं विघ्न करील, ह्मणून प्रथम त्यास काढावें, असें त्यांनीं योजिलें. असें करण्यासही संकट होतें, तें हें कीं, **डच** लोकांचा **ड्युक** यावर सर्व भरंवसा होता, ह्मणून तसें त्याचें वांकडें केलें असतां त्या लोकांस राग येईल अशी शंका होती. याकरितां ते संधि पाहात राहिले. पुढें तो युद्धांतून परत आल्यानंतर त्यावर आरोप ठेविला कीं, कोणी एक **इस्माइल** यानें फौजेस रोटी लागेल ती पुरवावयाचा मक्ता केला होता. त्याजवळून प्रतिवर्षीं यानें सहा हजार **पौंड** लांच घेतला, यावरून राणीनें त्याला सर्व कामकाजावरून दूर केलें; कां कीं, त्यास पाडावें हें पूर्वींच योजिलेलें होतें. त्याचें काम निघण्याचें कारण लांच घेणें नव्हें, ही गोष्ट खरीच, परंतु हें कारण वाजवी असें मानिलें पाहिजे.

तेव्हां **प्रेअर** ह्मणून पुरुष होता, ज्याची प्रसिद्धि राज्य मसलती अशी नव्हती, कवि अशी होती; त्यास कांहीं

बोलण्याकरितां **फ्रान्स** देशास पाठविलें. त्याचे बरोबर कोणी साधारण पुरुष **मिनाजर** ह्मणून होता, तो **फ्रान्स** देशांतून तह करावयास **लंडन** शहरास आला; परंतु उभयपक्षींचे मंत्री जे त्या कामाविषयीं होते, त्या सर्वांचे संमतास येई असा तहनामा करणें मोठें कठीण पडलें. **अर्ल स्त्राफर्ड** पूर्वीं **हेग्** शहरांत वकील असे, त्यास नुकतेंच बोलावून आणिलें होतें; त्यास **हालंड** देशांत परत पाठविलें, आणि हुकूम दिला कीं, त्या देशचा **पेन्शनारी हेन्‌दयस** यास तहाचा मूळ विचार जाहीर करावा, तो राणीच्या मनास आला आहे, असें कळवावें, आणि वकिलांनीं कोठें मिळावें हें ठरवावें. तो विचार **डच** लोकांस पसंत पडला नाहीं, ह्मणून तो रद्द करावयास त्यांनीं राणीजवळ वकील पाठविले, परंतु राणी कबूल झाली नाहीं. ह्मणून शेवटीं वकिलांनीं एकत्र मिळावयाचें ठिकाण **युत्रेक्ट** शहर ठरविलें; आणि **फ्रेंच** अमात्यांस तेथें येण्याच्या परमाणगीचिठ्याही दिल्या.

पुढें **युत्रेक्ट** शहरांत तह नाम्याचा ठराव होऊं लागला. तेथें **लार्ड प्रिविसील**, व **ब्रिस्तल** एथील **बिशप राबिन्सन**, आणि **अर्ल स्त्राफर्ड**, हे **इंग्लिश** यांकडचे **बुईस** आणि **वांदर्सेन**, हे **डच** लोकांकडचे; आणि **फ्रेंच** पक्षाचे **मार्शाल डुक्सेलस**, **क्यार्डिनल पोलिन्यक**, आणि **मिनाजर** साहेब, हे तिघे **जर्मनी** देशचा एंपरर यानें आणि **सावोई** देशचे वकील यांनीं तो तहनामा करण्यास मदत केली; त्या वेळेस दुसरे सामील राज्यांतूनही मुखत्यार वकील पाठविले, परंतु तह करणें त्यांच्या मनापासून नव्हतें. **इंग्लंड** आणि **फ्रान्स** या दोन रा-

ज्यांस मात्र तहाचें वास्तविक अगत्य होतें, ह्मणून दुसऱ्या संस्थानाचे वकील नवे नवे तंटे मात्र उत्पन्न करीत; याकरितां **इंग्लिश** अमात्य **फ्रान्स** राज्याशीं गुप्त बंदोबस्त करूं लागले. मग एकमेकाचे युक्तीनें असा तह योजिला कीं, जेणेंकरून **ब्रिटन** बेटांतील लोकांचें कांहीं विशेष हित होईल.

आगस्ट महिन्याचे प्रारंभीं **सेक्रेतारी सिंजिन**, ज्यास **लार्ड वैकौंट बालिंग्ब्रोक** अशी पदवी मिळाली होती, त्यास पूर्वीं तहनाम्यास जीं झालीं होतीं तीं दूर करण्याकरितां, **वेर्सैल** शहरचे दरबारास पाठविलें. त्याचे बरोबर **प्रैअर** साहेब आणि **आबीगाल्टियर** हे दोघे होते. तो गेला तेव्हां मोठे सत्कारानें भेट झाली. **फ्रेंच** राजा व **मार्कुइस डीटोर्सी** हे दोघे त्यावर बहुत प्रीति करीत असत; त्यांचे बरोबर त्यानें **सावोय** प्रांतांचा **ड्युक** आणि **बवेरिया** प्रांतांचा **इलेक्टर** यांचा बंदोबस्त केला. शेवटीं उभय पक्षींचे मुखत्यार वकिलांनीं व्यापाराचा आणि स्नेहाचा तह ठरविला, आणि राणीनेंही तो आपण मान्यकरून **पार्लमेंट** सभेस तें वर्तमान कळविलें.

इ० स० १७१२

या प्रसिद्ध तह नाम्यांतलें मुख्य कलम हें होतें कीं, **फ्रान्स** आणि **स्पेन** हीं दोन प्रबळ राज्यें एकाचे हाताखालीं आलीं, ह्मणजे **युरोप** देशचे स्वातंत्र्यास भय, ह्मणून **स्पेन** देशचा राजा **फिलिप** यानें **फ्रान्स** देशचे राज्याविषयींचा सर्व दावा सोडून द्यावा. असें ठरलें कीं, **बेरी** एथील **ड्युक फिलिप** याचा भाऊ, ज्यास त्यानंतर राज्य करण्याचा अधिकार होता, तो **फ्रान्स** देशचें स्वामित्व पावला असतां, त्यानें **स्पेन** देशचे धनीपणाविषयीं सत्ता करूं नये.

तिसरा करार असा कीं, **सावोय** प्रांताचा **ड्युक** यानें राज-पद धारण करून, **सिसिली** बेट, **फेनेस्त्रेल**, व दुसरे कित्येक स्थळींचा अंमल चालवावा. हा सारा मुलूख वहुत-करून **फ्रेंच** राज्याची कसर्तीकरून काढलेला होता. **डच** लोक फार दिवसांपासून जी राज्याची सीमा इच्छीत होते, ती त्यांस मिळाली; जसें **सावोय** प्रांताचा **ड्युक** याचें हित करण्याविषयीं **फ्रेंच** राज्यांतून कांहीं घेतलें; तसेंच **डच** लोकांची भरती करण्याकरितां **आस्त्रिया** मुलखांतून **फ्लांडर्स** प्रांतांतलीं जीं फार बळकट शहरें होतीं तीं दिलीं. **इंग्लंड देशची** प्रतिष्ठा व हित या दोहोंचेंही चांगलें संरक्षण केलें. **डंकिर्क** ह्मणून एक शहरांत किल्ला आहे, त्यापासून **इंग्लिश** यांस युद्धसमयीं अडचण पडत असे, ह्मणून तो काढावा आणि वंदर मोडावें असा हुकूम केला. **जिब्राल्टर** शहर आणि **मिनोर्का** वेट, या दोहोंविषयीं **स्पेन** देशाचे दरबारानें सर्व दावा सोडिला. **हड्सनबे**, **नोवास्कोशिया**, आणि **न्युफौंडलांड**, या स्थळांबाबद, **फ्रेंच** सरकारानेंही दावा सोडिला; परंतु त्यांजवळ **केपब्रिटन** राहिलें, आणि त्याचे कांठावर मासे वाळविण्याची मोकळीक त्यांस मिळाली. **फ्रेंच** लोकांमध्यें जे **प्रातेस्तंट** होते त्यांस वंधांत ठेविलें होतें, त्यांस **इंग्लिश** यांनीं सोडविलें, या गोष्टीवरून **इंग्लिश** यांची बहुत कीर्ति झाली. **जर्मनी** देशचा **एंपरर** यानें **नेपल्स**, **मिलन**, आणि **नेथर्लंड** प्रांतांतील **स्पानिश** लोकांचा हिंसा इतका मुलूख द्यावा; व **प्रुशिया** देशचे राजानें **अपर** (वरील) **गेल्डर** प्रांताचें राज्य करावें, असा करार केला. **एंपरर** यानें कांहीं वेळपर्यंत तो करार आग्रहानें मान्य केला नव्हता, ह्मणून या कलमांस त्याची

संपति होण्यास वेळ नेमिला. या रीतीनें सर्व **युरोप** देश एक सर्वसत्ताक राज्यासारिखा झाला, ज्यांतील वेगवेगळे प्रदेशांत भिन्नभिन्न अंमलदार राज्य करीत आहेत, आणि एक संस्थानानें लोभादि केलीं असतां, त्या सर्वांजवळ त्याचा जाबसाल करणें प्राप्त व्हावें. असें सर्व जगास जें योग्य तें **इंग्लिश** अमात्यांनीं केलें; परंतु त्यांस जें योग्य तें लोकांनीं केलें नाहीं.

**विग** लोक **टोरी** प्रधानांस वाहेरून उपद्रव करीत असतां, त्यामध्यें आंतले आंत कलह उत्पन्न झाल्यामुळें त्यांचा बहुत नाश झाला. प्रारंभीं **लार्ड आक्सफर्ड** आणि **लार्ड बालिंग्ब्रोक** या दोघांची बुद्धि आणि बेत, हीं एक होतीं; परंतु पुढें ते आपले दुसरे वैऱ्यांचे नाशकरून आपले हिताकरितां वेगवेगळे विचार आणि उद्योग करूं लागले. **आक्सफर्ड** जें जें करी तें तें समजुतीनें आणि विचारानें करी. इकडे **बालिंग्ब्रोक** सर्व गोष्टी धीरानें करीत असे. **हानोवर** वंशांतले कोणास तरी राज्याधिकार असावा, असा **आक्सफर्ड** यास अभिमान होता, आणि **बालिंग्ब्रोक** याचे मनांत होतें कीं, **प्रिटेंडर** याचा आंत प्रवेश व्हावा. त्या दोघांचे मनापासून एकमेकाचा अतिशय द्वेष होता, परंतु त्यांचे स्नेही व आश्रित यांचे उद्योगेंकरून कांहीं दिवसपर्यंत तो उघड दिसून आला नाहीं.

असें वर्तमान पाहून टोरी लोकांस आणि राणीस फार दुःख झालें; कारण कीं, तिचे प्रीतींतले अमात्य दुर्बळ होत चालिले. आणि तिची शरीर प्रकृति ही केवळ क्षीण झाली. मनांतील चिंतेनें फार अशक्त होऊन शेवटीं तिची शुद्धि गेल्यासारिखें झालें. वैद्यांनीं बहुत औषधें दिलीं; परंतु

तिचें दुखणें अधिकच वाढत चालिलें, तें असें कीं, तिचे आयुष्याची निराशा होऊन तिचे प्रधान एकत्र जमा झाले.

सर्व राज्यांतून सभासदांस बोलावून आणिलें, आणि ते राज्यरीतीस विघ्न होऊं नये; ह्मणून युक्ति योजूं लागले. त्यांनीं **हानोवर** देशचा **इलेक्टर** यास पत्र पाठविलें कीं, राणीची अवस्था कठीण दिसती, तर आपण निघून **हालंड** देशास यावें, तेथून आपणास **इंग्लंड** देशांत आणावयाक-रितां आरमाराची तयारी असेल. त्याच वेळेस त्यांनीं **हेग** शहरांत **अर्ल स्त्राफर्ड** यास हुकूम पाठविला कीं, **प्राते-स्तंट** मताचा राजा पुढें व्हावा, असा बंदोबस्त झाला आहे, त्याचें संरक्षण करावयास **डच** सरकाराकडून तयारी असा वी. प्रधानांनीं समुद्रकांठच्चीं बंदरें संभाळण्याविषयीं योजना केली, आणि आरमाराचें काम **अर्ल बर्क्‌ली** ह्मणून **विग** होता त्यास सांगितलें. या सर्व कामाचे परिणाम दोन झाले. एक **विग** लोकांवर नवे राजाची प्रीति फार झाली, आणि दुसरें असें कीं, विरुद्ध पक्षापासून राज्याची खराबी होईल असेंही भय वाटलें.

संन् १७१४ त जुलै महिन्याचें तिसावे तारिखेस रा-णीला औषधांनीं कांहीं गुण पडून ती सकाळीं चार घटि-का दिवसास पलंगावरून उठून कांहीं इकडे तिकडे चा-लली. कांहीं वेळानंतर खोलींत एक घड्याळ होतें, त्याकडे कांहीं वेळपर्यंत पाहात राहिली. जवळ बायका होत्या, त्यांतून एकीनें विचारिलें कीं, आपण आज नेहमीचे पेक्षां फार वेळ काय पाहातां? तिच्यानें यावर कांहीं उत्तर करवलें नाहीं; आणि तिनें मरण समयीचे दृष्टीनें तिजकडे पाहिलें. तिची शुद्धि अकस्मात् गेली, व ती सारे रात्र-

भर तसीच बेशुद्ध होती; आणि दुसरे दिवशीं सकाळीं मृत्यु पावली. तेव्हां तिचें वय एकुणपन्नास वर्षांचें होतें. जे लोक त्या समयीं फार ज्ञानी, धनवान्, आणि शूर होत चालिले होते, त्यांवर या राणीनें बारा वर्षेंपर्यंत राज्य केलें.

---

# प्रकरण ३४.

## प्रथम जार्ज राजाची कथा.

संन् १७१४ पासून १७२७ पर्यंत.

पुढें कोण राजा व्हावा याविषयीं जो राज्य कायदा ठरला होता, त्याप्रमाणें, **ब्रन्स्विक** प्रांताचा प्रथम इलेक्टर **अर्नेस्त अगसटस**, आणि प्रथम **जेम्स** राजाची नात **सोफेआ** नामें होती, या दोघांचा पुत्र, प्रथम **जार्ज** राजा सिंहासनारूढ झाला, त्या वेळेस त्याचें वय चौपन्न वर्षांचें, बुद्धि सूक्ष्म, अनुभव बहुत, स्नेही पुष्कळ, आणि **युरोप** देशांत सर्वत्र स्वास्थ्य, या गोष्टी त्याचा स्वार्थ सिद्ध होण्यास उपयोगी पडल्या. त्याचे गुण दिसण्यांत असाधारण नव्हते, परंतु उपयोगी होते; आणि त्याचा स्वभाव त्याचे पूर्वींचे अधिकारी **स्तुअर्ट** वंशाचे राजे, यांचे स्वभावाहून वेगळा होता, पूर्व राजे आपले आश्रितांस विपत्तिसमयीं सोडितात, अशी प्रसिद्धि झाली होती; परंतु **जार्ज** राजा **इंग्लंड** देशांत आल्यानंतर लोकांजवळ स्पष्ट सांगूं लागला कीं, "माझा नियम हा कीं, मित्रांस अंतर देऊं नये; सर्व जनांचें न्यायेंकरून प्रतिपालन करावें; आणि कोणाचें भय बाळगूं नये," या रीतीचा निश्चय, स्थिर प्रतिज्ञता, आणि चित्त देऊन

काम कारभार करणें, हे त्यामध्यें गुण होते. त्यांमध्यें इतका दोष होता कीं, त्याचें लक्ष्य **इंग्लिश** लोकांपेक्षां आपले पहिले प्रजांकडे फार होतें.

राणीचा श्वास नाहींसा होतांच **प्रिविकौन्सिल** याची सभा झाली, तेथें **इलेक्टर** याच्या तीन सनदा त्यांस जाहीर झाल्या; त्यांवरून त्याचे पक्षाचे लोकांतून सातांस **लार्ड जास्तिज** हा किताब देऊन राज्यांतील मोठा कारभार सांगितला. नंतर लवकरच हुकूम झाला कीं, **जार्ज** राजा झाला ह्मणून **इंग्लंड**, **स्काटलंड**, आणि **अयर्लंड** या तीन देशांत जाहीर करावें. **जार्ज** यांस ती बातमी सांगून **इंग्लंड** देशांत घेऊन येण्याकरितां **अर्ल डार्सेट** यास नेमिलें; आपले मकाणांवर विश्वासू सरदार पाठविले; **पोर्ट्स्मौथ** शहरांतील फौज वाढविली; आणि **आडिसन** साहेबास **सेक्रेतारी** नेमिलें. पूर्वींचे प्रधानाचा अधिक अपमान करावयाकरितां **लार्ड बालिंग्ब्रोक** यास आपले कागदांचें पुडकें घेऊन बाहेर चाकर लोकांमध्यें उभें राहावें लागे. नवा राजा होण्यांत कांहीं बखेडा झाला नाहीं. यावरून स्पष्ट आहे कीं, तो राजा नसावा ह्मणून कोणी कांहीं मसलत केली नव्हती.

जेव्हां तो जाहाजांतून **ग्रीनिच** शहरांत उतरला, तेव्हां राजाचे रखवालींकडे, **ड्युक नर्थबर्लंड**, आणि **लार्ड जास्तिस**, यांनीं मोठे आदरानें त्याची भेट घेतली. ज्यांनीं त्याचा पक्ष फार धरिला होता, त्यांस त्यानें बोलावून आणिलें; परंतु **ड्युक आर्मंड**, **लार्ड चान्सेलर**, आणि **लार्ड ट्रेझरर** हे त्यांमध्यें नव्हते. पक्षपाती राजा अर्धे मुलुखाचा मात्र

राजा असतो, असें न समजून त्यानें सर्व **टोरी** कामगारांस दूर केलें; आणि त्यांचे जागेवर **विग** लोकांस नेमिलें.

अशा पक्षपातेंकरून लोकांत असंतोष उत्पन्न झाला; आणि ते ह्मणूं लागले कीं, धर्माविषयीं भय झालें आहे. **ब-र्मिंगम, ब्रिस्तल, नारिच्च** आणि **रीडिंग** या शहरांनीं पूर्वीं **साशेवरेल** याचा पक्ष धरिला होता, त्याचें **स्मरण** त्यांस झालें; आणि ह्मणूं लागले कीं, **विग** लोक दूर असावे; आणि **साशेवरेल** याचा विजय असावा.

पुढें नवें **पार्लमेंट** सभेस बोलावणें केलें, तिचे प्रथमचे बैठकीस **विग** लोकांचें प्राबल्य झाल्यामुळें पूर्वींचे प्रधानांवर बहुत जुलूम होऊं लागले. **लार्ड** यांनीं अर्जी केली कीं, महा द्वीपांत राज्याची फार अपकीर्त्ति झाली आहे, ती जावी. **कामन्स** यांनीं निश्चय ठरविला कीं, देशाची इतकी खराबी कोणत्या कृत्यांहीं झाली, याचा शोध लावावा, आणि **प्रिटेंडर** याचे पक्षपात्यांचें शासन करावें.

या आणि पुढील राज्यामध्यें एक युक्ति अशी निघाली होती कीं, जे सरकारास विरुद्ध बोलतील त्यांस **पोपिस्त** आणि **जाकोबैट** असें ह्मणावें. सरकारचीं कृत्यें जुलुमगारीचीं, असें ह्मणणारे जे होते, त्यांस **प्रिटेंडर** यास राज्यपदावर स्थापण्याची इच्छा आहे असें ठरविलें; त्या भयानें ती गोष्ट कोणी कांहीं बोलेनात, असें झालें.

नंतर एकवीस पुरुषांची मंडळी नेमून त्यांस काम सांगितलें कीं, नुकताच जो तह झाला, त्यासंबंधी सर्व कागद पत्र पाहून त्यांतून पूर्वील प्रधानांवर दोष लागू होईल, असे जे असतील, ते निवडून काढावे. या कामाचे चौकशींत कांहीं वेळ गेल्यानंतर, त्या मंडळींतील मुख्य **वा-**

**ल्पोल** साहेब यानें सर्व **कामन्स** सभेस विदित केलें कीं, चौकशी करून एक **रिपोर्ट** तयार केला आहे; आणि तेव्हांच **माथ्यु प्रैअर** साहेब, आणि **टामस हार्ली** साहेब हे दोघे त्या घरांत होते, त्यांस सभेचा हुकूम घेऊन धरिलें. मग त्यानें **लार्ड बालिंग्ब्रोक** यावर सरकार गुन्हेगारीचा आरोप ठेविला. हें पाहून कित्येक सभासदांस आश्चर्य वाटलें; परंतु पुढें **लार्ड कानिंग्स्बी** यानें उठून सांगितलें, तें ऐकून त्यांस विशेष विस्मय झाला. तो बोलिला, "**वाल्पोल** साहेबानें हातावर दोष ठेविला; परंतु मी शिरावर ठेवणार; त्यानें शिष्यास अपराधी ह्मटलें, मी पंतोजीस ह्मणणार, **आक्सफर्ड** आणि **मार्तिमर** एथील **अर्ल राबर्ट** यावर मी सरकार गुन्हेगारी व दुसरे कांहीं अपराध ठेवणार."

**लार्ड आक्सफर्ड** प्रथम ज्या वेळेस **लार्ड** सभेंत आला, तेव्हां त्याजवळ कोणी जाईना. **कामन्स** सभेंत जेव्हां त्याचे दोषांचीं कलमें वाचिलीं, तेव्हां **तुर्ने** शहर **डच** लोकांपासून कसें घ्यावें, ही मसलत त्यानें **फ्रेंच** राजास सांगितली, या कलमावर मोठा वाद झाला. **वाल्पोल** साहेबाचें ह्मणणें पडलें कीं, ती सरकार गुन्हेगारी झाली. परंतु **सर जोझेफ जेकिल** ह्मणून एक **विग** होता त्यानें ह्मटलें कीं, या कलमावरून त्याचे आंगीं सरकार गुन्हेगारी ठरत्ये, असें माझे बुद्धीस येत नाहीं. तो ह्मणाला कीं, माझें लक्ष्य लहान मोठे मनुष्यांचा न्याय होण्याकडे आहे; आणि राज्यांतील कायदेही मी थोडेसे जाणतों. त्यावरून हा दोष सरकारी गुन्हेगारी इतका नाहीं, असें ह्मणावयास मला शंका वाटत नाहीं. यावर मोठे क्रोधेंकरून **वाल्पोल**

साहेबानें उत्तर केलें कीं, सत्यत्वांत आपले पेक्षां किंचित्‌हीं कमी नव्हत, आणि कायद्यांचे माहीतगारींत आपले पेक्षां अधिक; असे या मंडळींत आणि मंडळीचे बाहेर कित्येक गृहस्थ आहेत; या सर्वांची खातर झाली आहे कीं, या दोषापासून सरकार गुन्हेगारी लागू होते. शेवटीं या गोष्टीचा ठराव **अर्ल** यास विरुद्ध असा झाला; नंतर **लार्ड कानिंगस्बी** आणि **विग** सभासद यांनीं मिळून **लार्ड** याचे सभेंत त्यावर दोषारोप ठेविला; आणि विनंती केली कीं, त्या सभेंतील त्याची जागा काढावी, आणि त्यास कैदेंत ठेवावें. तेथें या गोष्टींच्या विचाराचे वेळेस बहुत आवेशानें वाद झाला. त्या पदच्युत अमात्याकडे ज्यांची कांहीं प्रीति राहिली होती, त्यांनीं आग्रह धरिला कीं, असें करणें हें फार अयोग्य, आणि यापासून कांहीं अनर्थ होईल. शेवटीं तो **अर्ल** स्वतः उठला, आणि मोठे शांततेकरून ह्मणाला कीं, माझे कडून तर माझी धनीन जी राणी तिचे आज्ञेवरून मी सर्वदा वर्तत गेलों, मी कायदा मोडला नाहीं, आणि माझ्या ह्मातान्याचे जीवाची चिंता नाहीं.

दुसरे दिवशीं त्यास पुढें आणिलें, तेथें त्यास आरोप पत्राची नकल देऊन जबाब तयार करण्यास एक महिन्याची मुदत दिली. **डाक्तर मीड** साहेबानें प्रत्यक्ष सांगितलें कीं, **अर्ल** यास जर किल्ल्यावर पाठविलें, तर त्याचे प्राण वांचणें संकट पडेल. असें असतांही सभेंत निश्चय झाला कीं, त्यास किल्ल्यावर कैदेंत खचित ठेवावें. त्या-वेळेस **ड्युक आर्मंड** आणि **लार्ड बालिंग्ब्रोक** यांनीं महाद्वीपांत जाऊन नेमलेले काळांत सभेचे स्वाधीन होणें चुकविलें, ह्मणून हुकूम झाला कीं, **अर्ल** यानें त्यांचीं नावें

आणि कुटुंबाचीं चिन्हें **लार्ड** यांचे यादींतून काढावीं, आणि त्यांचा वित्तविषय सरकारानें जप्त करावा.

**लार्ड आक्सफर्ड** दोन वर्षेंपर्यंत कैदेंत होता; तितक्यामध्यें राज्यांत एक बंड चालिलें होतें, तें सिद्धीस गेलें नाहीं; ह्मणून लोकांत धांदल चालली होती. लढाईंत कित्येक **लार्ड** सांपडले, त्यांचा शिरच्छेद झाल्यानंतर प्रजांस युद्धाचा कंटाळा आला, हें समजून **आक्सफर्ड** यानें अर्जी केली कीं, माझी चौकशी करावी. त्याचे ध्यानांत होतें कीं, जे विषय वास्तवीकच अपराधी आणि शासनयोग्य, ते लोकांचे दृष्टीपुढें बहुत आले आहेत; ह्मणून आपला वृत्तांत त्यापुढें जाऊन इतर अपराध्यांशीं बरोबरी करून पाहिला ह्मणजे केवळ निरपराधीपणाच दिसेल. मग त्याचे मर्जीनेंच एक दिवस नेमिला, आणि दोषारोपाची सिद्धता करण्याविषयीं हुकूम झाला. नेमलेल्या वेळेस **लार्ड** यांची सभा **वेस्त्मिन्स्तर** वाड्यांत झाली, तेथें **लार्ड कौपर, लार्ड हैस्त्‌अर्ड** याचे ठिकाणीं बसला. तेथें **आक्सफर्ड** याची चौकशी कोणते रीतीनें करावी याविषयीं **लार्ड** आणि **कामन्स** यांमध्यें तंटा पडल्यामुळें त्यास कैदेंतून मुक्त करावें असें **लार्ड** यांनीं ठरविलें. हा बखेडा उत्पन्न झाला ह्मणून त्याची पदवी आणि संपत्ति हीं पूर्ववत् राहिलीं. त्याचे आयुष्यास तर कांहीं भय नव्हतें; कारण त्यावरचे आरोपास कांहीं प्रमाण नव्हतें.

त्या वेळेस अशी आग्रही मसलतीपासून लोकांचे मनांत संताप उत्पन्न झाला; कारण कीं, राजाची कृपा होण्याचें द्वार एकपक्षी लोकांवांचून दुसऱ्या सर्वांस झांकलें असें झालें. **स्काट्‌लंड** देशामध्यें बंडाचा प्रारंभ झाला; **अर्ल**

**मार** यानें आपले तीनशें आश्रित **स्काट्लंड** देशचे डोंगर जमीनींत मिळवून, **क्यास्तिल् टोन** शहरांत **प्रिटेंडर** यास राजा असें जाहीर केलें; आणि राजाचे सैन्यांतील **लेफटेनंट जनरल** याचें पद घेतलें. या प्रयत्नास मदत करण्याकरितां **फ्रान्स** देशांतून शस्त्रें, लढाईची सामग्री, आणि कित्येक सरदार असें भरून गलबतें आलीं; त्यांवरून **अर्ल** यास निरोप आला कीं, **प्रिटेंडर** स्वतः लवकरच येणार आहे. अशे युक्तीकरून दहा हजार फौज जमली. जेव्हां **अर्ल** याचे बेत **ड्युक आर्गैल** यास समजले तेव्हां त्यानें शत्रूंचे अर्धीही फौज जवळ नसतां, राजावर आपली भक्ति आहे याची प्रचीति दाखवावयाकरितां **डब्लेन** शहरास जाऊन युद्ध करावें असें योजिलें. कितीएक घटिका पर्यंत युद्ध होऊन उभयपक्षींचीं सैन्यें संध्याकाळीं परत गेलीं, आणि दोघांनींही आपला विजय झाला असें मानिलें. जरी दोघांतून एकही रणभूमीवर राहिला नाहीं, तरीं त्या दिवशीं लाभ आणि किर्ति हीं **ड्युक आर्गैल** यासच मिळालीं. त्यानें शत्रूंचें पुढें येणें बंद केलें इतकेंच फार, कारण कीं, कांहीं विलंब लागला असतां केवळ पराजयच झाला अशी त्यांची स्थिति होती. पुढें उत्तरोत्तर **अर्लमार** याचा विशेष नाश होऊं लागल्यामुळें तो फार निराश होऊं लागला. **इन्वर्नेस** किल्ला पूर्वीं त्याजवळ होता, तो **लार्ड लोवाट** यानें राजाच्या स्वाधीन केला, तो **लार्ड प्रिटेंडर** याचे पक्षाचा आपण चालतों असें दर्शवीत असे. **मार्कुइस टलिबार्दिन** यानें आपला प्रदेश राखण्याकरितां **अर्ल** यास सोडून दिलें; आणि फार लोक दुसरी लढाई

लवकर होण्याचें संधान नाहीं असें पाहून स्वस्थपणीं घरीं गेले.

त्याच वेळेस **इंग्लंड** देशांतही बंड चालिलें होतें; परंतु तें यापेक्षां फार फसलें गेलें. जींमध्यें **ड्युक आर्मंड** आणि **लार्ड बालिंग्ब्रोक** हे होते, अशी ही वेडी मसलत **प्रिटेंडर** यानें **पारिस** शहरांत केली, ती तेथील **इंग्लिश** यांचा वकील **लार्ड स्तेर** यास समजली; आणि त्यानें तें सारें वर्तमान सरकारास लिहून पाठविलें. ती समजतांच ज्यां-विषयीं सरकारचे मनांत शंका होती, असे कित्येक **लार्ड** आणि इतर गृहस्थ यास धरून कैद केलें. **होम विंटौन**, **किन्ल** एथील **अर्ल**, आणि दुसरे कित्येक यांस **एडिंबरो** शहरचे किल्ल्यावर टाकिलें. **कामन्स** सभेचा संमति घेऊन राजानें **सर विलियम विंडम**, **सर जान पाकिं-ग्तन**, **हार्वी**, **कोंब**, आणि दुसरे कित्येक यांस धरिलें. **लार्ड लान्सडौन**, आणि **डुप्लिन** यांस बंदीस घातलें. **सर वि-लियम विंडम** याचा सासरा **ड्युक सामर्सेट** हा त्याचा हजीर जामीन होण्यास राजी झाला; परंतु त्याची जामी-नकी कबूल केली नाहीं. असा सर्व बंदोबस्त झाला अस-तांही **इंग्लंड** देशांतील पश्चिम प्रांतांत बखेडा झाला, परंतु तिकडे कांहीं कावा योजिला ह्मणजे लागलाच तो सरकारांत कळून प्रारंभींच तंटा नाहींसा होत असे. या प्रसंगीं **आक्सफर्ड** शहरांतील **युनिवर्सिटी**, ह्मणजे सर्व-विद्यालय, याशीं फार कठोरतेनें व्यवहार चालिला होता, **मेजर जनरल पेपर** ह्मणून एक सरदार होता, त्यानें सूर्यो-दयाबरोबर तें शहर घेतलें; आणि जाहीर केलें कीं, जर कोणी शिकणारा आपले शाळेचे बाहेर येईल तर तो गोळी

घालून मारिला जाईल. उत्तर प्रांतांतलें बंड यापेक्षां अधिक वाढलें होतें. पुढें **अक्टोबर** महिन्यांत **अर्ल ड-वेन्ट्वाटर** आणि **फार्स्तर** साहेब, यांनीं घोड्यांची मोठी जमात मिळवून लढाई केली; आणि **स्काट्लंड** देशांतून कित्येक गृहस्थ येऊन मिळाले, ह्मणून त्यांनीं **प्रिटेंडर** राजा असें जाहीर केलें. त्यांचे कित्येक साथी **न्युक्यास्तल** किल्ल्यांत होते, ह्मणून तो हस्तगत करावयाचा उद्योग प्रथम त्यांनीं केला; परंतु तेथील दरवाजे लागलेले त्यांनीं पाहिले, ह्मणून त्यांस **हेक्सहम** शहरास परत जावें लागलें. यांचें निवारण करावयाकरितां **जनरल कार्पेन्टर** ह्मणून सरदारास नऊशें लोक बरोबर देऊन तिकडे पाठविलें, आणि बंडवाल्यांनीं **केंडाल**, व **लांकस्तर** या प्रांतांचे वाटेनें **प्रेस्तन** शहरास जाऊन कांहीं लढाईवांचून तें घेतलें. परंतु त्यांची मसलत पुढें चालली नाहीं, कां कीं, **जनरल विल्स** ह्मणून कोणी सरदार सात हजार लोक घेऊन त्यांस वेढा घालावयाकरितां त्या शहरावर आला; त्यापासून सुटावायाची त्यांस युक्ति राहिली नाहीं. याकरितां वाटा बंद करून त्यांनीं तें स्थळ सुरक्षित केलें; आणि शत्रूंचा प्रथम हल्ला माघारें फिरविला. परंतु दुसरे दिवशीं **विल्स** याचे कुमकेस **कार्पेन्टर** ह्मणून सरदार होता तो आला; आणि शहरास चहूंकडून वेढा पडला. आपलेच मूर्खपणानें अशा विपत्तींत पडून पुढें **फार्स्तर** यानें पूर्वीं धरून बंदीस घातलेला **कर्नल आक्सबरो** होता, त्याचे बरोबर एक कर्णेकरी देऊन तह करावयास पाठविला. **विल्स** यानें हें कबूल केलें नाहीं; आणि सांगितलें कीं, तुह्मां बंडवाल्यांशीं मला बोलतां येत

इ०स० १७१५

नाहीं. आतां तुह्मास क्षमा इतकीच कीं, तुमचा प्राण लागलाच घेतला जाणार नाहीं. हें ऐकून त्यांनीं आपली युद्धाची तयारी बंद केली; आणि त्यांत जे मोठे गृहस्थ व मुख्य सारे होते ते कैद झाले, आणि सरदारांतून कित्ये- कांनीं राजाचें सैन्य सोडिलें ह्मणून त्यांस **कोर्ट्मार्शल** याचे हुकुमावरून गोळी घालून मारून टाकिलें. साधा- रण लोकांस **चेस्तर** आणि **लिवर्पूल** एथें बंदीस घालून ठेविलें. आणि मनुष्य व कामगार होते त्यांस, त्यापक्षाचे लोकांस भय दाखवावयाकरितां एकमेकाशीं बांधून **लंडन** शहरास पाठविलें.

इतकें झाल्यावर **प्रिटेंडर** यास कांहीं आशा राहूं नये; तथापि तशा संकट समयीं **स्काट्लंड** देशास जावें अशी त्यानें मसलत केली. ह्मणून **फ्रान्स** देशांतून गुप्तरूपानें येऊन **डंकिर्क** शहराजवळ एके लाहानसे गलबतावर बसला, आणि थोडे दिवसांत **स्काट्लंड** देशचे कांठांवर येऊन पोंचला. त्याचे बरोबर सारे साहा पुरूष होते. तो असा कोणास न कळत **आबर्डीन** शहरांतून **फेतरेसो** शहरास पोंचला; तेथें त्यास **अर्लमार** आणि दुसरे प्रति- ष्ठित गृहस्थ सुमारें तीस येऊन भेटले. तेथें तो राजा असें जाहीर केलें. त्याची प्रतिज्ञा **कामर्सी** मुकामची छापून प्रसिद्ध केली. तेथून तो **डंडी** शहरास उघडपणें गेला, आणि पुढें दोन दिवसांनीं तो आपले राज्याभिषे- काच्या समारंभ करण्याकरितां **स्कून** शहरास येऊन पोंं- चला. आपलें येणें निर्विघ्नपणें झालें ह्मणून ईश्वराचा स्तव करावा असा त्यानें हुकूम केला, आणि आपणासाठीं ईश्वराची देवळांत प्रार्थना करावयास धर्मपक्ष्यांस आज्ञा

दिली. या रीतीनें जवळ कांहीं सत्ता नसून त्यानें राजपणाचा सर्व डौल करून घेतला. अशी कांहीं वेळपर्यंत रिकामी शोभा करून शेवटीं त्यानें तो उद्योग ज्या नम्रतेनें आरंभिला होता, तसाच सोडून देण्याचा निश्चय केला. त्यानें आपलें **कौन्सिल** यास सांगितलें कीं, युद्धाचा उद्योग करावयाजोगें द्रव्य, शस्त्र सामग्री, आणि इतर साहित्य माझेपाशीं नाहीं ह्मणून तुह्मास सोडून जाणें मला अवश्य प्राप्त झालें. पुढें तो आपले पक्षाचे कित्येक **लार्ड** बरोबर घेऊन एके लहान **फ्रेंच** गलबतांत **मोंटोस** बंदरामध्यें बसला, आणि चार पांच दिवशीं **ग्रावेलिन** शहरास पोहोंचला.

असें हें निरूपयोगी बंड समाप्तीस गेलें. या रीतीनें जरी शत्रु नाहींसे होऊन विजय झाला, तरी जे विजय पावले त्यांचा क्रोध कमी झाला नाहीं, आणि ज्यांवर अमात्यांनीं क्षमा करूंच नये ह्मणून निश्चय केला होता, अशे हतभाग्य लोकांनीं **लंडन** शहरचे बंदिखाने भरून गेले. **कामन्स** यांनीं सरकारांत विनंतिपत्र लिहिलें कीं, बंड करणारे लोकांचे चांगलें शासन करावें, असें आमचे मनांत आहे. याप्रमाणेंच त्यांनीं **डर्वेन्ट्वाटर, निथ्सडेल कार्न्वाथ** आणि **विंटन** एथील **अर्ल, लार्ड वोडिंगटन केन्मुर**, आणि **नेर्न** यांवर दोष लागू करून **लार्ड विंटन** यावांचून सर्वांस मृत्यूचें शासन ठरविलें. त्या हतभाग्यांचे जीव वाचण्याकरितां किती विनंती झाल्या तरी अमात्यांनीं ऐकिल्या नाहींत.

**लार्ड डर्वेन्ट्वाटर, निथ्सडेल**, आणि **केन्मुर** यांचा शिरच्छेद लागलाच करावा असा हुकूम केला, आणि बा-

कीच्यांस पुढचे वेळेपर्यंत ठेविलें. **निथसडेल** याचा शिरच्छेद व्हावयाचा त्याचे पूर्व रात्रीस त्याचे आईनें बायकोचा पोशाग त्यास आणून दिला, तो नेसून तो दैववशात् बचावला. नेमलेले वेळेस **टवरहिल** या ठिकाणीं **डवैन्ट्वाटर** आणि **केन्मुर** यांचा शिरच्छेद झाला. दोघानींही तें शासन शांत मनानें भोगिलें.

पुढें एप्रिल महिन्याचे प्रारंभीं बंडवाल्यांचे चौकशीवर नेमलेले कामगार लोक **कामन प्लीकोर्ट** एथें एकत्र जमा झाले. त्या वेळेस **फास्टर** साहेब, **मकिंटाश** साहेब व त्याचे साथी दुसरे वीस यांवर अपराध पत्रें केलीं.

त्यांतून **फास्टर न्यूगेट** या नांवाचे मोठे बंदिखान्यांतून सुटून जाऊन सुखेंकरून महाद्वीपांत पोंचला. **पिट्स** ह्मणून पुरुष त्या बंदिखान्याचा रखवालदार होता, त्यानें **फास्टर** यास मुक्त करण्याचा उद्योग केला असेल, या शंकेनें त्याची चौकशी केली; परंतु त्यास सोडून दिलें. इतकें झालें असतांही **मकिंटाश** आणि दुसरे कित्येक बंदिवान, रखवालदारास व किल्लीवाल्यास मारून, व चौकीदारांचीं शस्त्रें घेऊन पळून गेले. मग बाकी राहिले होते त्यांची चौकशी होऊन **टैबर्न** नामक ठिकाणीं चार पांचांस फांशीं देऊन शरीर फाडून तुकडे केले; बावीस लोकांचा शिरच्छेद **प्रेस्तन** आणि **मांचेस्तर** एथें केला, आणि सुमारें एक हजार बंदिवानांस उत्तर **अमेरिका** देशास पाठवून दिलें.

पुढें कांहीं दिवसांनीं **स्पेन** आणि **इंग्लंड** एथील दरबारांत वितुष्ट पडलें; त्यावरून **प्रिटेंडर** यांस पुनः कांहीं आशा आली. त्यानें योजिलें कीं, **स्प्यानिश** याचा प्रधान

**क्यार्डिनल आल्बिरोनी** नामें होता, त्याचे मदतीनें नवें एक बंड उत्पन्न करावें. त्या युद्धोद्योगांत मुख्यत्वें **ड्युक आर्मंड** याची नेमणूक झाली. मग तो **ड्युक, स्पानिश** दरबारांतून लढाऊ व भाड्याचीं गलबतें दहा घेऊन निघाला. त्यानें गलबतांवर युद्धाकरितां तयार अशी फौज साहा हजार व अणखी वारा हजारांचीं शस्त्रें वगैरे सामान बरोबर घेतलें; आणि तेथून निघून **केप फिनिस्टर** यापर्यंत आला, तंव मोठें एक वादळ होऊन त्याचीं गलबतें खराब झालीं, व उद्योग फसला गेला. हा एक पेंच आला; आणि **स्पानिश** यांचें सैन्य **सिसिली** व इतर देशांत जय पावलें नाहीं, या दोन कारणांमुळें **फिलिप** राजानें तह करावयाचा निश्चय करून शेवटीं चार पक्षी सरकारांचे तहनाम्यास कबूल झाला. त्या वेळेस ही गोष्ट मोठी झाली असें वाटलें; परंतु **इंग्लंड** देशाचे द्वारें हें सर्व झालें असतां त्या देशाचें यापासून कांहीं हित झालें नाहीं.

अशा समयीं कोणी **जानला** या नांवाचे **स्काट्लंड** देशांतील पुरूषानें **मिसिसिपी** या नांवाची मंडळी **फ्रान्स** देशांत जमवून लोकांस ठकविलें. तीपासून बहुत द्रव्यलाभ होईल, असा त्या **फ्रेंच** लोकांचा भरंवसा होता; परंतु अधिक विपत्तिमात्र प्राप्त झाली. तेव्हांच **इंग्लिश**ही याच जातीचे एके उद्योगानें फसले गेले; ज्याचें नांव **सौथसी कंपनी**, आणि ज्या पासून पुढें बहुत दिवसांनीं हजारों लोकांनीं दुःखें भोगिलीं. ही गोष्ट मुळापासून संक्षेपानें सांगतों. **विलियम** राजाचे राज्यापासून **पार्लमेंट** पैक्याचे पुराव्याचो योजना करीत नसे, किंवा योजिला तो वसूल करावयास वेळ लागत असे,

इ० स० १७२१

ह्मणून सरकारानें व्यापारी लोकांचे कित्येक मंडळ्यांपासून पैका उसनवार घेतला होता; आणि त्यांत जी मंडळी दक्षिण समुद्रांत व्यापार करीत होती तीकडूनही घेतला होता, त्या मंडळीनें सरकारास एक कोटी **पौंड** कर्ज दिलें, आणि वर्षास साहा लक्ष व्याज येत होतें, तें पांच लक्ष घेऊन ती राजी झाली.

असें वर्तमान असतां, **ब्लौंट** या नांवाचा कोणी वकील होता; ज्यामध्यें असले कामाचे उपयोगी धूर्तता आणि बाह्य चातुर्य बहुत होतें. त्यानें सरकारचे आमात्यांस **सौथसी कंपनी** इचे तर्फेनें विनंती केली कीं, आह्मी व्यापारी लोकांचे बहुत मंडळ्यांचें सरकारावर कर्ज आहे, तें विकत घेऊन एकटीच ही **कंपनी** सरकाराची कर्जदार करितों. या बाबदचा करार त्यानें फार सोईचा केला; तो असा. सरकारचे कर्जदार जे लोक होते, त्यांकडून **सौथसी कंपनी** इनें त्यांचे मर्जीप्रमाणें करार करून कर्ज आपले नांवें करून घ्यावें; या रीतीनें सर्व कर्ज तिचे नांवें झाल्यावर सरकारानें साहा वर्षेंपर्यंत शेंकडा पांचप्रमाणें व्याज द्यावें; पुढें शेंकडा चारप्रमाणें द्यावें; आणि जेव्हां **पार्लमेंट** सभेची मर्जी होईल तेव्हां त्या कर्जाचा फडशा करावा; परंतु या करारामध्यें मोठी लबाडी होती. ती अशी कीं, त्या मंडळीचे अंमलदारांजवळ सर्व राज्याचें कर्ज विकत घेण्याजोगें द्रव्य नव्हतें, ह्मणून त्यांस मोकळीक दिली कीं, दक्षिण समुद्रांत व्यापार करावयाचे वेतानें तुह्मी भागीदार जमवून पैका उत्पन्न करावा. मग त्या व्यापारापासून बहुत नफा होईल, असें त्या अंमलदारांनीं दर्शविलें; आणि लोकांनींही त्यापेक्षां विशेष आशा

केली. ह्मणून जे सरकारचे कर्जदार लोक होते, त्यांस बोलिले कीं, आपलीं भांडवलें **सौथसी कंपनी** इचे दप्तरांत बार करावीं.

त्या मंडळीचे अंमलदारांनीं भागीदारांचीं नांवें लिहिण्याकरितां दप्तर उघडतांच, बहुत लोक आपलें दुसरें भांडवल दक्षिण समुद्र भांडवलांत मिळावयास येऊं लागले. ही ठकबाजी अशीच युक्तीनें पुढें चालविली. पुंजा विकत घेण्यास जें पडलें होतें, त्याचे दुप्पट किंमत थोडे दिवसांत येऊन तो बेत करणारांचे आशेपेक्षां अधिक सिद्धीस गेला. हा बुद्धिभ्रंश पुढेंही चालला; आणि तें भांडवल प्रथम जमलें होतें, त्याचे दाहा पट सुमारें झालें. कांहीं महिने गेल्यावर लोक समजले कीं, त्या बेतापासून जें हित योजिलें होतें तें व्यर्थ. याप्रकारें हजारों कुटुंबें खराबी खालीं आलीं. या कामांत जे मुख्य होते, त्यांचें **पार्लमेंट** सभेनें शासन केलें; तें या रीतीनें कीं, ती मसलत चालत होती त्यासमयीं जीं वतनें वगैरे त्यांनीं मिळविलीं होतीं, तीं जप्त केलीं. तसेच नाश झालेले लोकांविषयींही उपाय योजिले. असा लोकांत बखेडा उत्पन्न झाला, त्यावरून बंडवाल्यांस पुनः कांहीं हिंमत आली; परंतु त्यांनीं युक्तीची मसलत केली नाहीं. त्या वेळचे प्रधानांशीं विरुद्ध असा एक **प्रान्सिस आटर्बरी** नामें **राचेस्तर** शहरचा **बिशप** होता; त्यास प्रथम धरून त्याचे कागदपत्र जप्त केले. आणि त्यास किल्ल्यावर बंदींत ठेविलें. कांहीं काळानंतर **ड्युक नार्फोक अर्ल आररी, लार्ड नार्थग्रे,** आणि दुसरे कित्येक गृहस्थ या सर्वांस धरून कैदेंत ठेविलें. त्यांतून **बिशप** यास देशांतरास पाठविलें; आणि

**लेयर** साहेबास **टैबर्न** ठिकाणीं फांशीं दिलें. बाकीचे कोणावर शासन करावयाजोगे अपराधाचा पुरावा झाला नाहीं.

**चान्सरी कोर्ट** यांत बहुत लबाड्या होऊन न्याय होत नाहीं, असें पाहून त्या वेळेस **कामन्स** यांनीं **अर्ल माक्स्फील्ड, टामस, चान्सेलर,** यांवर **लार्ड** सभेंत आरोप ठेवून चौकशी करावी असा निश्चय केला. ती चौकशी होण्यास मोठे श्रम लागले. ती वीस दिवसपर्यंत झाली. **अर्ल** यानें त्या दरबारांतल्या जागा विकून पैसा जमा केला; आणि पूर्वींचे **चान्सेलर**ही तसेंच करीत असत, असा त्यानें पुरावा केला. परंतु ही गोष्ट अयोग्य दिसून आली, ह्मणून त्या वेळेस मागील वहिवाट एकीकडे राहून तो **अर्ल** यावर लबाडी लागू झाली. त्यानें तीस हजार **पौंड** दंड द्यावा, आणि त्याचा फडशा होई तोंपर्यंत कैदेंत राहावें असें ठरलें. हा दंडाचा फडशा त्यानें पुढें दीड महिन्याचे आंत केला.

त्या काळीं लोकांमध्यें धन आणि उपभोग वाढत चालिले होते. तशीच लबाडी, असत्य, आणि लोभ हीं विशेष होत चाललीं होतीं. व्यापारामुळें कपट अधिक झालें; द्रव्यानें उधळेपणा वाढला. सर्व स्थितीचे लोकांत पातक, आणि दुर्गुण उत्पन्न होऊं लागले, ते बंद होण्याकरितां **पार्लमेंट** सभेनें कांहीं उपाय योजिले, परंतु ते सिद्धीस जाण्यास अमात्यांची संमति किंवा लोकांस तरी आवड पाहिजे होती; तें कांहीं नव्हतें; ह्मणून त्यांपासून विशेष फळ झालें नाहीं.

राजास आपले **हानोवर** देशांतले **इलेक्टर** याचे सं-

स्थानांत जाऊन दोन वर्षें झालीं होतीं, ह्मणून **पार्लमेंट** सभेस निरोप होतांच तो तिकडे जाण्याची सिद्धता करून आपले मागें कारभार चालविणारी मंडळी नेमून, गलबतावर चढला; आणि **वोएट** ह्मणून लहान गांव **हालंड** देशांत आहे तेथें उतरला. तो दुसरे दिवशीं पुढें निघाला, आणि दोन दिवसांनीं मध्यरात्रीचे सुमारें सुखरूप **डेल्डेन** शहरास पोंचला. तेथें रात्रीं सुखानें भोजन करून दुसरे दिवशीं सकाळीं पुढें चालिला; इतक्यांत त्यानें प्रहर दिवसाचे सुमारें अकस्मात् रथ उभा करावयास आज्ञा केली. **फाब्रीस** या नांवाचा पूर्वींचा **स्वीडन** देशचे राजाचा एक चाकर तेव्हां राजाजवळ होता; तो राजाचा एक हात निर्जीव झाला पाहून रक्त फिरावयाकरितां रगडूं लागला. त्यानें कांहीं झालें नाहीं, असें पाहून मागें घोड्यावर एक शस्त्रवैद्य होता त्यास बोलाविलें. त्यानें दारू वगैरे त्यास चोळिली, पण कांहींच झालें नाहीं; आणि त्याची जीभ सुजली. "मग तो राजा **ओस्नाबर्ग** शहरास चला;" इतकें मात्र सांगून **फाब्रीस** याचे हातांत वेशुद्ध पडला, आणि दुसरे दिवशीं दोन प्रहर दिवसाचे सुमारें मृत्यु पावला. त्या वेळेस त्याचें वयास अडसष्टावें वर्ष होतें. त्यानें तेरा वर्षें राज्य केलें.

---

# प्रकरण ३५.

## द्वितीय जार्ज राजाची कथा.

सन १७२७ पासून १७६० पर्यंत.

प्रथम **जार्ज** राजा मेल्यानंतर, त्याचा मुलगा द्वितीय

जार्ज राज्याधिकार पावला. त्याची बुद्धि बापापेक्षां कमी होती; आणि त्यास महाद्वीपांतील राज्याचा बहुत पक्षपात असे. त्याचे हाताखालीं मोठे पदाचा अधिकारी एक **सर राबर्ट वाल्पोल** नामें गृहस्थ होता; तो मुळचा लहान पदवीचा असतां, अनुक्रमानें दोन राज्यांत मोठेपणास चढला होता. तो **टोरी** लोकांचा द्वेष करीत असे. राजाचा अख्त्यार त्या वेळेस कमी झाला होता; तो राखावयाकरितां तो **वाल्पोल, कामन्स** यांस लांच देत असे; परंतु हा उपाय व्यर्थ गेला; कारण कीं, त्याकडचा पैका घेऊन त्यांची सत्ता मात्र वाढली.

पूर्वीचे राज्यांत तह ठरले होते, ते मोडावयाचा प्रारंभीं प्रथम **स्पानियार्ड** लोकांनीं केला; आणि अशा बातम्या येऊं लागल्या कीं, **स्पानिश** सरकारचे गलबतांनीं बहुत **इंग्लिश** व्यापाऱ्यांचे गलबतांस चांचे ह्मणून धरून लुटलें. **इंग्लिश** यांचे प्रधानांस प्रथम या बातम्या केवळ खऱ्या वाटल्या नाहींत; आणि त्या उद्धतपणाचें निवारण तहाचे रितीप्रमाणेंच होईल, अशी त्यांस आशा होती; परंतु शेवटीं त्याविषयीं फार फिर्यादी होऊं लागल्या. आणि व्यापाऱ्यांनीं **कामन्स** यांस अर्जी दिली, त्यावरून त्यांनीं चौकशी आरंभिली. कित्येकांस निरर्थक धरून फार दुःख दिलें होतें, त्यांची त्यांनीं शायदी घेतली. एके गलबताचा धनी व्यापारी होता, त्यावर **स्पानिश** यांनीं फार जुलूम केला होता; त्याचे साक्षीचे वेळेस त्यानें फार स्वस्थ रितीनें भाषण केलें; आपणास लुटून सर्व नेलें, कान कापले, व मारावयाची सिद्धता केली तें सांगितलें; आणि

बोलिला, "तेव्हां मी ईश्वराकडे क्षमा मागितली; आणि माझा देव याचा सूड उगवील अशी आशा केली."

या वातम्या ऐकून लोकांस फार राग आला; परंतु प्रधानांनीं याची फार चौकशी केली नाहीं. मग **ब्रिटन** देशचा राजा, **जर्मनी एंपरर**, आणि **स्पेन** देशचा राजा, या तिघांचा तहनामा ठरून **वियेन्ना** शहरांत सह्या झाल्या; तेणेंकरून **युरोप** खंडांत पहिले सारिखी स्वस्थता झाली; आणि लढाई होणार होती, ती कांहीं वेळपर्यंत राहिली. त्यावरून **इंग्लंड** देशचे राजास आशा वाटली कीं, आतां सारीं युद्धें बंद होतील, **पार्मा** एथील **ड्युक** मेल्यावर **डान कार्लोस**, यानें आरमाराचे मदतीनें **पार्मा** आणि **प्लासेन्शिया** एथील अंमल कांहीं तंट्यावांचून घेतला; आणि **टस्कनी** मुलुखांत साहा हजार **स्पानियार्ड** ठेविले. कारण कीं, तेथला **ड्युक** मेल्यानंतर तें ठिकाण आपले स्वाधीन व्हावें.

पुढें कांहीं वेळपर्यंत स्वस्थता चालली होती; तितक्यांत कांहीं विशेष गोष्ट घडली नाहीं. त्याकाळीं कित्येक लोकांनीं एकीकडे मिळून एक मंडळी करून तिचें नांव दान मंडळी, या अर्थाचें ठेविलें होतें. ती मंडळी एकत्र होण्याचें कारण हें कीं, गरीबांस लहान जामीनगत घेऊन थोडे व्याजावर पैका उसना द्यावा; व श्रीमंतांस चांगली जामीनगत घेऊन द्यावा. तिचें भांडवल प्रथम तीस हजार **पौंड** होतें; परंतु पुढें साहा लाख झालें. तो पैका टीप करून जमला होता, व त्याचा खर्चवेच करण्याचे कामावर कित्येक पुरुष नेमिले होते. अशी ती मंडळी वीस वर्षेंपर्यंत नीट चालली

इ० स० १७३१

असतां एके दिवशीं तिचा जामदार **जार्ज राबिन्सन**, जो पार्लमेंट सभेंत **मार्लो** प्रांताकडील सभासद होता तो, व **जान टाम्सन्**, त्यांचा कोठीवाला, हे दोघे नाहींसे झाले. मग त्या कामाचे मालक शोध करूं लागले, तंव मुदलांतून पांच लक्ष **पौंड** अगदीं नाहींसे केले, असें आढळलें, व ते कसे नाहींसे झाले हें समजेना. मग त्यांनीं **पार्लमेंट** सभेस अर्जी केली कीं, आह्मी ठकलों गेलों, व आह्मांतून कित्येक वहुत पेंचांत आले. या फिर्यादीची चौकशी करण्याकरितां **पार्लमेंट** सभेनें **कमिटी** नेमिली, ते शोध करूं लागले तंव त्यांचे दृष्टीस आलें कीं, **राबिन्सन** आणि **टाम्सन्**, यांनीं त्या दान मंडळीचे कित्येक चौकसनिसांशीं मिळून भांडवलाची चोरी करून मालकांस ठकविलें. या कर्मांत बहुत प्रतिष्ठित व गुणी पुरुष होते, आणि राज्यांतले कित्येक प्रथम पदाचे लोकांसही तो डाग लागावयास राहिला नाहीं. सारांश, त्या वेळेस सर्व लोक क्षोभी झाले होते. **पार्लमेंट** सभेंतील साहा पुरुषांवर फार लबाडीचीं कामें लागू होऊन त्यांस तेथून काढून दिलें. **सर राबर्ट सटन्, सर आर्चिबाल्ड ग्रांट**, आणि **जार्ज राबिन्सन** या तिघांनीं दान मंडळीचें काम चालविण्यांत लबाडी केली; ह्मणून **डेनिसबांड**, आणि **सर्जंट बिर्च** यांस **अर्ल डर्वेन्ट्वाटर** याची जप्त केलेली संपत्ती विकली, त्यांत कृत्रिम केलें ह्मणून; आणि शेवटील **हान्की** शहरांतील **जान वार्ड** यास खोटी सही केली; ह्मणून सभेंतून काढून दिलें.

**युत्रेक्ट** शहरांत तह झाला तेव्हांपासून **स्पानियर्ड** लोकांनीं **ब्रिटन** देशाचे **अमेरिका** खंडांतले व्यापारास

फार उपद्रव केला होता; आणि **ब्रिटन** देशांतील व्यापाऱ्यांनीं त्या देशांत चोरून व्यापार करण्याचा उद्योग चालविला होता. **क्यांपींची** एथील समुद्राचे कांठावर लांकूड तोडावयाचीं मोकळीक **इंग्लिश** यांस तहाप्रमाणें होती. तेव्हां ते त्या प्रधानानें त्या देशांत कांहींतरी, जिंनस कसातरी पाठवीत; ह्मणून **स्पानियर्ड** यांनीं ती मोकळीक नाहीं, अशी करण्याची मसलत आरंभिली. हीं लांकूड तोडण्याची मोकळीक बहुत वेळ मान्य झालेली होती; परंतु तिचा निश्चय कधींच झाला नव्हता. कारण कीं, पूर्वींचे तहनाम्यांत तें एक वेगळें कलम लिहावयास कांहीं कारण ध्यानांत आलें नव्हतें. तो कांठ राखण्याकरितां जीं **स्पानिश** गलबतें नेमिलीं होतीं, त्यांनीं **इंग्लिश** यांवर दुष्टपणा चालविला. बहुत **ब्रिटन** देशचे लोकांस **पोटोसी** गांवच्या खाणी खाणावयास जावें लागलें; कीं जेथून फिर्याद पोंचण्याचा उपाय नव्हता. या रीतीनें करार नाम्याप्रमाणें चालण्यांत अंतर पडलें. ह्मणून **माद्रिद** एथील दरबारांत बोलणीं पाठविलीं; त्यावर चौकशी करितों, अशीं त्यांनीं उत्तरें देऊन कांहींच केलें नाहीं. अशा दुःखाच्या फिर्यादी **इंग्लिश** व्यापाऱ्यांनीं बहुत सांगितल्या; परंतु त्यांचा बंदोबस्त युद्धानें करावा, तें सोडून तहानें होईल, अशी प्रधानांचे मनांत व्यर्थ आशा होती.

**इंग्लंड** देशांतले दरबारानें भयें दाखविलीं, तेणेंकरून शत्रूंचा आग्रह मात्र अधिक वाढला; आणि त्यांचे चौकीचे गलबतांनीं अपराधी आणि निरापराधी, हें कांहींच न पाहातां सर्वांस धरावयास आरंभ केला. असें दिसून आलें

कीं, **पार्लमेंट** सभेनें त्याची चौकशी करितां **स्पेन** देशचे सरकारानें **इंग्लिश** सरकारास द्रव्य देण्याचा करार केला होता, त्याप्रमाणें दिलें नाहीं, व न देण्याचें कारणही सांगितलें नाहीं. असा सर्वांचा आग्रह पाहून मुख्य प्रधानानें लढाईची तयारी केली; आणि ती पाहून शत्रूही लढावयास सिद्ध झाले. त्या भयंकर प्रसंगीं **हेग** शहरांत **फ्रेंच** यांचा वकील होता त्यानें कळविलें कीं, तह ठरल्याप्रमाणें **फ्रेंच** राजा **स्पेन** देशचे राजास मदत करणार. पूर्वीं वीस वर्षांचे मागें जो तहनामा ठरविला, तो या रीतीनें उलटा केला. तो असा,—त्या वेळेस **फ्रान्स** आणि **इंग्लंड** हे उभयतां मिळून **स्पेन** याशीं विरुद्ध झाले होते; आतां **स्पेन** आणि **फ्रान्स** मिळून **इंग्लंड** देशावर उठले. यावरून कळतें कीं, तहाचा कांहीं भरंवसा नाहीं. राज्यामध्यें किती स्थिर जरी तह ठरले, तरी राजनीतिज्ञांनीं त्यांचे भरंवशावर राहूं नये.

पुढें फौज वाढण्याचा हुकूम केला; आणि लढाईची प्रतिज्ञा समारंभानें केली. **मेदितरेनियन** समुद्रांत शत्रूंचीं दोन गलबतें धरिलीं. **वेर्नन** नामें **आड्मरल्** मोठा धैर्याचा सरदार होता, त्यास **अमेरिका** देशांत शत्रूंचा नाश करावयाकरितां आरमार देऊन पाठविलें. त्यानें **कामन्स** सभेंत सांगितलें होतें कीं, **पोर्टोबेलो** ह्मणून दक्षिण **अमेरिका** देशांत एक समुद्रकांठचें शहर आहे, तें सहज स्वाधीन होईल; आणि प्रतिज्ञा केली होती कीं, सा हा गलबतांनिशीं मी स्वतः तें घेईन. ही त्याची प्रतिज्ञा त्या वेळेस व्यर्थ अशी वाटली होती. त्याचे पक्षाचा अभिमान कमी करावयाकरितां ती कबूल केली होती; परंतु

हे त्यांचे तर्क निष्फळ झाले, आणि त्यानें साहाच गलबतें घेऊन जाऊन त्या ठिकाणचे सर्व किल्ल्यांवर हल्ला करून ते जमिनीस मिळविले; आणि त्याचे माणसांचा फार नाश न होतां तो विजयी झाला. त्यामुळें इंग्लंड देशांत त्याची कीर्ति फार झाली.

या रीतीनें सर्वत्र तयारी चालली असतां, दक्षिण समुद्रांत शत्रूंचा नाश करण्याविषयीं **कमोडोर आन्सन** यास आरमार देऊन पाठविलें. असें योजिलें होतें कीं, त्या गलबतांनीं **मागेलन स्त्रेट** यांतून **चिलि** आणि **पिरु** देशाचे कांठानें उत्तरेकडेस जाऊन **डेरियन इस्थमस** या पलीकडे **आडमरल वेर्नन** होता, त्यास मदत करावी. हा बंदोबस्त प्रधानाचे विलंबामुळें फुकट गेला. समय गेल्यानंतर **कमोडोर** आपले बरोबर पांच मोठीं गलबतें, एक **फ्रिगेट**, आणि दोन सामानाचीं गलबतें, व सुमारें चवदाशें लोक घेऊन निघाला. त्यानें **ब्राझिल** देशाचे कांठावर त्या उष्ण देशांत अति रमणीय, फळें व पुष्पें पुष्कळ, असें **सेंट क्याथेरिन** ह्मणून बेट आहे, तेथें कांहीं दिवसपर्यंत आपले लोकांस विश्रांति दिली. पुढें तो दक्षिण दिशेस पृथ्वीचे शीतळप्रदेशीं चालिला; आणि एके भयंकर वादळांतून निभावून पांच महिन्यांत **केप होर्न** यास प्रदक्षिणा करून उत्तरेस गेला. त्या वेळेस त्याचे गलबतांची फाटाफूट झाली, लोकही **स्कर्वी** रोगामुळें फार हैराण झाले, ह्मणून त्यास **जुआन फर्नांदिस** बेटांस पोंचावयास मोठें संकट पडलें. तेथें त्यास एक तारूं व सात तोफांचें गलबत, अशीं दोन येऊन मिळालीं. तेथून उत्तरेस त्यानें **चिली** प्रांताचे कांठांवर उतरून **पैटा** शहरावर रात्रीं हल्ला केला. असे मोठे धीराचे

कामांत त्यास गलबतांचा उपयोग पडला नाहीं. थोडे शिपायांनीं काळोकाचे आश्रयानें सर्व शहरांत धामधुम केली. त्या ठाण्यांतील अंमलदार, व तेथील लोक चहूं-कडून पळाले. **इंग्लिश** यांचे थोडेसे लोक त्या शह-रांत तीन दिवसपर्यंत अंमल राखून, तें लुटून जाळून गेले.

**अमेरिका** महाद्वीपाचे पश्चिम दिशेस **डेरियन इस्थमस** यावरील **पानामा** प्रांतापर्यंत तीं गलबतें पुढें लव-करच पोंचलीं, तेथें **कमोडोर** यानें योजिलें कीं, जीं मातबर गलबतें **फिलिपिन** बेटापासून **मेक्सिको** देशास व्यापाराकरितां जातात, त्यांतील एक घ्यावें. एका दे-शापासून दुसरे देशास अशीं मातबर गलबतें प्रतिवर्षीं एक दोहोंवर जात नसत; ह्मणून त्यांवर पुष्कळ द्रव्य न्यावया-जोगीं तीं मोठीं आणि त्याचें संरक्षण करावयाजोगीं बळ-कट असत. यांतून एकादें भेटेल, या आशेनें **कमोडोर** आपले थोडेशे गलबतानिशीं **पासिफिक** महासागरांत चालिला, परंतु पूर्ववत् पुनः एकवेळ त्याचे लोकांस **स्कर्वी** रोगाचा उपद्रव झाल्यामुळें कित्येक मेले, आणि बहुतकरून सर्व अशक्त झाले. अशा संकट अवस्थेंत त्यानें आपले सारे लोक एके गलबतांत आणिले; आणि दुसऱ्यास आग लावून देऊन **तिनियन** नामें बेट आहे तेथें पोंचला. त्या रमणीय स्थळीं तो आपले लोक बरे होईपर्यंत व गलबतें नीट होईपर्यंत राहिला.

याप्रमाणें सिद्धता करून तो तसाच पश्चिमेकडून **चीन** देशास गेला. ज्या अमर्याद महासागरांत त्यानें इतकीं दुःखें भोगिलीं होतीं, त्यांत पुनः जाऊन पडावयाकरितां त्यानें तेथें सामानाची तरतूद केली; आणि कित्येक **डच**

व तेथचे लोक गलबतावर घेऊन **अमेरिका** देशास निघाला. तेव्हां अतिशय संकटें भोगून इतके दिवस ज्या **स्पानिश** गलबताची तो आशा करीत होता, तें त्यानें पाहिलें. त्यावर साठ तोफा व पांचशें लोक होते; इकडे **कमोडोर** याजवळ त्याचे अर्धेंही नव्हते. असें असतांही **इंग्लिश** यांकडचाच जय झाला; आणि ते ती मातवर लूट घेऊन आले. तिची किंमत सुमारें तीन लक्ष **पौंड** झाली. पूर्वीं गलबतें सांपडलीं होतीं, त्यांतलाही पैका इतकाच सांपडला होता. या प्रकारें तीन वर्षें पर्यंत मोठ्या श्रमानें आणि धैर्यानें प्रवास केल्यापासून थोडे लोकांस बहुत द्रव्य प्राप्त झालें; परंतु एक मोठे अरमाराची नुकसानी सरकारास झाली.

त्या वेळेस **इंग्लिश** यांनीं मोठे हुशारीनें काम चालविलें होतें. **आन्सन इंग्लंड** देशांतून गेला, त्याच वेळेस **न्युस्पेन** देशावर हल्ला करावयाकरितां दुसरे एक अरमार एकुणतीस मोठीं गलबतें, तितकींच सुमारें **फ्रिगेट**, सुमारें १५००० खलाशी लोक, व तितकेंच दुसरें पायदळ देऊन पाठविलें होतें. या शेवटीं सांगितलेले अरमारास **आन्सन** यानें मदत करावी असें योजिलें होतें. अशीं चांगले रीतीनें अरमाराची तयारी कधींही झाली नव्हती, व लोकांनींही विजयाची अशी कधीं आशा केली नव्हती. जमीनीवरचे पायदळाचा सरदार **लार्ड क्याथ्कार्ट** ह्मणून गृहस्थ होता त्यास नेमिलें. तो वाटेनें मेला ह्मणून सरदारपणा **जनरल वेंट्वर्थ** नामें साहेबाजवळ आला. त्यामध्यें एवढे कामास योग्य गुण नव्हते, असें लोकांचे ध्यानांत आलें.

तें सैन्य **क्यार्थेजिना** देशांत पोंचल्यावर त्यांनीं एक तोफा लावावयाची जागा केली; आणि तेथून मुख्य कि- ल्ल्यास वाट पाडली. त्या वेळेस गलबतांचा सरदार **वर्नन** यानें त्याचे मदतीकरितां बंदरांत कित्येक गलबतें पाठविलीं, किल्ल्यांत वाट होईल, असें दिसून आल्यावर एक फौजे- च्या टोळीस अकस्मात् हल्ला करावयाचा हुकूम केला. त्या वेळेस **स्पानियर्ड** यांनीं धीर धरिला असता, तर कि- ल्ल्याचा बचाव झाला असता; परंतु ते तो सोडून भयानें पळून गेले. ही थोडी फत्ते झाल्यावर फौज शहराजवळ गेली; परंतु तेथें तीस अकस्मात् अटकाव झाला. अशी वातमी उठली कीं, किल्ल्यास वाट पाडितां यावी, इतकीं जवळ गलबतें नेतां येईनांत; ह्मणून फौजेनें किल्ल्यावर चढावें इतकें मात्र बाकी राहिलें. गलबतांचे आणि फौ- जेचे मुख्य एकमेकावर दोष ठेवीत. एक जें नाहीं ह्म- णत, तें दुसरे होय ह्मणत. शेंवटीं **आडमरल** याचे बो- लण्यामुळें **वेंट्वर्थ** यानें **सेंट लाझेर** किल्ल्यावर हल्ला करून चढण्याचा हुकूम दिला; परंतु त्यापासून बहुत नाश झाला. तो असा कीं, फौज जात असतां वाट दाखविणार होते त्यांस मारिलें, त्यामुळें फौज वाट चुकली. शहराच्या दुर्बळ भागावर त्यांनीं हल्ला करावा, तें टाकून जिकडे बळकटी होती तिकडे यत्न आरंभिला; कीं, जेथें शहराचा मार त्यांच्या आंगावर येई. **ग्रानाडियर** यांचा सरदार **कर्नल ग्रांट** साहेब होता, तो प्रथमच पडला. पुढें लवकरच त्यांच्या चढण्याच्या शिड्या फार आखुड असें आढळलें; हुकूम नाहीं ह्मणून सरदार लोक संकटांत पडले; शत्रूंचा सारा मार सैन्यावर पडला, व पुढें काय करावें.

तें सुचेना. कित्येक घटिकापर्यंत तो भयंकर मार मोठे शौर्यानें सोसून शेवटीं फौज परतली. त्या लढाईचे ठिकाणीं साहाशें लोक पडले. या लढाईपेक्षां तेथील हवेनें सैन्याचे बहुत हाल झाले. पाऊस असा पडूं लागला कीं, तळ देऊन राहावेना, आणि त्या ऋतूमुळें अनेक प्रकारांनीं मृत्यु येऊं लागले. या विपत्तींत दुसरी एक अडचण झाली. ती अशी कीं, फौजेचे आणि गलबतांचे सरदारांत तंटा पडल्यामुळें, कांहीं गोष्ट सिद्धीस गेली नाहीं. शेवटीं त्या दोघांनीं इतकें कबूल केलें कीं, फौजेनें गलबतावर चढून या भयंकर जागेंतून जावें. तसें करून ते आले, आणि **इंग्लंड** देशांत तें फजीतीचें वर्तमान समजतांच सर्व लोकांस वाईट वाटून ते कुरकूरूं लागले. पूर्वीं जरी अमात्याचे द्वारें जय मिळाला नव्हता तरी त्याची स्तुति झाली; आतां तो या उपद्रवास कारण नसतां लोक त्याची निंदा करूं लागले.

मग **कामन्स** यांचा क्रोध आपल्यावर झाला, व आपले पदाचें संरक्षण होण्याविषयीं यत्नकरून फळ नाहीं, असें पाहून प्रधानानें सांगितलें कीं, मी पुढें **कामन्स** सभेंत बसणार नाहीं. त्याचे दुसरे दिवशीं कांहीं दिवसांचे मुदतीनें **पार्लमेंट** सभेस निरोप दिला;- आणि तितक्यांत **सर राबर्ट वाल्पोल** यास, **अर्ल आक्सफर्ड** असें पद मिळून त्यानें सर्व काम कारभार सोडून दिला.

इ० स० १७४१

त्या प्रधानाचा मोड झाला; परंतु कांहीं फळ झालें नाहीं; कां कीं, पूर्वीं ज्यांनीं लोकांचे स्वतंत्रतेचे संरक्षणाविषयीं मोठमोठ्या प्रतिज्ञा केल्या होत्या, त्यांस नवे उद्योग मिळतांच, त्यांच्या बुद्धि फिरल्या. त्यांस लबाड समजून

सर्व लोक फार संतुष्ट झाले; परंतु त्यांमध्यें **बाथ** एथील **अर्ल पुल्टनी** यावर त्यांचा फारच राग झाला. पूर्वीं लोकांची प्रीति त्यावर फार होती; परंतु त्याची लबाडी पाहून त्यांचें त्याविषयीं मन बदललें. आणि राजानेंही तसेंच समजून त्यास जन्मवर कांहीं काम सांगितलें नाहीं.

इसवी संन् १७४० त **जर्मनी** देशचा **एंपरर** मेला, तेव्हां आपलें सामर्थ्य वाढवावयाची ही चांगली संधि आहे, असें **फ्रेंच** यांनीं जाणिलें. **प्राग्माटिक सांक्शन** ह्मणजे **एंपरर** याचें सगळें राज्य मागें त्याचे मुलीनें चालवावें, असा जो तह ठरला होता, तो मोडून त्यांनीं **बवेरिया** एथील **इलेक्टर** यास राज्यावर नेमविलें. साहावे **चार्लस** राजाची मुलगी **हंगारी** देशची राणी होती, तिचे वारिशास आलेला अधिकार या रीतीनें नाहीं असा झाला; तिला एक वर्षपर्यंत सर्वांनीं सोडून दिली; आणि तिला कांहीं आशेचें स्थळ राहिलें नाहीं. तिच्या बापाचे डोळे नुकते झांकत आहेत इतक्यांत **प्रशिया** देशच्या राजानें **सिलिझिया** प्रांतावर स्वारी करून तो तिचा घेतला. वास्तवीक पाहिलें असतां त्या राजाचे पूर्वजांपासून तो प्रांत मुळीं अन्यायानेंच घेतला होता, ह्मणून आतां त्यानें त्यावर दावा केला. बाकीचे तिच्या मुलुखावर **फ्रान्स**, **साक्सनी**, आणि **बवेरिया**, यांनीं येऊन हल्ले केले; व तिचे निराश्रय स्थितींत सहाय करणारा एक **इंग्लंड** देश मात्र राहिला. नंतर **सार्डिनिया**, **हालंड**, व शेवटीं **रशिया** हे तीन तिला सहाय झाले.

एथें असें मनांत येतें कीं, या महाद्वीपांतील तंट्यांत पडावयास **इंग्लिश** यांस काय कारण होतें? याचें उत्तर

असें कीं, **इंग्लिश** राजाचा **जर्मनी** देशचा प्रांत **हानोवर** याचें संरक्षण होण्याकरितां अवश्य होतें कीं, दुसरें कोणतें राज्य फार बळकट न व्हावें. असें समजून राजाचे मर्जी प्रमाणें त्याचे प्रधान वागले. याकरितां राजानें आपले फौजेची एक टोळी **नेदर्लंड** देशांत पाठविली; आणि तिला सोळा हजार **हानोवर** प्रांतांतील लोकांची भर देऊन **हंगरी** देशचे राणीचे मदती करितां **फ्रान्स** देशावर पाठविली. मग त्याच्या मदतीनें राणीस जय येऊं लागला. तिनें **फ्रेंच** यांस **बोहिमिया** प्रांतांतून काढून दिलें. तिचा सरदार राजपुत्र **चार्लस** यानें पुष्कळ फौज घेऊन **बवेरिया** प्रांतावर हल्ला केला. तिचा शत्रु जो **एंपरर** नेमला होता, तो पळून गेला, त्याचे स्नेही होते त्यांनींही त्यास सोडिलें. त्याचे पूर्वजांचें राज्य होतें तेंही गेलें, आणि याप्रकारें तो **फ्रांक्फर्ट** शहरांत जाऊन राहिला.

**ब्रिटिश** सरकारची आणि **आस्त्रियन** फौज एकत्र होऊं नये, ह्मणून **फ्रेंच** यांनीं **मेन** नदीवर **मार्शालनोएल्स** या नांवाचे सरदाराचे हातांखालीं साठ हजार फौज ठेविली. त्या सरदारानें आपले लोकांसहवर्तमान नदीचे कांठावर तळ दिला. दुसऱ्या बाजूवर सुमारें चाळीस हजार **ब्रिटिश** फौजेचा उद्योग चालला होता; परंतु त्यांस सामान सुमानाचा पुरावा होण्याचीं सारीं द्वारें **फ्रेंच** यांनीं बंद केलीं होतीं. अशा संकट अवस्थेंत फौज असतां राजा तेथें येऊन पोंचला, आणि त्या वेळेस बारा हजार **हानोवर** प्रांतांतले लोक व **हेसियन** लोक **हानो** शहराजवळ येऊन पोंचले होते; त्यांस पुढें जाऊन मिळावें असा निश्चय त्यानें केला; परंतु

इ०स० १७४३

त्याची फौज पांच चार कोश गेली, इतक्यांत त्यांनीं **डोटंगेन** गांवाजवळ पाहिलें कीं, शत्रूनीं चारही बाजूंनीं वेढा दिला.

त्या वेळेस पुढें फार संकटाची गोष्ट आली, असें दिसूं लागलें; तें असें कीं, जर शत्रूंशीं लडाई केली तर आपला फार नाश होईल. जर उगेंच निरुद्योगी राहिलें, तर अन्नासाठीं हाल होऊन प्राण जातील; आणि सर्वांस निघून जाण्यास वाट तर मिळेना. अशा विचारांत राजा पडला असतां, **फ्रेंच** याचे उतावीळपणामुळें त्याचे सर्व सैन्याचें संरक्षण झालें. एक अरुंद स्थळ होतें, तें त्यांनीं राखून राहावयाचें होतें, तें सोडून ते त्याचे आलीकडे आले; आणि **ड्युक ग्रामोंट** यानें घोडेस्वारानिशीं **इंग्लिश** यांचे पायदळावर मोठ्या आवेशानें हल्ला केला. **इंग्लिश** लोकांनींही तो हल्ला शौर्य आणि दृढनिश्चय यांहींकरून साहिला; ह्मणून **फ्रेंच** यांची दुर्दशा होऊन ते त्वरेनें **मेन** नदी उतरून परत गेले. या उद्योगांत **फ्रेंच** यांचे पांच हजार लोक पडले.

त्या वेळेस **फ्रेंच** लोकांनीं सर्व ठिकाणीं मोठा उद्योग चालविला होता. त्यांनीं **इंग्लंड** देशावर हल्ला करावयाची मसलत योजिली; आणि पूर्वींचा **प्रिटेंडर** याचा मुलगा **चार्लस**, **रूम** शहराहून **स्पानिश** जासुदाचा वेष घेऊन **पारीस** शहरास आला. तेथें त्याची आणि **फ्रेंच** राजाची भेट झाली. त्या **चार्लस** याचे कुटुंबास फार दिवसांपासून **फ्रेंच** सरकारानें मदत करण्याचें वचन दिलें होतें; परंतु आतां असें दिसलें कीं, ते वास्तविक त्यास मदत करणार. त्या लढाईसाठीं त्यांनीं पंध्रा हजार पायदळ

तयार केलें; व त्यांनीं **प्रिटेंडर** याचे मुलाचे समक्ष **इंग्लंड** देशाजवळचे बंदरीं गलबतावर चढावें असें योजिलें. तसाच बेत केला होता कीं, **ड्युक रोकसैल** यानें मोठीं गलबतें वीस घेऊन त्या फौजेस **इंग्लंड** देशांत पोंचवावें; आणि ती जमिनीवर उतरली ह्मणजे तिचा सरदारपणा **कौंट साक्स** यानें करावा; परंतु **इंग्लिश** यांचा सरदार **सर ज्ञान नारिस** त्यापेक्षां मोठें अरमार घेऊन आला, तेणेंकरून हा सर्व उद्योग फुकट गेला. ह्मणून **फ्रेंच** यांनीं आपलीं गलबतें मागें फिरविलीं; व त्यांचीं भाड्याचीं गलबतें उलटा वारा लागल्यामुळें फार खराब झालीं; या रीतीनें अकस्मात् येऊन नाश करावयाची मसलत फसल्यावर **फ्रेंच** यांनीं **इंग्लिश** लोकांशीं उघड युद्धाची प्रतिज्ञा केली.

मग **फ्रेंच** लोकांनीं मोठ्या हुशारीनें युद्धाचा प्रारंभ केला. त्यांनीं **फ्रिबर्ग** शहरास वेढा घातला; आणि पुढल्या लढाईचे प्रारंभीं **टूर्ने** ह्मणून जें बळकट शहर आहे, त्यासही वेढा घातला. **इंग्लिश** व त्यांचे साथी यांची फौज थोडी होती; परंतु त्यांनीं एक लढाई करून शहर राखावें, असा निश्चय केला; ह्मणून ते शत्रूवर चढून गेले, आणि एके उंच स्थळावर **फ्रेंच** यांनीं तळ दिला होता, त्याचेजवळ ते राहिले. **संटआंतोन** या नांवाचें गांव उजवे बाजूस, एक अरण्य डावे बाजूस, आणि **फांतिनाय** शहर पुढें, अशी त्यांस जागा मिळाली; ह्मणून **इंग्लिश** यांची हिंमत कमी झाली नाहीं. त्यांनीं सुमारें दीड प्रहर रात्र असतां त्यांवर हल्ला केला, आणि पराक्रमेंकरून त्यांस फार हैराण केलें. या रीतीनें सुमारें दोन घटिका पावेतों इं-

**ग्लिश** यांचा विजय दिसत होता, आणि तेही फत्ते झाली-च असें समजले होते; इतक्यांत **फ्रेंच** यांचा सरदार **साक्स**; जो दुखण्यानें पुढें मेला, त्यानें पीडित असतांही पालखींत बसून सर्वत्र फिरला; आणि त्यानें सैन्यास धीर दिला कीं, आज आपणास युद्ध प्रतिकूळ दिसतें खरें, पण दिवस आपला असें समजा, **इंग्लिश** यांची एक टोळी कांहीं बंदोबस्तावांचून सहज धट्टाईनें शत्रूंचे रागांत जा-ऊन पडली; तिला आंत घेण्याकरितां त्यांनीं दोन बा-जूंस होऊन वाट केली. मग **फ्रेंच** यांनीं तीन बाजूंनीं आपला तोफखाना सुरू करून ते त्यां लोकांवर बार करूं लागले. तथापि त्या टोळीनें बहुत वेळपर्यंत धीर सोडि-ला नाहीं; शेवट सुमारें संध्याकाळचे प्रहर दिवसास ती मागें परतली. त्या लढाईमध्यें फार लोक पडले. **इंग्लिश** व त्यांचे साथी यांचे सुमारें बारा हजार पडले; आणि **फ्रेंच** लोकांचेही तितकेच पडून त्यांस जय प्राप्त झाला; परंतु तेणेंकरून जें फळ प्राप्त झालें, तें त्यांनीं पुढें सारे लढाईपर्यंत गमाविलें नाहीं.

**ब्रिटिश** सैन्याचा समुद्रांतून आणि जमिनीवरून असा पराजय होत चालला. अशा समयीं **प्रिटेंडर** याच्या मु-लग्यानें राज्य मिळवावयाचा निश्चय केला. **चार्ल्स एड्वर्ड** त्याचें नांव. तो शूर आणि साहसी होता; परंतु त्या मोठे कामास त्याची बुद्धि योग्य नव्हती. बहुत दिवस-पर्यंत मूर्ख, ढोंगी, आणि गरीब लोक त्याची खुशामत क-रीत असत, लोकांचे सांगण्यावरून त्यास असें वाटलें होतें कीं, सर्व राज्य बंड करावयास सिद्ध झालें आहे; कारण कीं, राज्यांत जे नव नव मोठे कर बसविले होते, ते लो-

कांच्यानें सोसवत नाहींत. असें समजून त्यानें थोडा पैका, आणि मदतीचीं वचनें **फ्रान्स** राज्यापासून घेऊन एक लहान **फ्रिगेट** यावर **टलिबार्न** एथील **मार्कुइस, सर टामस शेरिडन,** आणि दुसरे कित्येक साहसी लोक घेऊन तो **स्काट्लंड** देशास निघाला. सर्व **ब्रिटिश** राज्य घ्यावयासाठीं असे सात सरदार व दोन हजार माणसांचीं हत्यारें इतकें मात्र त्यानें बरोबर आणिलें. तो **पर्थ** शहरास पोंचल्यावर त्यानें मी **ग्रेटब्रिटन** देशचा राजा, अशी जाहिरात केली. तेथून निघून जात असतां वाटेनें त्याची फौज वाढत चालली. आणि तो लढाईवांचून **एडिंबरो** शहरास पोंचला. तेथेंही त्यानें मी राजा, असें जाहीर केलें, आणि **इंग्लंड** व **स्काट्लंड** यांचा मिलाफ झाला; ह्मणून लोकांस असंतोष झाला याकरितां मी तो मोडणार अशी त्यानें प्रतिज्ञा केली; परंतु **एडिंबरो** शहरचा किल्ला त्याचे स्वाधीन झाला नाहीं; आणि तो घ्यावयास त्याजवळ तोफा नव्हत्या.

उत्तर प्रांतांत बंडवाल्यांचे माठीमागें, **सर जान कोप** लागला होता, परंतु त्यानें त्यांशीं लढाई केली नव्हती. त्यास आतां स्वारांच्या दोन पलटणी येऊन मिळाल्या, ह्मणून त्यानें **एडिंबरो** शहरास जाऊन शत्रूंशीं लढाई करावयाची मसलत केली. **प्रिटेंडर** याची फौज त्यापेक्षां अधिक होती, पण तिला बंदोवस्त नव्हता. मग **प्रिटेंडर** यानें **प्रेस्तन् पान्स** गांवाजवळ **सर जान कोप** याजवर हल्ला करून थोडके वेळांत त्याचा पराजय केला. त्या लढाईंत राजाचे पांचशें लोक पडले, आणि बंडवाल्यांस त्याचा उपयोग झाला. त्या वेळेसच **इंग्लंड** देशांत जावें

हें **प्रिटेंडर** यास योग्य होतें, परंतु तो **एडिंबरो** शहरांत मदतीची वाट पाहात राहिला; तितक्यांत त्याशीं लढाई करण्याची सरकारानें चांगली तयारी केली. **जनरल वेड** म्हणून सरदार आपले बरोबर साहा हजार **डच** फौज घेऊन उत्तरेस गेला. **ड्युक कंबर्लंड फ्लांडर्स** देशांतून आला; आणि त्याचे मागून चांगले बंदोबस्ताची एक स्वारांची आणि पायदळाची टोळीही आली. याशिवाय बहुतकरून सर्व लोकही **प्रिटेंडर** यांशीं विरुद्ध होते.

असें असतांही त्यानें **इंग्लंड** देशावर हल्ला केला, आणि तीन दिवसांत **क्यार्लैल** शहर घेतलें. तेथें त्यास बहुत लढाईचीं शस्त्रें मिळालीं, आणि त्यानें आपला बाप राजा असें जाहिर केलें.

हें ऐकून **जनरल वेड** साहेब त्याजवर येऊं लागला; परंतु शत्रु दोन दिवसांचे वाटेवर आहेत, असें समजल्यामुळें तो परत गेला. देशांतून दक्षिणेकडचे बाजूवर फौज येणार आहे, असें ऐकून कांहीं अटकाव न होतां **प्रिटेंडर** पुढें चालला; नंतर तो **स्काट्लंड** देशचा वेष करून पायदळाबरोबर पायीं **मांचेस्तर** शहरास गेला.

तेथें त्यास दोनशें **इंग्लिश** लोक येऊन मिळाले; तेथून तो **डर्बी** शहरास चालिला; आणि तेथून त्यानें **वेल्स** प्रांतांत जाण्याचा निश्चय केला. तेथें आपले पक्षाचे फार निघतील असें त्याचे मनांत होतें; परंतु त्याचेच फौजेंत तंटा उत्पन्न झाल्यामुळें त्याचें जाणें झालें नाहीं. त्याचा फौजेवर फारसा हुकूम चालत नव्हता; कारण कीं, **हैलंड** एथील सरदारांस दुसऱ्याचे ताबेखालीं राहाण्याचा अभ्यास

नव्हता. त्या वेळेस त्या सर्वांनीं मिळून निश्चय केला होता कीं, आपले मुलुखांत निघून जावें.

नंतर ते चांगले बंदोबस्तानें व **इंग्लंड** देशांत कांहीं लूट न करितां **स्काट्लंड** एथें गेले. त्यांनीं **क्यार्लैल** शहरांत चारशें माणसांचा पाहारा ठेविला होता. तें **क्यार्लैल** शहर पुढें लवकरच **ड्युक कंबर्लंड** यानें घेतलें. त्यांनीं आपल्यामध्यें कज्जा करून चांगली मसलत केली नाहीं; आणि शेवटीं **इन्वेर्नेस** शहरापासून पांच कोशांवर **कलाडन** मैदान आहे, तेथें लढावयाचा निश्चय केला. ते लोक सुमारें आठ हजार होते, आणि त्यांच्या तीन टोळ्या केलेल्या होत्या. त्यांजवळ थोड्या तोफा होत्या, पण त्यांचे गोलंदाज कसबी नव्हते.

दोन प्रहरांचे सुमारें लढाईचा प्रारंभ झाला, आणि अर्ध तासाचे सुमारें त्यांचा अगदीं मोड झाला. त्यांचे अदमासें तीन हजार लोक पडले. **फ्रेंच** लोक डावे बाजूस होते, त्यांनीं लढाईंत कांहीं मदत केली नाहीं, आणि शेवटीं ते शत्रूंचे स्वाधीन झाले. नंतर जे लोक फौजेंतून पळून गेले होते, त्यांतून छत्तीसांस ठार मारावें, असा **ड्युक** यानें हुकूम केला, आणि त्यानें दुसरे प्रकारचा बहुत क्रूरपणा केला.

या रीतीनें **प्रिटेंडर** याची एकदांच केवळ निराशा झाली. मग तो एकटा देशांत इकडे तिकडे फिरूं लागला तो कधीं कोणा गरीब माणसाचे झोपड्यांत, कधीं रानांत, असा एक दोन सोबत्यांसुद्धां वस्तीस राही; आणि त्याचे मागून शत्रूंची फौज नेहेमी लागली असे. त्यास मेलेला किंवा जीवंत धरिलें असतां तीस हजार **पौंड** इनाम

मिळेल, असें ठरविलें होतें, त्याचे बरोबर कोणी एक **शेरि-डन** नांवाचा मनुष्य असे, तो त्यास तशे विपत्तींत धीर देई. त्याचे अज्ञातवासाची गुह्य गोष्ट सुमारें पन्नासांपेक्षां अधिक लोकांस कळली; परंतु त्याचे वंशाचा मान सर्व राखीत होते, ह्मणून कोणी ती लोभानें प्रगट केली नाहीं.

एके दिवशीं तो सकाळपासून संध्याकाळपर्यंत चालून संध्याकाळीं एके घरांत गेला; त्या घराचा धनी शत्रूंचे पक्षाचा आहे असें त्यास ठाऊक होतें. तो जातांच घर-धण्यास बोलला. "तुमचे राजाचा मुलगा तुमच्या पाशीं थोडी भाकर, व थोडींशीं वस्त्रें मागावयास आला आहे. तुह्मांस माझे शत्रूंचें सांप्रत अगत्य आहे हें मला कळलें; परंतु असा मी विपत्तींत पडलों असतां तुह्मी माझा विश्वास-घात करणार नाहीं; अशी माझी खातर आहे." त्या घर-धन्यास त्याची दुर्दशा पाहून दया येऊन त्यानें त्याचा फार समाचार घेतला, आणि ती गोष्ट कोणास कळविली नाहीं.

असा तो **ग्लेनगारी** एथील रानांत सुमारें साहा महिने फिरत होता. शेवटीं त्याचे साथी लोकांनीं **सेंट मेलोस** गांवचें एक गलबत भाड्यानें केलें, त्यावर तो फार गरी-बाचे वेषानें बसला. बहुत दिवस दुःखें भोगून त्याचें शरीर त्या वेळेस फार मलीन व कृश झालें होतें. त्याचे बरोबर, **सलिवन** व **शेरिडन** असे दोन ऐरिश लोक, **लोखील** एथील **क्यामरन** व त्याचा भाऊ इतके गलबतावर चढले. त्यांचे पाठीस **इंग्लिश** यांचीं दोन लढाऊ गलबतें लागलीं होतीं; परंतु ते स्वस्थपणें **ब्रिटाई** प्रांतांत **मोर्लेस** गांवाज-वळ **रोझो** ह्मणून ठिकाण आहे तेथें पोंचले. तो **प्रिटें-डर** मारिला गेला, असें ऐकून त्याचे पाठीस लागलेले लो-

कांनीं जर स्तुती केली नसती, तर त्याचें जाणें व्हावयास कठीण पडतें.

तिकडे **प्रिटेंडर** याचे पाठीमागें लोक लागले असतां इकडे वंडवाल्यांचे फौजेंतून सत्रा सरदारांस **केनिंग्‌तन कामन** ठिकाणीं फांशी दिलें. **क्यालैल** शहरांत नवांस असेंच ठार मारिलें, व **यार्क** शहरास अकरांस मारिलें. थोड्यांस क्षमा मिळाली, आणि पुष्कळ सामान्य लोकांस उत्तर **अमेरिका** देशांतील संस्थानांत पाठविलें. **किल्मार्नाक** व **क्रोमार्ती** एथील **अर्ल**, व **लार्ड बाल्मरीनो** यांची चौकशी **लार्ड** यांनीं केली; आणि त्यांवर गुन्हा लागू झाला. **क्रोमार्ती** यास क्षमा मिळाली; आणि दुसरे दोघांचा किल्ल्यावर शिरच्छेद केला.

या रीतीनें जय, पराजय, तहाचें बोलणें, लबाडी, आणि वंडें कितीएक वर्षेंपर्यंत एकापुढें एक अशीं होऊन, शेवटीं सर्व पक्षांचे लोकांस आपण अधिक दुर्बळ होत आहों, असें वाटून त्यांनीं तह करावा असा निश्चय ठरविला. सर्वांनीं **एसला शापेल** या ठिकाणीं एकीकडे मिळावें असें ठरलें. त्या ठिकाणीं **ब्रिटिश** राजाकडून वकील **अर्ल सांड्‌विच** आणि **सर टामस राबिन्सन्** हे दोघे गेले होते. प्रारंभीं लढाईंत जीं ठिकाणें घेतलीं होतीं, तीं ज्यांचीं त्यांस परत द्यावीं, असें होऊन तहाचा प्रारंभ झाला. त्या तहांत पुढें लिहिलेलीं कलमें ठरलीं;– लढाईंत जे बंदिवान धरिले होते ते, व ठिकाणें घेतलीं होतीं तीं, ज्यांचीं त्यांस परत द्यावीं. **पार्मा**, **प्लेसन्‌शिया**, आणि **ग्वास्ताला**, हे प्रांत **स्पानिश** राज्याचा वारिसदार **डान फिलिप** यास द्यावे; परंतु तो पुढें **स्पेन** देशचा राजा झाला असतां, तीं संस्थानें

**आस्त्रिया** देशचा एंपरर याजवळ जावीं. **डंकिर्क** एथील समुद्र कांठचा किल्ला मोडावा, व **अमेरिका** देशांतील **न्युस्पेन** प्रांतांत इंग्रेजी गलबत गुलाम भरून प्रतिवर्षास जात असे, तें आणखी चार वर्षेंपर्यंत जाऊं द्यावें. **प्रशिया** देशचे राजानें **सिलिसिया** प्रांत नुकताच घेतला होता, तो त्याजवळ मुकरर करावा; व **हंगरी** देशचे राणीनें बापाचें राज्य भोगावें. तसेंच **केप ब्रिटन** व दुसरीं **फ्रेंच** सकारचीं ठिकाणें **इंग्लिश** यांनीं घेतलीं होतीं, तीं परत देई-पर्यंत **इंग्लिश** यांनीं दोन अबरूचे माणूस **फ्रेंच** सरकाराकडे ओलीस पाठवून द्यावे. या कलमांत **इंग्लिश** यांची फार अपकीर्ति झाली. तसेंच **अमेरिका** देशचे समुद्रांत **इंग्लिश** लोकांचे गलबतांस शोधीत असत; ह्मणून लढाई उत्पन्न झाली होती, परंतु त्याचा कांहीं बंदोबस्त झाला नाहीं. **अमेरिका** देशांतील संस्थानाच्या हद्दी मुकरर झाल्या नाहींत, व **इंग्लिश** यांनीं किल्ले परत दिले, त्यांचे बदल त्यांस कांहीं दिलें नाहीं. सारांश, पूर्वीं **युत्रेक्ट** शहरांत तह झाला होता, त्यापेक्षां हा फार वाईट झाला; परंतु त्या वेळेचे लोकांस तो फार चांगला आवडला.

वर सांगितले तहापासून **युरोप** खंडांत मात्र **फ्रेंच** आणि **इंग्लिश** यांच्या लढाया बंद झाल्या; परंतु हिंदुस्थानांत व **वेस्ट इंडीस** बेटें एथें मोठ्या निकरानें चालल्याच होत्या.

**नोवास्कोशिया** ह्मणून उत्तर **अमेरिका** देशाचा एक प्रांत आहे. तेथें **इंग्लिश** सरकार आपले राज्यांतून लोक पाठवीत असत. त्या ठिकाणची जमीन थंड, उजाड, व शेतकीस निरुपयोगी होती; परंतु तीसाठींच **इंग्लिश**

व **फ्रेंच** या दोघांमध्यें फिरून लढाई चालू झाली. त्या प्रांताचे शेजारचे रानांत राहणारे मुळचे क्रूर अज्ञानी लोक होते, ते **इंग्लिश** यांचा पहिल्यापासून द्वेष करीत असत; तशांत **फ्रेंच** यांचा व **इंग्लिश** यांचा मूळचा द्वेष होताच, ह्मणून त्यांनीं **इंग्लिश** लोक मोठे शूर व दुष्ट असें त्या लोकांस सांगून तो द्वेष वाढविला. हे तंटे मिटवावयास **पारीस** शहरास वकील पाठविले; परंतु ते त्या लोकांसच समजले नव्हते, ह्मणून कांहीं बंदोबस्त झाला नाहीं.

प्रथम नवी लढाई होण्यास हा प्रांत कारण; ह्मणून याच्या कांहीं विशेष गोष्टी लिहिल्या पाहिजेत. त्या **नोवास्कोशिया** प्रांताची लागवड प्रथम **फ्रेंच** लोकांनीं केली होती, व मेहेनत करून तेथील मूळची ओसाड जमीन शेतकीस उपयोगी केली होती. त्या प्रांताचे धनी बहुत वेळ बदलून शेवटीं तो **इंग्लिश** यांकडे आला होता, आणि तो त्याजवळ असावा, असें **युत्रेक्ट** एथील तहांत ठरलें होतें. तो प्रांत, **इंग्लिश** यांचीं उत्तरेकडील संस्थानें राखावयास, व तेथील मासे मारण्यांत सर्वांपेक्षां त्याजवळ अधिक सत्ता ठेवावयास उपयोगी होता. इकडे त्या देशाचे पाठीमागें फार दिवस **फ्रेंच** लोक राहात होते, त्यांचा निश्चय होताच कीं, कोणत्या तरी युक्तीनें तो **इंग्लिश** लोकांपासून घ्यावा, ह्मणून त्यांनीं तेथील राहणारे लोकांकडून **इंग्लिश** यांशीं उघड लढाया करविल्या. त्या **इंग्लिश** प्रधानाचे कानास आल्या पण बंदोबस्त झाला नाहीं.

पुढें लवकर त्याच देशांत दुसरें एक लढाईस कारण

झालें; तें असें कीं, **मिसिसिपी** नदीच्या समुद्राशीं संगम प्रथम आपण पाहिला, असें निमित्त करून **फ्रेंच** पूर्वेकडे **न्युब्रोंकिसको** देशापर्यंत जवळचा सर्व मुलूख, व पश्चिमेस आपले **खियन** डोंगरापर्यंत सारा मुलूख आपला ह्मणूं लागले. त्यांनीं त्या डोंगरापलीकडे व्यापाराकरितां व देश चांगला पाहून कित्येक **इंग्लिश** लोक जाऊन राहिले होते त्यांस काढून टाकून किल्ले बांधिले, असे कीं सभोंवता सारा मुलूख आपले स्वाधीन व्हावा.

अशीं **अमेरिका** देशांत नवीं लढाईचीं कारणें होत, असतां, **एशिया** खंडांत हिंदुस्थानचे पश्चिम कांठावर **इंग्लिश** व **फ्रेंच** यांच्या लढाया कधीं संपल्या नव्हत्या.

त्या वेळेस **इंग्लिश** यांचे प्रधानांनीं लढाईचा उद्योग आवेशानें आरंभिला. त्यांनीं **अमेरिका** देशांत एकदांच चार ठिकाणीं लढाई सुरू केली. त्या चोहोंतून एकींत **जनरल मंक्टन** यास सरदार करून पाठवून दिलें, व हुकूम केला कीं, **फ्रेंच** यांस **नोवास्कोशिया** प्रांतांतून काढून टाकावें. दुसरी लढाई दक्षिणेस **क्रोन पाइंट** यावर करण्याकरितां **जनरल जान्सन** यास नेमिलें. तिसरी लढाई **जनरल शर्ली** यानें न्यागरा नदीवरील किल्ले घेण्याकरितां करावी, असा हुकूम केला; व चवथी लढाई करावयास त्यापेक्षां दक्षिणेकडे **डुखेन** या किल्ल्यावर **जनरल ब्राडक्** यास पाठविलें.

इ० स० १७५६

या लढायांत **मंक्टन** याचा जय झाला. **जान्सन** याचाही जय झाला, परंतु त्याला ज्या किल्ल्यावर पाठविलें होतें, तो त्याचे हातीं सांपडला नाहीं. **शर्ली** यानें वेळ लावून लढाईचा समय घालविला **ब्राडक्** यानें शूरपणानें

मेहेनत केली, पण त्याचा पराभव झाला. तो रानांतून जात असतां वाटेनें त्याचे फौजेवर अकस्मात् शत्रूंनीं दडून राहून मागून व पुढून बंदुका चालू केल्या. **ब्राडक्** यानें तशा वेळीं मागें न हटतां बहुत पराक्रम केला; परंतु त्याचे छातींत गोळी लागून तो पडला, आणि सैन्यांत धांदल झाली. त्याचा सर्व तोफखाना, व बुणगें शत्रूंचे हातीं लागलें, आणि त्याचे लोक सातशें मेले गेले.

असा **इंग्लिश** यांचा मोड झाला ह्मणून त्यामध्यें असंतोष, भय, आणि परस्परामध्यें वैर उत्पन्न झालें. अशी संधी पाहून **फ्रेंच** यांनीं **युरोप** खंडांत तंटा चालू केला. **मिनोर्का** बेट **आन** राणीचे राज्यांत **इंग्लिश** यांनीं घेतलें होतें, व तें बहुत तहांमध्यें त्यांकडे मुकरर झालें होतें; परंतु त्या वेळेस प्रधानांनीं तें राखण्याचा बंदोबस्त चांगला ठेविला नाहीं, ह्मणून **फ्रेंच** यानीं जाऊन **सेंटफिलिप** किल्ल्यास वेढा घातला. तो किल्ला फार वळकट होता. व त्यावर मोठा शूर **ब्लेक्नी** ह्मणून सरदार होता. तो राखण्यासाठीं **इंग्लिश** यानीं कांहीं वेळपर्यंत मेहनत केली, परंतु शेवटीं तें ठिकाण शत्रूंचे स्वाधीन झालें.

हा अकस्मात् वेढा पडला, असें ऐकून प्रधानांनीं तो उठवावयाचा निश्चय केला. त्याकरितां त्यांनीं लढाऊ गलबतें दाहा बरोबर देऊन **आड्मरल बिंग** यास पाठविलें, व हुकूम केला कीं, **मिनोर्का** बेट राखण्यास कोणते तरी रीतीनें मदत करावी. **बिंग जिब्राल्टर** शहरास गेला, तेथील अंमलदारानें आपलेच किल्ल्यास भय आहे, असें निमित्त करून त्यास कांहीं पुरावा केला नाहीं. मग तो **बिंग** तेथून निघाला; आणि बेटाजवळ आला, तों त्यानें

**फ्रेंच** यांचें निशाण कांठावरच आहे, व किल्ल्यावर **इंग्लि-श** यांचेंच आहे, असें पाहिलें. त्यांस किल्ल्यामध्यें लोकांची एक टोळी पाठवावयाचा हुकूम होता; परंतु त्यास तसें करण्यास धीर होईना. ह्मणून त्यानें त्याविषयीं प्रयत्नही केला नाहीं. इतक्यांत त्याचे अरमाराएवढेंच **फ्रेंच** यांचें अरमार आलें. त्या वेळेस त्यानें अनेक मसलती मनांत आणून शेवटीं लढाईची तयारी करण्याचा हुकूम केला. मग **फ्रेंच** यांचें अरमार पुढें आलें, व **इंग्लिश** यांचे अरमाराचाही कांहीं भाग लढावयास पुढें झाला; परंतु **आड्मरल्** एकीकडेच राहिला. ह्मणून तें **फ्रेंच** लोकांचें अरमार निघून गेलें; आणि **बिंग** यास जवळची लढाई करण्याचा दुसरा कधीं प्रसंग आला नाहीं.

अशी **बिंग** याची वर्तणूक ऐकून **इंग्लंड** देशांत लोकांस फार राग आला. प्रधानांनींही ती गोष्ट आपले आंगावरून टाकिली, आणि **बिंग** याचे नाशास आंतून साहित्य केलें. नंतर तो **मिनोर्का** बेटांतील किल्ला **फ्रेंच** लोकांचे हातीं गेला, असें जेव्हां लोकांचे कानास आलें, तेव्हां त्यांस फारच संताप झाला. त्या समयीं आपण केलें तें चांगलें असें समजून व आपले नाशाविषयीं **इंग्लंड** देशांत सिद्धता होत आहे, हें न कळून **बिंग जिब्राल्टर** शहरांतच होता. मग लवकरच हुकूम गेला कीं, त्यास कैद करून **इंग्लंड** देशांत आणावें. त्याप्रमाणें आणिल्या नंतर **ग्रीनिच हास्पिटल** यामध्यें त्यास बंदींत ठेविलें. कांहीं युक्ती करून लोकांस त्याचा तिरस्कार आणविला, व सर्व प्रांतांतून पत्रें येऊं लागलीं कीं, त्या अपराध्याचें शासन करावें. तीं पत्रें प्रधान कबूल करूं लागले.

नंतर **कोर्ट मार्शल** यानें त्याची चौकशी करून असें ठरविलें कीं, त्यानें लढाईमध्यें शत्रूंचा नाश करण्यांत पराकाष्टेचा यत्न केला नाहीं; ह्मणून लढाईचे बारावे कायद्याप्रमाणें त्यास ठार मारावें; परंतु त्याची वर्तणूक अजाणपणानें झाली होती, भ्याडपणामुळें झाली नव्हती, ह्मणून त्यावर दया करावी, अशी त्यांनीं शिफारस केली. **पार्लमेंट** आणि राजा यांनीं हें कांहीं ऐकिलें नाहीं; आणि पहिलेंच शासन ठरविलें. मग त्यास गलबतावर गोळी घालून मारिलें. त्या वेळेस त्यानें मोठे धीरानें वर्तणूक केली. **बिंग** याचें हें शासन कठीण झालें खरें; परंतु त्याचें फळ पुढें उघड दृष्टीस आलें.

लढाई अशी चालत असतां, शेवटीं या रीतीनें सर्व **युरोप** खंडांत सरकाराच्या फौजा एकमेकांवर लढावयास तयार झाल्या होत्या. **अमेरिका, एशिया,** आणि समुद्र या तीहींमध्यें **इंग्लंड** व **फ्रान्स** यांची लढाई चालली होती. **युरोप** खंडांत **ह्यानोवर** देश राखण्याची **प्रशिया** देशचे राजानें प्रतिज्ञा केली होती; व त्या राजाचे मदतीस लोक व पैका पाठविण्याचें **इंग्लिश** राजानें कबूल केलें होतें. फिरून **प्रशिया** देशचे राज्यावर **आस्त्रिया** या देशचें संधान होतें, व **साक्सनी** एथील **इलेक्टर** याचाही बेत तोच होता. या बेतास **फ्रान्स, स्वीडन,** आणि **रशिया** हेही तीन मुलूख अनुकूळ होते; त्यांत **रशिया** देशास आपलें राज्य पश्चिमेकडेस कांहीं वाढावें, अशी आशा होती.

असें वर्तमान असतां पूर्वदिशेकडून प्रथम **ब्रिटिश** फौजेस विजय मिळण्याचा प्रारंभ झाला. तेथें **क्लैव** साहेबाचे

वर्तणुकीनें **इंग्लिश** यांचा चढाव होत चालिला. तो **क्लैव** साहेब **कंपनी** सरकारचे राज्य कारभाराचे खात्यांत प्रथम चाकरीस राहिला होता; परंतु आपले गुण लढाईचे उपयोगी फार आहेत, असें समजून लिहिण्याचें काम सोडून तो शिपायांत उमेदवारीस राहिला. त्याचा शूरपणा लवकरच त्याचे वरचे लोकांचे लक्ष्यांत येऊं लागला; आणि त्याची वर्तणूक, आणि लढाईचे कामांत कुशळपणा हीं समजून त्यास लढाईंतली पहिली पदवी मिळाली. त्यानें प्रथम **अर्काट** प्रांतांतून **फ्रेंच** यांस काढून टाकिलें, हा पराक्रम केला. मग लवकरच त्यांचे सरदारास धरून कैद केलें; आणि तेथील नबाबाचा पक्ष **इंग्लिश** यांनीं धरिला होता, त्याचें राज्य **फ्रेंच** यांनीं घेतलें होतें, तें परत त्यास दिलें.

त्या देशांतील मोठे बळकट राजानें **इंग्लिश** यांचा सूड घ्यावा, अशे बेतानें लढाई करावयाची प्रतिज्ञा करून बहुत फौज घेऊन त्या देशांतील **ब्रिटिश** सरकारचा मुख्य किल्ला **कल्कत्ता** यास जाऊन वेढा घातला. रानवट लोकांच्या हल्ल्यावरही टिकाव धरावयाजोगा तो किल्ला नव्हता; आणि तेथील अंमलदार पळाला, ह्मणून तो किल्ला शत्रूंचे हातीं गेला. मग तेथें एकशें चाळीस लोक रखवालीस होते त्यांस धरून बंदीस घातलें. तें चोहोंबाजूनें झांकलेलें ठिकाण सुमारें अठरा फुट चौरस होतें, व त्यास पश्चिमेकडचे बाजूनें दोन लोखंडाचे खिडक्यांचीं द्वारें मात्र वारा येण्यास वाट होती, परंतु त्या वाऱ्यास पसरावयास जागा नव्हती; ह्मणून त्या आगीसारिखे जागेंत त्यांचे प्राण कोंडूं लागले. त्यांनीं प्रथम दार उघडावयाचा यत्न केला; परंतु तो व्यर्थ गेला. ह्मणून त्यांनीं रखवाली लोकांस बहुत

लांच देऊन एकएकास वेगळे वेगळे बंदिखान्यांत ठेवावें, अशी प्रार्थना आरंभिली. परंतु नवाबास त्या वेळेस झोंप लागली होती, ह्मणून कोणाच्यानें बोलवेना. मग ते निराश होऊन मोठ्यानें आक्रोश करूं लागले, आणि मोठी ओरडा-ओरड झाली; परंतु मग कांहीं वेळानें ती ओरड शमली, आणि त्या हतभाग्यांस ओरडावयाची शक्ति नाहीं, असें हो-ऊन त्यांचे प्राण जावयास प्रारंभ झाला. रखवाली लोक सकाळीं जाऊन पाहातात, तंव जिकडे तिकडे उजाड व भयंकर दृष्टीस पडलें. त्या एकशें चाळीस लोकांतून सकाळीं तेवीस वांचले; परंतु त्यांस सोडल्यावर बहुतकरून सर्व ताप लागून मरण पावले.

असा तो कलकत्त्याचा किल्ला गेल्यामुळें **इंग्लिश** यांची पुढें वढती होण्यास विघ्न झालें; परंतु **क्लैव** साहेबाचें शौर्य, व **आड्मरल वाट्सन** साहेबाचें अरमार, या दोहोंचे मद-तीनें पुनः त्यांचा जय होत चालला. त्या देशांत एक तुळाजी अंग्र्या ह्मणून प्रसिद्ध संस्थानी होता, त्यानें चांचे-पणा करून समुद्रकांठचे सारे राजे आपले ताबेखालीं आ-णिले होते. तो जवळ पुष्कळ मोठीं गलबतें बाळगून दुसरीं गलबतें लुटीत असे. त्यापासून **कंपनी** सरकारास फार उपद्रव झाल्यामुळें असें ठरविलें कीं, त्याचा मोड करावा. मग **कर्नल क्लैव** साहेब व **आड्मरल वाट्सन** साहेब हे विजयदुर्ग किल्ल्यांत शिरले. तेथें प्रथम त्यांवर तोफांचा मार झाला खरा; परंतु त्यांनीं लवकरच त्यांचीं गलबतें जाळून किल्ला घेतला. तेथें लढाईचें बहुत सामान व पुष्कळ माल सांपडला.

मग **कर्नल क्लैव** साहेब पूर्वीं जो **कलकत्यांत कंपनी**

सरकारचा नाश झाला होता, त्याचा सूड घ्यावयास गेला. तो **डिसेंबर** महिन्याचे प्रारंभीं बंगाल देशांत **बालासोर** शहराजवळ जाऊन पोंचला. तो **कलकत्यास** जाईपर्यंत त्यास कांहीं उपद्रव झाला नाहीं. दोन गलबतें घेऊन **आड्मरल** तेथें जातांच त्यावर चहूंकडून तोफांचा मार केला; परंतु त्यानें त्यापेक्षां अधिक शौर्यानें तोफा चालू करून दोन तासांचे आंत तो किल्ला घेतला. नंतर लवकरच मोठे व्यापाराचें शहर हुगळी ह्मणून आहे, तें त्यांनीं सहज घेतलें; आणि बंगालचे नबाबाच्या साऱ्या वखारी मोडून टाकिल्या. याचा सूड घेण्याकरितां त्या नबाबानें दाहा हजार स्वार व पंधा हजार पायदळ जमा करून **इंग्लिश** यांस त्यांचे सर्व संस्थानांतून काढून टाकावयाची मसलत केली. ही बातमी समजतांच **कर्नल क्लैब** साहेबानें **आड्-मरल** याचे कांहीं लोक मदतीस घेऊन त्यांवर स्वारी केली; आणि त्याची फौज फार थोडी असतां, त्यानें नबा-बाचे इतके मोठे सैन्याचा पराभव केला.

त्या वेळेस मोगलाचा अंमल बहुत दिवसांपासून कमी होत आला होता; ह्मणून बंगालचे तक्तावर **इंग्लिश** यानें एक नबाब बसवून आपल्यास जसे पाहिजे होते तसे त्यापा-सून करार करून घेतले. ते असे कीं, आपले मनास वाटेल तेव्हां मुलूख आपले स्वाधीन व्हावा. या रीतीनें हिंदुस्था-नाचे राजांस अमलाखालीं आणून त्या देशांत **फ्रेंच** लोक फार दिवसपर्यंत **इंग्लिश** यांशीं तंटा करीत असत, त्यांस खालीं करावें; ह्मणून **कर्नल क्लैब** साहेबानें प्रयत्न आरंभिला, आणि फार दिवस न लागतां त्यांचीं सारीं ठाणीं घेऊन त्यांस निर्बळ केलें.

असा पूर्वेस विजय होत चालला असतां पश्चिमेस त्यापेक्षां अधिक होत चालिला. प्रधानांत कांहीं फेरफार झाला, हें तो जय होण्यास कारण; पूर्वींचे प्रधानांस **कामन्स** यांचा आश्रय नव्हता, व त्यांचेमध्यें एक मत नव्हतें, त्यांचे मर्जीप्रमाणें कांहीं एकादी गोष्ट झाली नाहीं, किंवा कोणी नवे पुरुषाची नेमणूक झाली, ह्मणजे ते आपल्या जागा सोडीत; आणि आपले मर्जीप्रमाणें झालें, ह्मणजे पुनः येत. या रीतीनें राजाचा अंमल कमी व **लार्ड** यांचा अंमल अधिक होत चालिला होता. हें राजाचे लक्ष्यांत येऊन त्यानें कारभाराकरितां कांहीं नवे लोक नेमिले, ते जुने प्रधानांनीं कबूल केले. नवे प्रधानांत मुख्य मोठा प्रसिद्ध **विलियम पिट** नामें साहेब होता; त्यावर लोकांनीं मोठा भरंवसा ठेविला होता.

जुने प्रधानांनीं राजानें नेमिलेले लोकांस आपले मंडळींत घेतलें खरें; परंतु ते लवकरच त्यांचा द्वेष करूं लागले, व राजास त्यांचा तिरस्कार यावा अशा युक्ति त्यांनीं आरंभिल्या. राजाचें **जर्मनी** देशांतील मुलुखाकडे फार लक्ष असे, तेंच जुने प्रधानांनीं वाढावयासाठीं यत्न केला होता; आणि नवे ह्मणूं लागले कीं, त्यापासून राज्याचे स्वार्थ बुडतील. अशे त्या दोघांचे बोलण्यांतून आपले मतास जें मिळालें तें घेऊन, राजानें थोडे महिन्यानंतर **पिट** साहेबास कामावरून दूर केलें; परंतु तें राजाचें करणें लोकांस आवडलें नाहीं, ह्मणून त्या **पिट** साहेबास फिरून सरकारचा **सक्रतारी** याचें काम सांगितलें.

नवे प्रधान नेमिल्यावरही पूर्वींचे प्रधानांच्या वाईट मसलतींचीं फळें **अमेरिका** देशांत येत होतीं. तेथें लढाई

कारतां सरदार जात, ते तेथील लोकांचा भ्याडपणा आणि सुस्ती यांच्या मोठ्या फिर्यादी लिहून पाठवीत. तसेच तेथील लोकही आपल्यावर पाठविलेले सरदारांचा गर्व, लोभ, व अशक्तपणा यांचा तिरस्कार करीत. पूर्वी **जनरल शर्ली** ह्मणून तेथें मोठा सरदार नेमिला होता, त्यास परत बोलावून तेथें **लार्ड लौडन** यास पाठविलें; परंतु तोही गृहस्थ तिकडून लवकरच निघून आला, ह्मणून तीन वेगळ्या लढाया करण्याकरितां तीन सरदार पाठविले. **केप ब्रिटन** यावर फौज पाठवावयाची योजिली होती, तिचा सरदार **जनरल आमर्स्तक्रोन पाइंट** व **टिकोंदरेगो** या दोन ठिकाणांवर पाठविलेली फौज **जनरल आबक्रांबी** याचे स्वाधीन केली होती; व तिसरी त्याचे पेक्षां दक्षिणेस **फोर्ट डुकेन** यावर **जनरल फार्बस** साहेबाजवळ देऊन पाठविली होती.

पूर्वीचे लढाईंत **केप ब्रिटन, फ्रेंच** यांपासून **इंग्लिश** यांनीं घेतलें होतें, तें **एसला शापेल** एथील तहांत त्यांस परत दिलें; परंतु ती जागा मोठे उपयोगाची, आणि **फ्रेंच** तिचा आश्रय करून **इंग्लिश** लोकांच्या व्यापारास उपद्रव करूं लागले. तसेंच तें शहर माशांचे व्यापारास फार उपयोगीं होतें, आणि त्या व्यापारापासून त्या वेळेस फार नफा होता. ह्मणून तें **फ्रेंच** यांचे हातून काढून घ्यावें, अशी सर्व राज्यांतील लोकांस इच्छा उत्पन्न झाली. त्या शहरचे सभोंवता **लुइसबर्ग** एथील फार बळकट किल्ला होता, तेथें **इंग्लिश** यांनीं मोठ्या शौर्यानें हल्ला केला, आणि तें ठिकाण त्यांचें स्वाधीन झालें. मग लवकरच तो किल्ला मोडून टाकिला.

**डुकेन** एथील किल्लाही **इंग्लिश** यांचे स्वाधीन झाला. परंतु **क्रौन् पाइंट** याजवळ लढाई झाली, तींत त्यांचा आणखी एक वेळ मोड झाला. पूर्वीं त्या कामांत उतावीळपणामुळें **ब्राडक** मेला होता. आतां **आबक्रांबी** यानें फार सावधगिरी करून तेथें जाण्यास बहुत वेळ लाविला, त्यामुळें शत्रूंस लढाईची तयारी करण्यास संधि सांपडली. तो **टिकोंदरेगो** याजवळ गेला, तेव्हां त्यानें किल्ल्याजवळ तळ देऊन पाडलेले झाडांचे आश्रयानें शत्रु राहिले आहेत असें पाहिलें. अशा गैरसोया असतां **इंग्लिश** यांनीं पराक्रम केला; परंतु शत्रु निर्भय स्थळीं होते, ह्मणून त्यांनीं त्यांचा फार नाश केला. त्यामुळें **आबक्रांबी** यानें मागें येण्याचा बेत केला. इतकें झालें तरीं आशा होती कीं, तोफखाना आला ह्मणजे कांहीं फत्ते होईल; परंतु अगोदर त्या ठिकाणीं मोड झाला होता, त्या भयामुळें **आबक्रांबी** यास शत्रूंचे पुढें राहावयास धीर होईना. ह्मणून तो मागें आला; आणि जेथून निघाला होता, त्या **लेकजार्ज** तळावाजवळ जाऊन राहिला.

या रीतीनें **इंग्लिश** यांचा पराजय झाला, तथापि लढाईमुळें त्यांचा स्वार्थ साधला. तो असा कीं, **डुकेन** एथील किल्ला घेतल्यामुळें तेथील राहाणारे लोकांचे हल्ल्यांचा उपद्रव बंद झाला, आणि **अमेरिका** देशांतील **इंग्लिश** यांचे संस्थानांसभोंवते **फ्रेंच** लोकांचे किल्ले होते, त्यांचा परस्परें व्यवहार बंद झाला. यामुळें दुसरे वर्षी लढाईचा बेत चांगला होईल अशी आशा आली. नंतर दुसरे वर्षाचे प्रारंभीं प्रधानांनीं विचार केला कीं, असे मोठे देशांत एकच ठिकाणीं हल्ला करून सिद्धीस जाणार ना-

हीं. त्यांनीं मसलत केली कीं, एकदाच उत्तर **अमेरिका** देशांत तीन ठिकाणीं हल्ला करावा; आणि त्या हल्ल्याची तयारीही झाली. मुख्य सरदार **जनरल आमर्स्त** यास बरोबर बारा हजार लोक देऊन **क्रौन पांइन्ट** यावर पाठविलें, कीं ज्या ठिकाणीं **इंग्लिश** यांचें सामर्थ्य फार दिवस फुकट गेलें होतें. **जनरल वुल्फ** यानें समोरचे बाजूस **सेंटलारन्स** नदींत शिरून **अमेरिका** देशांतील **फ्रेंच** यांची राजधानी **क्विबेक** यास वेढा घातला; व **जनरल प्रीडावस** आणि **जनरल जान्सन** यांनीं **नयागरा** नदीजवळ **फ्रेंच** यांचा किल्ला होता तो घ्यावयाचा उद्योग आरंभिला.

या तीहींतून शेवटची लढाई प्रथम सिद्धीस गेली. **नियागरा** एथील किल्ला मोठे कामाचा होता; आणि त्यापासून **फ्रेंच** यांचे उत्तरेकडील आणि पश्चिमेकडील संस्थानांची परस्परांशीं वहिवाट राहिली होती. प्रथम वेढा चांगला पडला; परंतु **जनरल प्रीडावस** तोफा फुटल्यानें मेला गेला, ह्मणून सारें काम **जनरल जान्सन** साहेबावर पडलें. त्यानेंही पूर्वीचे सरदाराप्रमाणें पराक्रम करून अर्ध तासाचे आंत सगळी फौज पळविली. मग तें पाहून किल्लेकरीही आपण **इंग्लिश** यांचे स्वाधीन होऊन बंदींत पडले. **जनरल आमर्स्त** याचीही अशीच फत्ते झाली; परंतु इतकी प्रतिष्ठा झाली नाहीं; कारण कीं, तो लढाईचे ठिकाणीं गेला, तों **क्रौन पाइंट** व **टिकोंदरेगो** हीं दोनही ठिकाणें तेथील लोकांनीं सोडून देऊन मोडलीं.

नंतर सर्व उत्तर **अमेरिका** देश **इंग्लिश** यांचे हाताखालीं येण्यास एक शेवटची लढाई करून **क्वेबेक** शहर

घ्यावें इतकें बाकी राहिलें. तें शहर **क्यानडा** प्रांताची राजधानी; तें सुंदर बांधलें होतें, व त्यांत वस्ती फार होती. त्या लढाईंत अरमाराचा सरदार **आड्मरल सांडर्स** नेमिला होता; व जमिनीवरून वेढा घालण्याचें काम **जनरल वुल्फ** यास सांगितलें होतें. त्याचें वय पसतीस वर्षांचे आंत असतां बहुत प्रसंगीं त्यानें पराक्रम केला होता. त्यांत **लुइसबर्ग** याचे वेढ्यांत फार केला होता. त्यास कुळाचे किंवा नात्याचे आश्रयावांचून केवळ गुणांनींच अधिकार मिळाला होता.

इ०स० १७५९

**अमेरिका** देशांत पूर्वीपासून लढाई फार क्रूरपणानें चालिली होती. परंतु ही चाल वाईट असें समजून पुढें दयेनें लढाई करावी असा **वुल्फ** यानें निश्चय केला. तें **क्विबेक** शहर मोठें नदीचे कांठीं होतें, त्याचे सभोंवते तट होते, तो देशच मुळचा बळकट होता, नदीची राखण करावयासाठीं शत्रूंनीं बहुत गलबतें मिळविलीं होतीं, व तेथील राहाणारे रानवट लोकांच्या टोळ्या नेहेमी **इंग्लिश** लोकांसभोंवती फिरत होत्या. हीं सर्व संकटें एकीकडे पाहून मोठे शूर सरदाराचीही हिंमत खचेल. तो किल्ला घेण्याचा एकच उपाय होता; तो असा कीं, रात्री शहराचे खालीं लोक उतरावे, आणि त्यांनीं नदीचे कांठावर चढून शहराचे मागून हल्ला करावा. परंतु अशासही अडचणी होत्या. नदीचा वेग जलद; कांठ उतरता; त्यावर रखवाली फार; आणि जमीन अशी उतरती होती कीं, तीवरून दिवसासही चढतां येऊं नये. इतक्या गोष्टी असतां **इंग्लिश** यांचे सरदारांचा धीर कमी झाला नाहीं. **कर्नल हौ** साहेब **लैटइन्फांत्री** व **हैलांडर** लोक बरोबर

घेऊन त्या डोंगरावर मोठे धिरानें चढला; व कांठावरचे एके अरुंद वाटेजवळ रखवाली होती, त्यांस तेथून काढून देऊन वर पोंचला. हें ऐकून **फ्रेंच** सरदार **मोंकाल्म** साहेब यानें लढाईची मसलत केली. मग लढाई मोठें निकरानें चालू झाली; आणि तींत प्रथम **फ्रेंच** यांचा मुख्य सरदार, व त्याचे हाताखालचा दुसरा, हे दोघे मेले गेले. **जनरल्ल वुल्फ** जेथें लढाई फार दाट होती, तेथें पुढेंच होता, असें पाहून शत्रूंचे कोणी गोलंदाजानें गोळी मारिली, ती त्याचे हातास लागली तरी तो हातास रुमाल गुंडाळून पूर्वीसारिखा हुकूम देत पुढें चालिला. इतक्यांत दुसरी एक गोळी येऊन त्याचे उरास लागली; त्यामुळें पुढें जावयास शक्ति नाहीं, अशी होऊन त्यानें त्याजवळचे एके शिपायाचे खांद्यावर मान टाकिली. नंतर मरणाच्या वेदना होत आहेत, व प्राण आतां जाणार असे संधीस त्यानें "पळतात" असे शब्द एकिले. त्यास थोडी शक्ति येऊन, त्यानें "कोण पळतात" ह्मणून विचारिलें. **फ्रेंच** पळतात असें कळल्यावर, त्यानें ते लवकरच पळूं लागले ह्मणून आश्चर्य केलें, आणि पुढें पाहवेना असें झाल्यावर त्या शिपायाचे उरावर पडला, आणि शेवटीं मारावयाचे वेळेस हे शब्द बोलिला; "मी सुखानें मरतों."

या चढावापासून **क्वेबेक** शहर **इंग्लिश** यांचे हातीं आलें; व पुढें लवकरच सर्व **क्यानडा** प्रांत स्वाधीन झाला. पुढले हंगमांत **फ्रेंच** यांनीं तें शहर घ्यावयाकरितां पुनः एक वेळ प्रयत्न केला; परंतु तेथील **गवर्नर मरे** यानें धीर केला, व **लार्ड काल्विल**, **इंग्लिश** अरमार घेऊन आला; त्यामुळें **फ्रेंच** यांस तो उद्योग सोडणें प्राप्त झालें.

मग तो सर्व प्रांत **जनरल आमर्स्त** याचे शाहाणपणानें व उद्योगानें **इंग्लिश** यांचे ताबेंत आला; तो तेव्हांपासून आजपर्यंत **ब्रिटिश** सरकारचे राज्याकडे चालतो. त्याच वेळीं **कमाडोर मोर** आणि **जनरल हांप्सन** यांनीं **गाडलुप** बेट घेतलें; परंतु पुढले तहांत तें परत दिलें. या रीतीनें कांहीं अधिक खर्च न पडतां हिंदुस्थानांत व **अमेरिका** देशांत **इंग्लिश** यांस मुलूख नवा मिळत चालिला. जरीं **युरोप** खंडामध्यें ते आणि त्यांचा साथी **प्रशिया** देशाचा राजा यांनीं फार प्रयत्न केला; तरी कांहीं मोठें फळ झालें नाहीं.

मुळापासून आजूनपर्यंत **इंग्लंड** मुलखाचे हद्दींत लढाईचें दुःख झालें नव्हतें, परंतु **युरोप** देशांतील लढाईमध्यें पडावें अशी **इंग्लिश** यांस हौस होती. हें **इंग्लिश** राजास बरें वाटत असे; कारण कीं, त्यापासून त्याचे महाद्वीपांतील राज्याचें रक्षण होत असें. **प्रिन्स फर्डिनांड** यानें **प्रशिया** देशचे राजास मदत करण्याकरितां **हानोवर** प्रांतची फौज हाताखालीं घेतली, असें ऐकतांच **कामन्स** यांनीं **प्रशिया** देशचे राजास मदत करण्यासाठीं आणि **हानोवर** प्रांतांत जमविलेल्या फौजेसाठीं पैक्याचा चांगला पुरावा केला.

**जर्मनी** देशांत पैका पाठवूं लागल्यावर लोकांस इच्छा उत्पन्न झाली कीं, फौजही पाठवावी. **पिट** साहेब पूर्वीं या गोष्टीस विरुद्ध अशी प्रसिद्धी होती; परंतु आतां निकराचे उपायांनीं लढाई लवकर संपवावी ह्मणून, किंवा आपले संबंधाचे लोकांमुळें, किंवा राजास संतोष करण्याक-

रितां, त्यानें त्या लढाईची मसलत मोठे अगत्यानें सांगितली.

असे सर्व लोकांचे मर्जीप्रमाणें **प्रिन्स फर्डिनांड**, आणि **प्रशिया** देशचा राजा, यांचे मदतगारीकरितां **ड्युक मार्लबरो** यास कांहीं लोक देऊन पाठविलें. मग त्या जमलेल्या फौजेनें **क्रेवेल्ट** शहराजवळ कांहीं जय मिळविला. पुढें **ड्युक मार्लबरो** मेल्यामुळें त्याचा अधिकार **लार्ड जार्ज साक्विल** ह्मणून **इंग्लिश** यांचे फौजेचे प्रीतीचा सरदार होता त्याजवळ आला. **मिंडन** एथील लढाईचे वेळेस **फ्रेंच** यांनीं मोठे निकरानें हल्ला केला; व पायदळाची लढाई सर्वत्र चालू झाली. **ब्रिटिश** आणि **हानोवर** प्रांतांतले स्वार बरोबर घेऊन **लार्ड जार्ज** पायदळाचे उजवे बाजूस कांहीं अंतरानें होता. लढाईमध्यें **फ्रेंच** यांचें पायदळ मागें हटलें, ही चांगली संधि पाहून **फर्डिनांड** यानें **लार्ड जार्ज** यास पुढें येण्याचा हुकूम पाठविला. तो त्यानें मानिला नाहीं, याचें कारण काय असेल तें असो, परंतु पुढें लवकरच **लार्ड जार्ज** यास परत बोलावून **कोर्ट मार्शल** यांत चौकशी झाली; व अपराधी ठरवून पुनः लढाईत काम करावयास तो योग्य नव्हे, असा हुकूम झाला. असें झालें तरीं शत्रु मागें हटले, व त्यांचा फार नाश झाला; आणि शेवटीं पळावयास लागून **मिंडन** शहरचे तटापर्यंत **इंग्लिश** त्यांचे पाठीस लागले.

या लढाईची **इंग्लंड** देशांत मोठी कीर्ति झाली; आणि अशी कल्पना निघाली कीं, **ब्रिटिश** लोकांची फौज आणखी एक वेळ पाठविली ह्मणजे लढाईचा शेवट चांगला होईल, ह्मणून फौज पाठविली, आणि **जर्मनी** देशांत

**ब्रिटिश** फौज तीस हजारांवर जमली. यावरून लोकांस मोठी आशा होती, परंतु त्यांची लवकरच निराशा झाली. जमलेले सैन्याचा **कोर्बाक** शहरांत मोड झाला. नंतर उभयपक्षीं बहुत वेळ जय पराजय होऊन ते छावणींत गेले. पुढें कांहीं नफा नसतां लढाईपासून तोटा मात्र होतो, असें पाहून **इंग्लिश** लढाई सोडून द्यावयाची मसलत करूं लागले.

त्या वेळेस **इंग्लिश** लोकांनीं **पराक्रमाची** पराकाष्ठा केली, व खर्चही बहुत होऊं लागला. **प्रशिया** देशचे राजास पुरावा पोंचत होता, **इंग्लिश** यांची मोठी फौज हिंदुस्थानांत होती; दुसरी वीस हजार फौज उत्तर **अमेरिका** देशांतील आपला मुलूख रक्षण करीत होती; तीस हजार लोक **जर्मनी** देशांत होते; व पृथ्वींत दुसरे ठिकाणींही फुटकळ टोळ्या होत्या. परंतु त्यापेक्षां समुद्रांत **इंग्लिश** यांची बळकटी फार होती. त्यांचे सरदारांनीं मोठा पराक्रम करून समुद्रांत **फ्रेंच** यांचे अरमाराचा अगदीं नाश केला. **इंग्लिश अड्मरल** यांनीं सर्वत्र फार पराक्रम केला. **किबरोन** समुद्रामध्यें **ब्रिटाई** प्रांतांचे कांठीं **आड्मरल हाक** साहेबानें वादळांत काळोखी रात्रींत आणि खडपाजवळ (जरी त्यापासून खलाशी लोक फार भितात तरी) आपले इतकेच **फ्रेंच** गलबतांचा मोड केला.

त्या काळीं **ब्रिटिश** लोकांचें तेज सर्व पृथ्वीवर पडलें होतें. या रीतीनें लढाईंत त्यांचा जय होत असतां, तो सर्व एक मोठें वर्तमान घडल्यामुळें कांहीं वेळपर्यंत झांकला गेला. आकटोबर महिन्याचे २५ वे तारिखेस राजास

पूर्वीं कांहीं रोग नसतां तो पलंगावर मरावयाचे दशेंत आहे, असें त्याचे चाकरांनीं पाहिलें. तो नेहेमीचे वेळेस उठून त्या दिवशीं हवा चांगली होती ह्मणून **केन्सिंग्तन** बागांतून फिरून आला होता. नंतर कांहीं पळांनीं तो एकटाच असतां जमिनीवर पडला, तो शब्द चाकरांनीं ऐकिला. त्यांनीं येऊन त्यास पलंगावर ठेविलें, आणि तो हळू बोलिला कीं, "राजकन्या **एमिलिया** ईला बोलवावें;" परंतु ती येण्याचे पूर्वीं तो मेला. मग त्यांनीं रक्त काढावयाचा यत्न केला, पण तो व्यर्थ झाला; आणि शस्त्रवैद्य उघडून पाहूं लागले तंव दृष्टीस पडलें कीं, हृदयांतील उजवे बाजूची मोठी शीर फुटून त्या वाटेनें बहुत रक्त निघून गेलें होतें.

द्वितीय **जार्ज** राजा सत्याहात्तरावे वर्षीं मरण पावला. तो तेहतीस वर्षें राज्य करून आपला लोक शोक करीत आहेत, आणि विजय होत चालिला आहे अशे समयीं मेला. त्यास मृत्युही चमत्कारिक आला. तेव्हां नवा मुलूख मिळवावयाची लोकांची इच्छा कमी होऊन राज्य कारभाराकडे त्यांचें चित्त लागलें होतें. त्याचे मोठे राज्यांत बखेडे उत्पन्न झाले होते, परंतु ते त्याचे वेळेस पूर्णपणास आले नव्हते; ह्मणून त्याचे पुढील राजास त्यांपासून उपद्रव झाला. त्याचे अंगीं कांहीं मोठे गूण नव्हते. तो आपण **जर्मनी** देशांतील आपले मुलुखाची खबरदारी करीत असे, आणि **ब्रिटन** देशांतील राज्य त्याचे प्रधान चालवीत असत. त्याचे गुणांचें वर्णन दोन विरुद्ध लिहिणारांनीं या रीतीनें केलें आहे.

ता०२५ अक्टोबर संन१७६०

त्याचा स्तुति कर्ता लिहितो कीं, "आह्मी त्याचे गुणाकडे कोठें जरीं पाहिलें, तरीं वास्तवीक स्तुति करावयाजोग्या गोष्टी बहुत आढळतील. त्याचे पूर्वीं इंग्लंड देशांत जे राजे झाले, त्यांतून कोणी त्याचे इतका वांचला नव्हता, व कोणीं त्याचे इतकें सुख भोगिलें नव्हतें. त्याचे अंमलाखालीं त्याच्या प्रजा व्यापारांत, व कळा कौशल्यांत वाढत होत्या; आणि त्यानें आपण थोडा खर्च करून लोकांसही तसें करण्याचा उपदेश केला, परंतु तो त्यांनीं चालविला नाहीं. त्याचा स्वभाव उतावीळ आणि रागीट होता; परंतु त्यापासून त्याचे वर्तणुकींत कांहीं फेर नव्हता, तो विचारानें वागत असे, तो मनाचा उघड, सरळ, वचनाचा खरा, चाकरांवर प्रीति करणारा, तो इतका कीं, बखेडा बहुत होऊन अगदीं जरूर होई तंवपर्यंत ज्यानें आपले प्रधानासही सोडिलें नाहीं, असा तो होता. सारांश, त्यानें जन्मभर उपयोगी आणि चांगला होण्याविषयीं प्रयत्न केला."

असें वर्णन त्याचे मित्रांनीं केलें आहे; परंतु दुसऱ्यांनीं तें फिरविलें आहे. "त्याची बुद्धि, व गूण यांची स्तुति आमच्यानें करवत नाहीं. त्यास आपले जन्म देशाचें वळकट अगत्य होतें, त्यामुळें दुसऱ्या सर्व गोष्टी तो एकीकडे ठेवीत असे. तो आपण स्वतः विद्वान होता, आणि इतरांच्या विद्येचाही तिरस्कार करीत असे. त्याचे राज्यांत गुणी लोक फार झाले, परंतु त्याचे आश्रयानें झाले नाहींत. तो इतका थोडा खर्च करीत असे कीं, त्यास कृपण ह्मणावें; आणि तो आपलेचसाठीं संग्रह करीत असे, आपले प्रजांसाठीं नाहीं. त्यामध्यें मोठा असा एकही

गूण नव्हता; आणि तो कित्येक हलकीं कर्में आचरण करीत असे, अशी प्रसिद्धी आहे." या दोहोंतून कोणतें वर्णन खरें, किंवा दोहोंतलेंही कांहीं कांहीं खरें याचा विचार माझ्यानें सांगवत नाहीं.

**द्वितीय भाग समाप्त.**

# प्रकरण ३६.

## तृतीय जार्ज राजाची कथा.

संन् १७६० पासून १८२० पर्यंत.

द्वितीय **जार्ज** राजाचे मरणानंतर त्याचा नातु तृतीय **जार्ज** राजा राज्य करूं लागला. त्याचा बाप लहानपणींच मेला होता. त्यानें नवेंबर महिन्यांत **पार्लमेंट** सभेस बोलवणें केलें. तिनें **सिविल्‌लिस्त** याची नेमणूक प्रतिवर्षीं ८००००० **पौंड** करून दिली. पुढले वर्षीं लढाया वगैरे चालविण्याचे सारे खर्चाचा आकार एक कोटि शाण्णव लक्ष सोळा हजार एकशें एकुणीस **पौंड** झाला; तितकाही पैका त्या वेळचे लढायांकरितां पाहिजेच होता.

**रोमन क्याथोलिक** धर्माचे बायकोशीं राजानें लग्न करूं नये असें होतें, ह्मणून **जर्मनी** देशचे वायव्येस एक लहान राज्यांतील **मेक्लेनबर्ग स्त्रेलिनस** या नांवाचे वंशाचे राजे राज्य करीत होते, त्यांतून एके बायकोशीं त्यानें लग्न केलें. लग्नाचा समारंभ सप्तंबर महिन्याचे आठवे तारिखेस झाला; व त्याच महिन्याचे बाविसावे तारिखेस **वेस्तमिन्स्तर आबे** यांत राज्याभिषेक झाला.

इ०स० १७६१

या वर्षामध्यें **युरोप** देशांत कांहीं मोठी लढाई झाली नाहीं. हिंदुस्थानांत बंगाल्याचे नवाबास राज्यावरून काढून त्याचे जावयास त्याचे जागेवर नेमिलें.

नंतर राज्याचा प्रधान **पिट** साहेब शत्रूंचे दावे व ल-

वाड्या यांचा शोध करूं लागला. त्याचे लक्षांत होतें कीं, **स्पानिश** सरकारानें पूर्वीं **फ्रेंच** लोकांविषयीं उदासीनपणा राखणें कबूल केलें होतें, तरीं त्याचा तिकडे पक्ष आहे. पुढें त्यास गुप्त बातमीदारांचे द्वारें शोध लागला कीं, **फ्रेंच** सरकार व **स्पानिश** सरकार यांचा तह झाला; आणि यावरून त्याचे लक्षांत आलें कीं, ते लवकरच **इंग्लिश** लोकांशीं युद्ध करण्याची उघड प्रतिज्ञा करितील. ह्मणून त्यानें बेत केला कीं, जर **स्पानिश** सरकारानें **इंग्लिश** यांची खातरी केली नाहीं, तर त्यांचें अरमार घ्यावें, किंवा दुसरा कांहीं त्यांचा नाश करावा; ह्मणून आपण **मेदितरेनियन** समुद्रांत अरमार पाठवावें. **पिट** साहेबाचा इतर प्रधानांशीं द्वेष होता, आणि त्याचे तेजाखालीं राज्यांतील मोठे मोठे जुने मातबर कुटुंबांचा मान कमी होत चालिला होता, ह्मणून **अर्ल टेंप्ल** यावांचून इतर सर्व प्रधानांनीं हा बेत चालूं दिला नाहीं. त्यामुळें **पिट** साहेब **अर्ल टेंप्ल** यांनीं आपलीं कामें सोडिलीं. **पिट** साहेबानें सरकारचें काम चांगलें केलें, ह्मणून त्यास तीन पिढ्यांपावेतों ३००० **पौंड** वर्षास नेमणूक करून दिली, व त्याचे बायकोस **बारोनेस चाथम** असा किताब मिळाला. **पिट** साहेबानें काम सोडिल्यानंतर कांहीं महिन्यांनीं कळूं आलें कीं, त्याचे मनांतील संशय खरे होते, हें कळावयास कारण असें झालें कीं, **स्पानिश** दरबारांतील **इंग्लिश** वकील **अर्ल ब्रिस्तल** यानें, ज्या वेळेस त्यांचा आणि **फ्रेंच** यांचा आंतून तह झाला, तो पहावयासाठीं व **फ्रेंच** यांस त्या लढाईंत मदत करावयाविषयीं **स्पानिश** यांचे मनांत काय आहे हें कळण्यासाठीं यत्न आरंभि-

ला, तेव्हां त्याची कांहीं खातर झाली नाहीं, ह्मणून तो वकील निरोप न घेतां तेथून निघून आला.

पुढें जुने **पार्लमेंट** सभेस निरोप होऊन नवी सभा झाली; तींत असें ठरलें कीं, राणी जर राजाचे मागें वांचली, तर तिला १००००० **पौंड** नेमणूक व **सामसेंट** वाडा द्यावा. पुढें त्या वाड्याचा व **बकिंगम हौस** यांच्या बदला केल्या. पुढलें वर्षाचा पुरावा त्या वर्षाचे पुराव्यापेक्षां दहा लक्ष **पौंड** कमी झाला.

**पिट** साहेबानें काम सोडिलें, तंवपर्यंत प्रधान पूर्वींचे राज्याचे शेवटीं जसे होते तसेच होते. राज्याचे प्रीतींतला **लार्ड ब्यूट** यास **अर्ल होल्डर्नेस** याचे जागेवर राज्याचा **सेक्रतारी** नेमिलें होतें. परंतु पुढें **पेलम** वंश फार समर्थ झाला, हें समजून अशी युक्ती केली कीं, **ड्युक न्यूक्यास्तल्** यास आपली प्रधानाची जागा सोडावी लागली. मग त्या जागेवर **लार्ड ब्यूट** याची नेमणूक झाली. या दोघांचे पक्षपाती लोकांमध्यें त्यामुळें फार द्वेष वाढत चालिला.

**ड्युक न्यूक्यास्तल्** यामध्यें मोठे गूण कोणते नव्हते; परंतु तो स्वच्छ मनाचा, उदार, निष्पक्षपाति, दाता, असा होता; त्यानें आपणाकरितां व आपले कुटुंबाकरितां नेमणुकी व जागा मिळवून ठेविल्या नाहींत; आणि राजाची प्रतिष्ठा व राज्याची शोभा राहाण्याकरितां आपली संपत्ति भरीस घातली. त्यास काम सोडिल्यानंतर नेमणूक करून देऊं लागले, तेव्हां त्यानें उत्तर केलें कीं, आपले देशाकरितां मी माझी एवढी संपत्ति खर्च करून आतां लोकांवर भार घालणार नाहीं.

इकडे **लार्ड ब्यूट** यामध्यें गूण व चांगली बुद्धि होती;

